# उपनिषत्संग्रहः

## नारायणोपनिषत्

टीका प्राकृतार्थसहिता

**अस्य ग्रंथस्य प्रथमभागः**

शमदमादिसंपत्तिमतामधिकारिणां परब्रम्हज्ञानावाप्त्यर्थं

**रामचंद्रसूनु व्यंकटेशशर्मणा संस्कृतः**


**पुण्याख्यपत्तने**

शुक्रवारवीथ्यायां ज्ञानप्रकाशमुद्रणालये मुद्रितः

**शकाब्दाः १८१७**





मौल्यं सार्धरूपकं

# उपनिषत्संग्रह.

## नारायणोपनिषत्.

संस्कृत टीका व मराठी अर्थ व समजुतीच्या टिपा ह्यांसहित.

ह्या ग्रंथाचा पहिला भाग

शांति, इंद्रियनिग्रह, वैराग्य इत्यादि गुणांनीं संपन्न अशा अधिकारी

जनांस परमेश्वराचें ज्ञान मिळण्याकरितां

**व्यंकटराव रामचंद्र**

ह्यांनीं तयार केला तो

पुणें, शुक्रवार पेठ येथें

' ज्ञानप्रकाश ' छापखान्यांत छापिला.

शके १८१७.



किंमत १॥ रुपया.

# उपोद्घात.

परमेश्वराविषयीं दोन मतें आहेत-(१) आस्तिक व (२) नास्तिक. कांहीं विद्वान लोक परमेश्वर आहे असें म्हणतात, व कांहीं विद्वान लोक परमेश्वर नाहीं असें म्हणतात. ह्यास्तव परमेश्वर खरोखर आहे किंवा नाहीं हें ज्यास ठरविण्याचें असेल त्यानें त्या दोन्ही प्रकारच्या विद्वानांच्या मतांचा निःपक्षपातानें विचार करणें अवश्य आहे.

नास्तिकांमध्यें चार्वाक हा नास्तिक शिरोमणी म्हणजे नास्तिकांमध्यें मुख्य होता. सर्वदर्शनसंग्रह ह्या नांवाच्या ग्रंथांत चार्वाकदर्शन म्हणून एक भाग असून त्यांत चार्वाकाच्या मताचें प्रतिपादन संक्षेपानें केलें आहे.

चार्वाकाचें मत असें आहे कीं, सत्यज्ञान होण्याला प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय दुसरें प्रमाण नाहीं. प्रत्यक्ष प्रमाणानें परमेश्वराचें ज्ञान होत नाहीं. म्हणून परमेश्वर मुळींच नाहीं. सत्यज्ञान करून घेण्याला अनुमान प्रमाण उपयोगी नाहीं, कारण अनुमान प्रमाणास पुष्कळ दोष आहेत. अनुमान करण्याला व्याप्तीचें म्हणजे व्याप्य व व्यापक ह्यांच्यासंबंधाचें ज्ञान लागतें. परंतु हें ज्ञान प्रत्यक्ष होत नसून अनुमानानेंही होण्याचा संभव नाहीं. व्याप्तीचें ज्ञान होण्याला उपमानाचें साधनाचाही उपयोग नाहीं, कारण उपमितीनें फक्त शब्द व त्यांचा अर्थ ह्यांच्यासंबंधाचें ज्ञान होत असून व्याप्तीचें ज्ञान होत नाहीं. आणखी वेद खोटा असून लबाड व लुच्चा मनुष्यानें केलेला आहे. कारण प्रत्यक्ष प्रमाणानें ज्या गोष्टी खोटया व बीभत्स ठरतात अशा गोष्टी त्यांत आहेत. उदाहरणार्थ, मेलेल्या बापाचें श्राद्ध केलें असतां तें बापाला पावतें असें वेदांत सांगितलें आहे, परंतु प्रत्यक्ष असें आढळतें कीं, जिवंत बापाला माडीवर बस-

वून खालील मजल्यांत त्याच्या नांवानें ब्राह्मण जेवावयास बसविले असतां माडीवर बापाचें पोट भरत नाहीं. म्हणून परमेश्वर आहे किंवा नाहीं हें ठरविण्याला वेदाचें प्रामाण्य उपयोगी नाहीं.

आतां, जर चार्वाक प्रत्यक्षाशिवाय दुसरें प्रमाण मानीत नाहीं, तर त्यास जी गोष्ट सिद्ध करणें असेल ती त्यानें नुसत्या प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध केली पाहिजे. परंतु अनुमान हें प्रमाण नाहीं असें चार्वाकानें प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध न करितां अनुमान प्रमाणानेंच सिद्ध करण्याचा यत्न केला आहे. ह्यावरून जरी चार्वाक अनुमान प्रमाण मानीत नाहीं, तरी त्यास कांहीं गोष्टींत अनुमान प्रमाण घेतल्याशिवाय चालत नाहीं असें सिद्ध होतें. चार्वाकानें खरोखर ज्या आईच्या पोटीं जन्म घेतलेला असेल तिच्या पोटचा तो नसून वेश्येच्या पोटचा आहे असें कोणीं चार्वाकास म्हटलें तर ही गोष्ट खोटी आहे असें चार्वाक प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध करूं शकणार नाहीं. परमेश्वर आहे असें नाकबूल करून चार्वाक उगाच बसेल, तर ती गोष्ट निराळी आहे. मग परमेश्वर आहे असें जो म्हणेल त्याजवर परमेश्वर आहे असें शाबीत करण्याचा बोजा राहील. परंतु परमेश्वर नाहीं असें चार्वाक म्हणेल, तर त्यानें ती गोष्ट प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध केली पाहिजे, आणि तसें तो करी तोंपर्यंत त्याचें बोलणें ऐकण्यास योग्य नाहीं असें समजलें पाहिजे. प्रत्यक्ष प्रमाणानें जें ज्ञान होतें त्याचा समुदाय फारच लहान आहे. बहुतेक ज्ञान अनुमानानें होतें. फार काय सांगावें ! जगांतील बहुतेक व्यवहार अनुमान प्रमाण घेऊन चालतो, व त्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. गणितशास्त्र, न्यायशास्त्र इ० ह्यांमध्यें अनुमानानें झालेल्या ज्ञानाचें केवढें अमर्याद भांडार आहे ह्याचा विचार केला असतां चार्वाकाचें म्हणणें बरोबर नाहीं अशी सहज खात्री होईल. जर चार्वाक आजरोजीं जिवंत असतां तर तो अनुमान प्रमाण मानितो किंवा नाहीं हें त्याच्या प्रत्येक क्षणाच्या वागणुकींत प्रत्यक्ष प्रमाणानें दाखवितां आलें असतें. आणखी कित्येक वेळीं बरोबर अनुमान

न केल्यामुळें ज्ञानांत चूक उत्पन्न होते म्हणून अनुमान प्रमाण घेऊं नये असें म्हणणेंही बरोबर नाहीं; कारण हा दोष प्रत्यक्ष प्रमाणासही लागू आहे. प्रत्यक्ष प्रमाणानेंही अनेक प्रसंगीं अनेक मनुष्यांमध्यें सत्यज्ञान न होतां भ्रांतिमूलक ज्ञान होतें. उदाहरणार्थ, दोरी पाहून साप आहे असें वाटतें, कांतीण चाललेली पाहून विंचू चालला आहे असें वाटतें, पाणी नसून मृगजल पहाण्यांत येतें, पितळ पाहून सोनें दिसतें, सूर्या-सभोंवतीं पृथ्वी फिरत नसून सूर्य पृथ्वी सभोंवतीं फिरतो असें दिसतें, कांहीं एक प्रकारचें गाणें गायिलेलें ऐकलें असतां कोणी रडतात असें ऐकूं येतें, एका दिशेला वाजंत्री वाजत असल्यास त्याच्या विरुद्ध दिशेस वाजत आहेत असें ऐकूं येतें, इत्यादि, असें केव्हां केव्हां भ्रांतीचें ज्ञान होतें. ह्या कारणानें जर प्रत्यक्ष प्रमाण टाकून देत नाहीं, तर जगांत ज्याचा उपयोग क्षणोक्षणीं होतो असें अनुमान प्रमाण कां टाका-वें ? म्हणून अनुमान प्रमाण सर्वांशीं टाकून दिलें पाहिजे असें म्हणणें ही चार्वाकाची अगदीं चूक आहे.

आतां, परमेश्वर आहे; व तो सर्व शक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वव्यापी, स्वतंत्र, अनादि व नित्य आहे, असें प्रत्यक्ष अथवा अनुमान प्रमाणानें दुसऱ्या उपनिषदावर आम्ही केलेल्या ग्रंथांत सिद्ध केलें आहे.

ह्याशिवाय परमेश्वर आहे ह्याविषयीं मुख्य व उत्तम प्रमाण श्रुति म्हणजे वेद आहे. वेदाचें प्रामाण्य घेण्यापूर्वीं त्याच्यासंबंधानें ज्या गोष्टीं-चा विचार केला पाहिजे त्या येणेंप्रमाणें—

१. वेद म्हणजे काय ?

२. वेद खरे आहेत किंवा खोटे आहेत ?

३. वेद कोणी केलेले आहेत कीं काय ?

४. वेद कोणी केले असल्यास ते मनुष्यानें केले आहेत किंवा पर-मेश्वरानें केले आहेत ?

५. वेद कोणी केलेले नसल्यास ते जगांत कसे व केव्हां आले ?

६. वेदाला प्रामाण्य कां?

७. वेद म्हणण्याचा अधिकार कोणाला आहे?

८. वेद पठण करण्याची रीति कशी आहे?

९. वेदाचा अर्थ कसा करावा?

१०. वेदांचे रक्षण करण्याची रीति काय आहे?

११. वेदाला जे स्वर आहेत ते काय आहेत? व त्यांचा उपयोग काय?

१२. वेदांचे आयुष्य किती? म्हणजे ते किती कालपर्यंत रहाणारे आहेत?

१३. वेदांत काय विषय आहे?

१४. वेदांचे विभाग काय काय आहेत? व ते कसे झाले?

१५. वेदांपासून फायदे काय आहेत, व वेदांची आवश्यकता काय आहे?

वेदांत असें लिहिलें आहे कीं, "**अष्टवर्षं ब्राम्हण मुपनयीत तमध्यापयीत**" म्हणजे आठ वर्षांच्या ब्राम्हणाची मुंज करावी, त्याजला वेद शिकवावा. पैंगि श्रुति अशी आहे कीं, "**नाग्निर्नयज्ञोनाक्रियान संस्कारोनव्रतानिशूद्रस्य**" म्हणजे शूद्राला अग्निहोत्र नाहीं, यज्ञ, क्रिया, संस्कार व व्रतें करणें नाहीं. आणखी स्मृति अशी आहे कीं, "**श्रवणेत्रपुजतुभ्यां श्रोत्रपरिपूरणं अध्ययने जिव्हाच्छेदः अर्थावधारणे हृदयविदारणं**" म्हणजे शूद्रांनीं वेद ऐकिले असतां लाख व शिसें कानांत ओतावें, अध्ययन केलें असतां जीभ कापावी व अर्थ समजून घेतल्यास हृदय फाडावें. ह्यास्तव जर वेद खरे असतील, तर ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य ह्याशिवाय इतरांस वेद सांगण्यास अधिकार नाहीं, व ब्राम्हण इत्यादि ह्यांनीं नीच जातीच्या लोकांना ऐकूं येण्यासारखे वेद म्हणूं नयेत, हें स्पष्ट आहे. जर वेद खोटे असतील, तर नीच जातीच्या लोकांनीं वेदाकडे लक्ष्य देणें योग्य नाहीं हें उघड आहे. सारांश

वेद खरे असोत किंवा खोटे असोत परंतु ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य ह्यांशिवाय इतर लोकांना वेद ऐकविणें किंवा त्याचें अध्ययन करविणें किंवा त्याचा अर्थ सांगणें योग्य नाहीं.

वेद खरे असोत किंवा खोटे असोत, परंतु वेद प्रगट झाले तेव्हां ते ज्या स्थितींत होते त्याच स्थितींत ते आज असण्याचा फार संभव आहे. कारण वेद बहुतकरून छंदोबद्ध आहेत, यजुर्वेदाचा कांहीं भाग मात्र गद्यरूप आहे. वेद तोंडानें पाठ म्हणण्याची चाल पूर्वापार चालत आलेली आहे. ब्राम्हणांशिवाय दुसऱ्यांना वेद म्हणण्याचा अधिकार नसत्यामुळें वेद ब्राम्हणांच्याच कबजांत होता. म्हणून वेदांत कमज्यास्तपणा होण्याचा संभव नाहीं, आणि ब्राम्हणांमध्यें सुद्धां वेदांविषयीं पूज्यबुद्धि असून तो शुद्ध म्हणण्याविषयीं काळजीपूर्वक नेहमीं अतिशय खबरदारी घेतात. ह्या कारणामुळें वेदांत फेरफार होण्याचा मुळींच संभव नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याशिवाय ही एक महत्वाची गोष्ट विचारात घेणें अवश्य आहे कीं, आलीकडे जशी लबाडी उत्पन्न झाली असून दिवसेंदिवस वाढत चाललेली आहे तशी लबाडी पूर्वीं मुळींच नव्हती. पूर्वींचे लोक धर्मानें व नीतीनें चालणारे होते, व धर्माच्या निर्बंधामुळें वाईट आचरणानें वागत नव्हते. आलीकडे दुष्ट संगतीच्या कारणानें धर्माकडे लक्ष कमी असून धर्मावरची श्रद्धा कमी होत चालली आहे, म्हणून धर्माचा निर्बंध लोक मानीत नाहींत. त्यामुळें ते धर्मभ्रष्ट होत असून खाणेंपिणें व व्यवहारांत वागणें हें धर्माविरुद्ध घडत आहे. पूर्वीं अशी स्थिति नसून चांगली स्थिति होती. हिंदुस्थानांत निरनिराळ्या जातींच्या लोकांमध्यें जातीसंबंधी जो निर्बंध धर्मशास्त्रानें केला आहे तो पूर्वीं पूर्णपणें अमलांत होता. परंतु हल्लीं तो निर्बंध कमी कमी होत चालला आहे. हल्लीं आपणास पंडित म्हणविणाऱ्या कित्येक ब्राम्हणांची धर्मसंबंधीं इतकी कुत्सित कल्पना झाली आहे कीं, ते वेदाची हरएक प्रकारें निंदा करितात. ह्याप्रमाणें ह्या

देशाची स्थिति होत आहे. परदेशचे लोक वेद हा फार प्राचीन काळचा उत्तम व खरा ग्रंथ असून तो ज्ञानाचें भांडार आहे असें समजतात, व त्याचा होईल तितका फैलाव करण्यास झटतात, व त्याविषयीं ते अनेक प्रकारचे शोध करीत आहेत, आणि ज्या ब्राम्हणांचा तो ग्रंथ आहे त्यांना त्याप्रमाणें वागणूक करीत नाहींत व परदेशच्या लोकांच्या गैरचालीप्रमाणें वर्तन करितात म्हणून दूषण देत आहेत. ह्याप्रमाणें हल्लींची स्थिति असून पूर्वीं तशी नव्हती. ह्या सर्व कारणांमुळें ह्या पूर्वीं वेदांत फेरफार होण्याचा संभव नव्हता. ह्याच कारणांमुळें वेदांत इतर ग्रंथांप्रमाणें पाठभेद नाहींत.

वेद तोंडपाठ करण्याची वहिवाट आहे. वेदास श्रुति म्हणतात. श्रुति ह्या शब्दाचा अर्थ जें ऐकिलें तें. वेद पाठ करण्याची वहिवाट असल्यामुळें वेदाचें उत्तम प्रकारें संरक्षण होतें. जर वेद तोंडपाठ करण्याची वहिवाट नसून नुसते ग्रंथ असते, तर त्यास कीड लागून अथवा अशाच दुसऱ्या प्रकारें त्यांचा नाश झाला असता, शत्रूंनीं त्यांचा नाश केला असता, दरोड्यांत ग्रंथ गेले असते, राज्यक्रांतीमध्यें गोंधळ होऊन त्यांची अव्यवस्था झाली असती इ०. परंतु ब्राम्हणांच्या स्मृतींत वेद असल्यामुळें तशा रीतीनें त्यांचा नाश होऊं शकत नाहीं. ह्याशिवाय वेदाच्या पोथ्यांचा नाश केला किंवा वेद जाणणारे असे सर्व ब्राम्हण मारून टाकिले तरी वेदाचा म्हणून नाश होऊं शकत नाहीं. पुढें असें सिद्ध केलें आहे कीं, **वेद हे मनुष्यानें केलेले नाहींत व ईश्वरानेंही केलेले नाहींत.** असें असतां ह्या पूर्वीं वेद ज्या रीतीनें जगांत प्रगट झाले त्या रीतीनें पुनः प्रगट होऊं शकतील. सारांश, वेद हे नित्य आहेत.

ज्ञानाच्या स्वरूपावरून त्याचे दोन प्रकार आहेत—१ **सत्य** म्हणजे खरें आणि २ **मिथ्या** म्हणजे खोटें. उदाहरणार्थ, तीन व पांच मिळून आठ होतात हें सत्य ज्ञान आहे; आणि तीन व पांच मिळून

जऊं म्हणणें हें मिथ्या ज्ञान आहे. आणखी ज्या ठिकाणीं ज्ञान राहतें त्यासंबंधानें ज्ञानाचे दोन प्रकार आहेत—१ **ईश्वरबुद्धिस्थ** म्हणजे परमेश्वराच्या बुद्धींत असणारें, आणि २ **इतरबुद्धिस्थ** म्हणजे मनुष्य इत्यादि प्राण्यांच्या बुद्धींत असणारें. परमेश्वर सर्वज्ञ आहे, म्हणजे त्याला माहीत नाहीं असें कांहीं नाहीं, आणि ज्यास सर्व माहिती असतें त्याला भलतें ज्ञान होत नाहीं. म्हणून परमेश्वरामध्यें कोणत्याही प्रकारचें अज्ञान किंवा मिथ्या ज्ञान संभवत नाहीं. म्हणून ईश्वरबुद्धिस्थ सर्वज्ञान सत्यज्ञान असलें पाहिजे. परमेश्वर जेव्हांपासून आहे तेव्हांपासून ईश्वर-बुद्धिस्थ ज्ञान असलें पाहिजे. परमेश्वर अनादि आहे, म्हणून ईश्वर-बुद्धिस्थ ज्ञान अनादि आहे. परमेश्वर नित्य आहे, म्हणून ईश्वरबुद्धि-स्थ ज्ञान नित्य आहे. आतां मनुष्य व इतर प्राणी हे अल्पज्ञ आहेत. त्यांना सर्व गोष्टींचें सत्यज्ञान नाहीं. म्हणून त्यांना अज्ञान व मिथ्याज्ञान हींहि आहेत. मनुष्य जन्मल्यापासून त्याच्या इंद्रियांनीं त्याला ज्ञान होऊं लागतें. म्हणून त्याचें ज्ञान अनादि नाहीं.

वेदांमध्यें ईश्वरासंबंधी ज्ञान आहे. वेदांत असें सांगितलें आहे कीं, जगाच्या पूर्वीं परमेश्वर एकटाच होता[१]; त्याला असें वाटलें कीं, आपण बहुतप्रकारें प्रजा उत्पन्न करावी[२]; परमेश्वर सर्वव्यापी, सर्वज्ञ व सर्वशक्ति-मान आहे[३]. आतां जर एखाद्या मनुष्यास मुलगा झाला, तर त्याला त्या

---

१ आत्मावा इदमग्र आसीदिति शिक्षावल्ल्यां । सदेव सौम्य इदमग्र आसीदिति छांदोग्ये ।

२ सोकामयत बहुस्यां प्रजायेयेतीति ब्रम्हवल्ल्यां । इच्छामात्रं प्रभोः सृष्टिरिति मांडुक्ये ।

३ यच्च किंचिज्जगत्सर्वं दृश्यते श्रूयतेपि वा अंतर्बहिश्चतत्सर्वं व्याप्य नारायणःस्थि-त इति नारायणोपनिषदि । भीषास्माद्वातः पवत इति ब्रम्हवल्ल्यां । यः सर्वज्ञः सर्ववित् यस्य ज्ञानमयं तपः सर्वेत्तिवेद्यं तत्सर्वं नान्यस्तस्यास्ति वेदिता इति ।

एकोदेवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मेतिश्वेताश्वतरे ।

मुलाविषयींचें ज्ञान तो मुलगा उत्पन्न झाल्यापासून असतें, आणि त्यापूर्वी नसतें. ह्याचप्रमाणें जेव्हांपासून परमेश्वर आहे तेव्हांपासून त्याच्यासंबंधी ज्ञान असलें पाहिजे. परमेश्वर अनादि आहे. म्हणून परमेश्वरासंबंधी ज्ञान अनादि असलें पाहिजे. आणखी, परमेश्वर सर्वज्ञ असल्याकारणानें त्याच्यासंबंधी ज्ञान त्याच्या बुद्धिस्थ असलें पाहिजे. परमेश्वर अनादि असल्याकारणानें त्याची बुद्धिही अनादि आहे. म्हणून ईश्वरबुद्धिस्थ परमेश्वरसंबंधी ज्ञानही अनादि आहे. आणखी, सर्व सत्यज्ञान ईश्वरबुद्धिस्थ आहे, म्हणून वेदांत जेवढें सत्यज्ञान असेल तेवढें सर्व ईश्वरबुद्धिस्थ असून अनादि आहे.

आतां, गणितशास्त्र, व्याकरणशास्त्र, वैद्यशास्त्र, वेदांतशास्त्र, इ० ह्यांमध्यें जें सत्यज्ञान आहे तें सर्व जरी ईश्वरबुद्धिस्थ, नित्य व अनादि आहे, तरी त्या सर्वांत वेद हा अतिशय श्रेष्ठ व अतिशय पूज्य आहे. कारण सर्व विद्येमध्यें ब्रम्हविद्या अतिशय श्रेष्ठ आहे. सर्व विद्यांमध्यें ब्रम्हविद्येंत परमेश्वराची विभूति आहे. भगवद्गीतेच्या १० व्या अध्यायांत ३२ वा श्लोक असा आहे कीं,—

सर्गाणामादिरंतश्च मध्यंचैवाहमर्जुन ॥
अध्यात्मविद्याविद्यानां वादःप्रवदतामहं ॥ ३२ ॥

ह्याचा अर्थ असा आहे कीं, हे अर्जुना, सृष्टीचा आदि, मध्य, व अंत म्हणजे उत्पत्ति, स्थिति व लय ह्यांत माझी विभूति आहे; सर्व विद्यांमध्यें अध्यात्मविद्येंत माझी विभूति आहे; आणि सर्व बोलण्यामध्यें वादांत माझी विभूति आहे. वेदामध्यें अध्यात्मविद्या आहे. म्हणून वेदामध्यें परमेश्वराची विभूति आहे.

आतां, जसें वेदांत असलेलें सत्यज्ञान ईश्वरबुद्धिस्थ, नित्य, अनादि व अतिशय श्रेष्ठ आणि अतिशय महत्वाचें आहे, तसें जर इतर लोकांमधील परमेश्वराच्या ज्ञानासंबंधी ग्रंथ, म्हणजे उदाहरणार्थ मुसलमानांचें

कुराण, पारशांचे झेंडावेस्टा, ख्रिश्चन लोकांचें बैबल्, इ० हे खरे असतील, तर त्यांतील सत्यज्ञान ईश्वरबुद्धिस्थ नित्य, अनादि व अतिशय श्रेष्ठ आणि अतिशय महत्वाचें आहे, आणि तेही ग्रंथ वेदाच्याच योग्यतेचे आहेत ह्यांत संशय नाहीं. तथापि ब्राम्हणांनीं आपला वेदोक्त धर्म सोडून दुसऱ्या ग्रंथांतील धर्म स्वीकारूं नये. ह्याविषयीं गीतेच्या ३ ऱ्या अध्यायांत ३५ वा श्लोक असा आहे कीं—

**श्रेयान्स्वधर्मोविगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥**
**स्वधर्मेनिधनंश्रेयः परधर्मोभयावहः ॥ ३५ ॥**

ह्याचा अर्थ असा आहे कीं, दुसऱ्याचा धर्म चांगल्या रीतीनें अनुष्ठित असेल व आपल्या धर्मांत कमीपणा असला तथापि दुसऱ्याच्या धर्मापेक्षां आपला धर्म कल्याणकारक आहे; आपल्या धर्मानें चालून मरण आलें तरी तें कल्याणकारक आहे; दुसऱ्याच्या धर्मानें चालणें भयकारक आहे. ह्याविषयीं व्यावहारिक उदाहरण असें आहे कीं, जरी उंदीर खाणें हें मांजरांस कल्याणकारक आहे, व विष्टा खाणें हें कुत्र्यांस व डुकरांस कल्याणकारक आहे, तरी हें मनुष्यास सुखकारक नाहीं. ह्यास्तव जो ज्या धर्मांत जन्मलेला असेल त्यानें कोणत्याही ठिकाणीं व कोणत्याही वेळीं व कोणत्याही कारणानें आपला धर्म सोडून दुसऱ्याचा धर्म घेऊं नये. येवढेंच नाहीं, तर आपला धर्म स्वीकारण्यास परधर्माच्या लोकांना प्रवृत्त करणें ह्यासारखा अधर्म व अधमपणा दुसरा नाहीं. विशेष लोकांकरितां विशेष कारणास्तव विशेष प्रकारचा धर्म केला असल्यामुळें त्या विशेष लोकांस तो विशेष धर्मच सर्वप्रकारें हितकारक असतो.

जर परमेश्वरानें जग उत्पन्न केलें आहे, जगांत परमेश्वराच्या ज्ञानास योग्य अधिकारी अशीं मनुष्यें आहेत, परमेश्वराच्या ज्ञानानें मोक्षरूप उत्तम सुख मनुष्यास प्राप्त होण्यासारखें आहे, तर आपणाविषयींचें ज्ञान मनुष्यांना होऊन त्यांना मोक्ष मिळावा अशी इच्छा परमेश्वराला असणें स्वाभाविक आहे. परमेश्वरास अशी इच्छा असल्यानंतर तो आपणावि-

षयींचें ज्ञान प्रगट करील हेंही उघड आहे. मनुष्यांमध्यें ज्ञान प्रगट करण्याच्या ज्या रीती आहेत त्या अशा कीं, तोंडानें सांगणें, लिहून दाखविणें, खुणेनें सुचविणें, इत्यादि. परमेश्वर सर्वशक्तिमान असल्यामुळें दुसऱ्यास ज्ञान देण्याविषयीं मनुष्यांमध्यें ज्या रीती आहेत त्या रीती सोडूनही तो केवळ आपल्या इच्छेनें दुसऱ्यास ज्ञान देण्यास समर्थ आहे.

हिंदुस्थानांत ज्या भाषा पूर्वीं होत्या व ज्या भाषा हल्लीं आहेत त्या सर्वांमध्यें संस्कृत भाषा फार प्राचीनची आहे. परदेशांत झेंड किंवा पेहेलवी, गाथिक्, ल्याटिन्, ग्रीक्, सेल्टिक इत्यादि फार प्राचीनच्या ज्या उत्तम भाषा आहेत, त्यांत संस्कृत भाषेंतील शब्द आढळतात. एकाच अर्थाच्या शब्दांचें कोष्टक खालीं दिलें आहे त्यावरून स्पष्ट ध्यानांत येईल.

| संस्कृत. | ग्रीक्. | ल्याटिन्. |
|---|---|---|
| पितृ | प्याटर | प्याटर |
| मातृ | मीटर | म्याटर |
| भ्रातृ | फ्राट्रिआ | फ्याटर |
| दुहितृ | थुगेटर | — |
| नासा | — | नेसस् |
| मूष | मूस | मूस |
| दिव्य | डिआस | डिव्हस् |
| तारा | आस्टर | आस्ट्रम् |
| द्वि. | ड्युओ | ड्युओ |
| त्रि | ट्रीस् | ट्रेस् |
| सप्त | हेप्टा | सेप्टेम् |
| दश | डेका | डिसेम् |

पृथ्वीवर आज सुमारें ९०० भाषा आहेत. आपल्या देशांतील व परदेशांतील विद्वान असें कबूल करितात कीं, संस्कृत भाषा ही अगदीं प्राचीनची आहे. ह्यावरून त्या भाषा संस्कृत भाषेनंतरच्या आहेत असें स्पष्ट होतें. जर ब्राम्हणांमध्यें संस्कृत भाषा फार प्राचीनची आहे, व वेद ब्राम्हणांना सांगावा अशी परमेश्वरास इच्छा झाली, तर तो साक्षात् आपण किंवा ब्रम्हदेवासारख्या दुसऱ्याच्या द्वारानें[१] ब्राम्हणांस वेद त्या भाषेंत प्रगट करील हें स्वाभाविक आहे. म्हणून "अग्निमीळे" इत्यादि रूपानें आज जे वेद आहेत तेच परमेश्वरानें आपण प्रगट केलेले किंवा दुसऱ्याकडून प्रगट करविलेले आहेत असें होतें. वेद मनुष्याला प्रगट होण्यापूर्वीं ते ईश्वरबुद्धिस्थ "अग्निमीळे" इत्यादि रूपानें होते असें म्हणणें भाग आहे. कारण, असें ह्मटलें नाहीं तर परमेश्वराच्या सर्वज्ञपणाला कमीपणा येणार आहे.

ईश्वरबुद्धिस्थ अनादि असलेले वेद परमेश्वरानें केले आहेत असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण तसें म्हटलें असतां वेद अनादि नाहींत असें सिद्ध होईल. आतां एवढाच विचार केला पाहिजे कीं, जे वेद अनादि असून ईश्वरबुद्धिस्थ होते ते दुसऱ्यास कसे समजले?

जर वेद खरे असतील, तर त्यांत असें सांगितलें आहे कीं, परमेश्वरानें प्रथम ब्रम्हदेवाला उत्पन्न केलें व त्याला वेद शिकविलें[२], नंतर ब्रम्हदेवाच्या मुखांतून वेद निघाले[३], पुढें ब्रम्हदेवानें आपल्या मुलांना

१ म्याक्समूलर्स लेक्चर्स ऑन् सायन्स आफ् ल्यांग्वेज् व्हॉ० फर्स्ट; वुइल्यम ब्ल्याक्वुड ॲंड् सन्स् ह्यांनीं छापलेली डाक्तर वुइल्सनूस् इंडियन क्यास्ट ह्या नांवाचें बुकाचें पृष्ट ७६ पहा.

१ ब्रह्मादेवानां प्रथमः संबभूवेति सहवायुपनिषादि । यो वै ब्रम्हाणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मैतंहदेवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्य इतिश्रुत्यंतरं च ।

२ सतया वाचा तेन आत्मनाइदं सर्वमसृजत यदिदं किं चर्चोयजूंषि सामानिछंदांसि यज्ञान् प्रजाः पशूनिति बृहदारण्ये ।

शिकविले. अशा परंपरेनें वेद आजपर्यंत चालत आलेले आहेत. जर येथें कोणी असें म्हणेल कीं, चार तोंडाचा ब्रम्हदेव होता हीच गोष्ट असंभाव्य व अशक्य आहे, तर हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण हल्लींसुद्धां मनुष्याचें दोन तोंडांचें मूल व गाईचें दोन तोंडांचें वासरूं एखादे वेळेस पाहण्यांत येतें. सुमारें चार वर्षांपूर्वीं एका मनुष्यानें पुण्यांत गाईचें वासरूं आणिलें होतें, त्यास सहा तोंडें असल्याचें आम्हीं व पुण्यांतील दुसरे लोकांनीं प्रत्यक्ष पाहिलें. जरी असे प्राणी हल्लीं फार विरळा आढळतात, तरी तसे प्राणी होऊं शकणार नाहींत असें नाहीं. ह्याशिवाय भूगर्भशास्त्रावरून असें समजतें कीं, पृथ्वीवर निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या आकाराचे व निरनिराळ्या महत्वाचे प्राणी होते. ह्याशिवाय सृष्टि उत्पन्न करणारा परमेश्वर सर्व शक्तिमान आहे, तर त्यास कोणत्याही प्रकारची सृष्टि उत्पन्न करण्यास कोणतीही हरकत नाहीं. मनुष्य हा यःकश्चित् प्राणी असून त्याच्या अल्पबुद्धीला परमेश्वराची अघटित घटनेची कल्पनासुद्धां यावयाची नाहीं.

हल्लीं आपणांस जे वेद आढळतात ते लिहिलेल्या पोथ्यांचे रूपानें अथवा तोंडपाठ म्हणणाऱ्या ब्राम्हणांच्या रूपानें आढळतात. वेदाच्या पोथ्या पाहिल्या असतां असें मनांत येतें कीं, पोथीचे कागद कोणा मनुष्यानें चिंध्या कुटून केले असले पाहिजेत, ज्या लेखणीनें पोथी लिहिली ती कोणा मनुष्यानें चाकूनें केलेली असली पाहिजे, पोथीची शाई कोणा मनुष्यानें लाख शिजवून तयार केली असली पाहिजे, कागदावर जीं अक्षरें दिसतात तीं कोणी तरी मनुष्यानें लिहिलेलीं असलीं पाहिजेत, जो ब्राम्हण तोंडानें वेद म्हणतो त्यास कोणी तरी मनुष्यानें ते शिकविले असले पाहिजेत, आणखी कोणताही ग्रंथ मनुष्यकर्तीशिवाय उत्पन्न झाल्याचें आढळत नाहीं. ह्यावरून जर कोणी असें म्हणेल कीं, वेद मनुष्यानें केलेले आहेत, तर हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण—

१. जो कोणी वेद मनुष्यानें केले आहेत असें म्हणेल त्यानें तसें सिद्ध करून दाखविलें पाहिजे. असें असून तसें कोणी सिद्ध केलें नाहीं.

२. वर असें सिद्ध केलें आहे कीं, वेदांत ईश्वरासंबंधीं ज्ञान असून ते परमेश्वरानें पण केलेले नाहींत. जर वेद करणें परमेश्वरास अशक्य आहे, तर ते मनुष्यानें करणें अशक्य आहे हें काय सांगावें! कारण परमेश्वराच्या बुद्धीपुढें मनुष्याची बुद्धि कांहींच नाहीं. मनुष्य अल्पज्ञ असल्यामुळें त्याला वेदांत असलेलें ज्ञान वेदावांचून होणें शक्य नाहीं. एकंदर महाकालाच्यासंबंधानें मनुष्याचें १०० वर्षांचें आयुष्य शून्याप्रमाणें आहे. मनुष्याला अनेक जन्म असून त्यास साधारणपणें पूर्वींच्या जन्मांतलें ज्ञान पुढील जन्मांत नसतें. मनुष्यास साधारणपणें ज्या प्रदेशांतील ज्ञान होण्यासारखें असतें तो प्रदेश एकंदर अनंत आकाशापुढें केवळ शून्याप्रमाणें आहे.

३. वर असें सिद्ध केलें आहे कीं, वेदांतील ज्ञान अनादि आहे. म्हणून जर मनुष्यानें वेद केले आहेत असें म्हटलें, तर ते अनादि नाहींत असें होईल.

४. जग उत्पन्न होण्यापूर्वीं प्रथम परमेश्वर एकटाच होता; नंतर परमेश्वरानें जग बहुत प्रकारें उत्पन्न करण्याची इच्छा केली; नंतर त्यानें अमुक प्रकारें जग उत्पन्न केलें असें ऐतरेय उपनिषदांत सांगितलें आहे. तसेंच ऋग्वेद संहितेंत असें सांगितलें आहे कीं, "**धाता-यथा पूर्वमकल्पयत्**"[1] म्हणजे ब्रम्हदेवानें पूर्वींप्रमाणें सृष्टि केली. कृतयुगांत १७२८००० वर्षें आहेत. त्रेतायुगांत १२९६००० वर्षें आहेत. द्वापारयुगांत ८६४००० वर्षें आहेत. कलियुगांत ४३२००० वर्षें आहेत. ह्या चार युगांचा मिळून एक पर्यय होतो. असे एक हजार पर्यय झाले म्हणजे ब्रम्हदेवाचा सकाळपासून संध्याकाळपर्यंतचा अर्धा दिवस होतो. तितकीच पुढें रात्र. ह्याप्रमाणें दिवस व रात्र मिळून जो

१ ऋग्वेदसंहिता, अष्टक ८ अध्याय ८ वर्ग ४८.

ब्रम्हदेवाचा एक दिवस होतो त्यास कल्प असें म्हणतात. ह्याप्रमाणें ३६० कल्प म्हणजे ब्रम्हदेवाचें एक वर्ष. ह्या मानानें ब्रम्हदेवाचें आयुष्य शंभर वर्षांचें आहे. नवीन कल्पास आरंभ झाला म्हणजे नवीन सृष्टि चालू होते. म्हणून जर वेद खरे असतील, तर अशा गोष्टी मनुष्यास स्वतंत्रपणें समजणें अशक्य आहे. जगाचा खरा इतिहास लिहिण्यास दगडावरील लेख, प्राचीन कागदपत्र, नाण्यावरील लेख, मृत्तिका व दगड ह्यांच्या थरांचे क्रम, अथवा त्यांत सांपडणाऱ्या वनस्पती व प्राणी इत्यादि जशीं मनुष्यांस साधनें आहेत तशीं जग उत्पन्न होण्यापूर्वीचा खरा इतिहास कळण्यास मनुष्यास साधनें नाहींत.

५. पूर्वीं असें सिद्ध केलें आहे कीं, वेदांतील सर्व सत्यज्ञान ईश्वरबुद्धिस्थ आहे. ह्यावरून मनुष्य जगांत उत्पन्न होण्यापूर्वीं जें ईश्वरबुद्धिस्थ ज्ञान होतें तें जगांत मनुष्य उत्पन्न झाल्यावर मनुष्यानें केलें असें म्हणणें अप्रयोजक आहे.

६. जर वेद कोणा मनुष्यानें केलेले असते, तर कर्त्ता म्हणून तो आपलें नांव कां घालणार नाहीं? जर कर्त्ता असता, तर त्याला आपलें नांव न घालण्याला कांहीं कारण नाहीं. वेद हा ग्रंथ अशा प्रकारचा नाहीं कीं, कर्त्यानें त्यावर नांव घातलें तर त्याच्या नांवाला काळोखी लागेल. वेदामध्यें अनेक प्रकारची व मोठे महत्वाची इतकी विद्या भरली आहे आणि त्यावर कर्त्ता म्हणून नांव घालणें इतकी अब्रूची गोष्ट आहे कीं, जर खरोखर कर्त्ता असता, तर तो आपलें नांव घातल्यावांचून कधींही राहिला नसता. आणखी, वेदाशिवाय दुसरा ग्रंथ पाहतां ग्रंथकर्त्ते आपलें नांव ग्रंथांवर घालतात अशी वाहिवाट फार प्राचीन काळापासून दिसून येते.

७. वेदांमध्यें अनेक प्रकारच्या विद्या पूर्णपणानें व बिनचूक रीतीनें सांगितल्या आहेत; आणि त्यांत भूत, वर्त्तमान व भविष्य अशा तिन्ही काळांचा वृत्तांत दिलेला आहे. म्हणून वेद हे मनुष्याच्या ज्ञानशक्तीच्या

बाहेर आहेत. पृथ्वीवर मनुष्य उत्पन्न झाल्यापासून आजपर्यंत अनेक विद्वान होऊन गेले, परंतु वेदाच्या मासल्याचा एखादा लहानसा ग्रंथसुद्धां मनुष्याकडून करवला नाहीं व पुढें तसा ग्रंथ मनुष्याकडून होण्याचा संभवही दिसत नाहीं.

८. जर वेदाचा कर्त्ता कोणी मनुष्य होता, तर तो मोठा विद्वान् असून प्रसिद्ध असला पाहिजे. अशा मनुष्यानें ग्रंथ प्रसिद्ध करून जरी आपलें नांव कपटानें छपवून ठेविलें तरी तें दुसऱ्यांना समजल्यावांचून राहिलें नसतें.

९. वेदासारख्या उत्तम व अद्वितीय ग्रंथाचा कर्त्ता म्हणून कोणा मनुष्याचें नांव जोडण्याजोगें असेल, तर तो मनुष्य आपल्याला भूषण समजून आपलें नांव लावल्यावांचून कधींही राहिला नसता, कारण अशा रीतीनें त्याचें नांव अजरामर होणार आहे.

१०. वेद कोणा मनुष्यानें केलेले असून कपटानें आपलें नांव प्रसिद्ध केलें नाहीं असें म्हणावें, तर हें कपट इतके दिवसपर्यंत झांकून कसें राहील ! हल्लीं मात्र मोठे विद्वान लोक होत नाहींत. येवढेंच नाहीं, तर पूर्वींच्या विद्वानांचे ग्रंथ समजणारेही क्वचित्च आढळतात. अशी प्राचीन स्थिति असतां त्या वेळच्या विद्वानांपैकीं कोणीं तरी असें कपट बाहेर आणिल्यावांचून राहिलें असतें काय ! आज रोजीं तरी असें कपट सिद्धीस नेतां येण्यासारखें आहे काय ! वेदासारख्या उत्कृष्ट व सर्वमान्य ग्रंथाचे बाबतींत तर ग्रंथकर्त्याचें नांव हटकून प्रसिद्धीस आलें असतें.

११. जर असें मानिलें कीं, कोणा एका मनुष्यानें वेद केले त्या वेळीं बाकीचे सर्व लोक इतके अज्ञाणी होते कीं, ग्रंथ म्हणजे काय व ग्रंथकर्त्ता म्हणजे कोण हें सुद्धां त्यांना समजत नव्हतें, म्हणून एकाद्या मनुष्यानें ग्रंथ करून आपलें नांव लिहिलें नाहीं किंवा आपलें नांव छपविलें आणि हें कपट झांकून राहिलें; तर अशा अज्ञाणी लोकांमध्यें वेदासारखा उत्तम

आणि सर्वांस सर्वकालीं मान्य होणारा असा ग्रंथ करणारा कोणी मनुष्य होणें असंभाव्य आहे. किंबहुना अशक्य आहे असें म्हटलें असतां चालेल.

१२. जसें हिंदु लोक वेदाविषयीं म्हणतात, तसेंच मुसलमान लोक कुराणाविषयीं, ख्रिश्चन् लोक बायबलाविषयीं, पारशी लोक झेंडावेस्टाविषयीं म्हणतात. ह्याप्रमाणें निरनिराळे लोक आपापले धर्मपुस्तकाविषयीं असें म्हणतात कीं, तें मनुष्यकृत नाहीं. जर हें कपट म्हणावें, तर इतक्या लोकांच्या डोळ्यांत पूर्वींपासून आजपर्यंत माती कशी पडली?

१३. वेदांत ऋषींचीं भाषणें दिलीं आहेत. त्यांजवरून ऋषींच्या उत्पत्तीनंतर वेद झाले आहेत असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण सर्वज्ञ ईश्वरास पुढें होणाऱ्या ऋषींचीं पुढें होणारीं भाषणें व कृत्यें ते ऋषि होण्यापूर्वीं वेदरूपानें प्रकट करणें अशक्य नाहीं.

१४. जर कोणी अशी शंका घेईल कीं, वेदामध्यें विरुद्ध वचनें आहेत म्हणून वेद मनुष्यानें केला आहे, तर ह्याचें उत्तर असें आहे कीं, वेदांत विरुद्ध वचनें आहेत असें म्हणणें हेंच चुकीचें आहे. शंकराचार्य व मध्वाचार्य ह्यांनीं आपापले ग्रंथांत कित्येक विरोध परिहार करून दाखवून त्याचप्रमाणें दुसरे विरोध परिहार करावे म्हणून दिग्दर्शन केलें आहे. तसेंच ब्रम्हसूत्राच्या दुसऱ्या अध्यायांत विरोध परिहार सांगितले आहेत. ह्यावरून ही शंका निराधार आहे असें ठरतें.

१५. वेदामध्यें सांगितलेलीं कांहीं कृत्यें मनुष्याच्या शक्तीबाहेर असून तीं ईश्वरीघटनेवांचून व्हावयाचीं नाहींत. जर वेद खरे असतील, तर मनुष्याकडून व्हावयाचीं नाहींत अशीं वेदांत असलेलीं सर्व कृत्यें त्यानें आपल्या अल्प बुद्धीच्या योगानें खऱ्या प्रकारें लिहून ठेविलीं असें म्हणणें बरोबर नाहीं.

ह्या वेळपर्यंत वेदाविषयीं जें सांगितलें आहे तें सर्व वेद खरे आहेत कीं काय ह्यावर अवलंबून आहे. म्हणून आतां वेदांत जें सांगितलें आहे तें खरें आहे किंवा खोटें आहे ह्याविषयीं विचार करणें अवश्य

आहे. वेदांत जें सांगितलें आहे तें सर्व सत्य आहे असें मानण्यास जीं कारणें आहेत तीं येणेंप्रमाणें—

१. जर वेद मनुष्यानें केलेले नाहींत, तर त्यांत अज्ञान किंवा मिथ्याज्ञान असण्याचा संभव नाहीं.

२. जर वेदांत ईश्वरबुद्धिस्थ ज्ञान आहे, तर वेद सत्य असला पाहिजे.

३. इतर कांहीं विचार न करितां केवळ उपनिषदांतील विषयांचा विचार केला असतां असें आढळतें कीं, जसें अंकगणितांतील विषय खरा असल्याविषयीं अंकगणित हेंच स्वतःसिद्ध प्रमाण आहे, तसें वेद खरा आहे ह्याविषयीं उपनिषदें स्वतःसिद्ध प्रमाण आहेत.

४. व्यवहारामध्यें असें आहे कीं, जर कोणी मनुष्य कांहीं गोष्टी बोलला आणि त्या खऱ्या आढळल्या, तर त्या मनुष्याचा खोटेपणा आढळे तोंपर्यंत तो खरा आहे असें समजतात. त्याचप्रमाणें जर वेदांत कांहीं गोष्टी खऱ्या आढळल्या, तर त्यांत एखादी गोष्ट खोटी आढळे तोंपर्यंत तो खरा आहे असें मानिलें पाहिजे.

५. चार्वाक व दुसरे नास्तिक हे प्रत्यक्ष प्रमाणाशिवाय दुसरें प्रमाण मानीत नाहींत. तेही वेद खोटा आहे असें प्रत्यक्ष प्रमाणानें दाखवूं शकत नाहींत.

६. आजपर्यंत मोठे मोठे विद्वान् झाले, परंतु त्यांपैकीं कोणीही वेदांत अमुक भाग खोटा आहे असें सिद्ध करून दाखविलें नाहीं.

७. स्मृति, पुराणें, व्याससूत्रें, इत्यादि उत्तम ग्रंथांचे कर्ते श्रुति खरी मानून तिचा आधार घेतात. म्हणून " **महाजनोयेन गतः सपंथाः** " ह्या नियमास अनुसरून चाललें असतां श्रुति खरी समजून चालणें योग्य आहे. व्यवहारांतही ह्याचप्रमाणें आपण पावलोपावलीं वागतों. उदाहरणार्थ, नदी उतरून जाणें झाल्यास " नदीला उतार कोठें आहे "

असें वृद्ध मनुष्यास विचारून नंतर नदींत पाऊल टाकितों. कोणत्याही एका बाबतींत जाणतीं व म्हातारीं मनुष्यें ज्याप्रमाणें वागतात ती वागणूक खरी समजून त्याप्रमाणें आपण वागतों. इत्यादि.

८. शेवटीं ही गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं, प्रत्येक गोष्टीचा आपण स्वतः अनुभव घेऊं तेव्हां ती खरी मानूं असें म्हणून व्यवहार चालत नाहीं.

९. आज रोजीं भूगर्भशास्त्र, ज्योतिषशास्त्र, इत्यादि शास्त्रांमध्यें ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्यांचा वेदाशीं अगदीं विरोध नाहीं. एवढेंच नाहीं, पण जगाची उत्पत्ति कशी झाली, केव्हां झाली, इत्यादि अर्वाचीन काळीं पक्केपणें शोधून काढलेल्या गोष्टींचा वेदांत सांगितलेल्या गोष्टींशीं विरोध येत नाहीं. उलटें नवीन नवीन जे चमत्कारिक शोध खऱ्या प्रकारें लागतात त्यांशीं व वेदांत लिहिलेल्या विषयांशीं पूर्णपणें मेळ पडतो.

१०. हिंदुस्थानांत आजपर्यंत जे मोठमोठे आस्तिक विद्वान झाले व हल्लीं आहेत ते सर्व वेद खरे आहेत असें समजतात. येवढेंच नाहीं, तर परदेशांतील परधर्माचे लोकही वेद सत्य समजून त्यास पूज्य मानितात.

११. परमेश्वरानें वेद दुसऱ्यास सांगितले. तो यथार्थ वक्ता आहे. म्हणून त्याचें वाक्य खरें आहे.

आतां, वेदाला प्रामाण्य असण्याचीं कारणें येणेंप्रमाणें—

१. वेदांतील ज्ञान ईश्वरबुद्धिस्थ आहे.

२. वेद ईश्वरप्रणीत आहेत. ईश्वर यथार्थ वक्ता आहे. जो यथार्थ वक्ता तो आप्त असतो. नियम असा आहे कीं, "आप्तवाक्यं प्रमाणं."

३. बहुत कालापासून अनेक कालचे व अनेक देशाचे आस्तिक मताचे अनेक विद्वान् लोक वेदाला उत्तम ग्रंथ समजून प्रामाण्य मानितात.

४. वेदांत अमुक गोष्ट खोटी असल्यामुळें त्यास प्रामाण्य नाहीं असें कोणीही दाखवूं शकत नाहीं.

पृथ्वीवर वेद चार आहेत—१ **ऋग्वेद**, २ **यजुर्वेद**, ३ **सामवेद**, आणि ४ **अथर्वणवेद**. ऋग्वेद ब्रम्हदेवाच्या पूर्व मुखांतून निघाला असून त्याचा उपवेद **आयुर्वेद** आहे. हा वेद आपल्या उपवेदासहित सत्यलोकीं सर्वदा मूर्तिमान् असतो. यजुर्वेद ब्रम्हदेवाच्या दक्षिण मुखांतून निघाला असून त्याचा उपवेद **धनुर्वेद** आहे. सामवेद ब्रम्हदेवाच्या पश्चिम मुखांतून निघाला असून त्याचा उपवेद **गांधर्ववेद** आहे. अथर्वणवेद ब्रम्हदेवाच्या उत्तर मुखांतून निघाला असून त्याचा उपवेद **स्थापत्य** म्हणजे शिल्पादिक विद्या आहे. ऋग्वेद इत्यादि चार वेदांमध्यें मुख्य ऋग्वेद आहे. मुख्यत्वेंकरून ऋग्वेदांतील ऋचा बाकींच्या तीन वेदांत आहेत. चारी वेदांना मिळून श्रुति म्हणतात. श्रुति म्हणजे जें ऐकिलें तें. ह्यावरून असें अनुमान होतें कीं, जेव्हां वेद प्रसिद्ध झाले अथवा मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं पाहिले तेव्हां ते लिहिलेले नव्हते. श्रुतीमध्यें तीन भाग आहेत—१ **संहिता**, २ **ब्राम्हण**, व ३ **आरण्यक**. संहिता म्हणजे मूळ वेदमंत्र; ब्राम्हण म्हणजे त्यावर टीकेप्रमाणें व्याख्यान; आणि आरण्यक म्हणजे उपनिषदें इत्यादि. प्रत्येक वेदाची संहिता निरनिराळी आहे. ह्याशिवाय पद, क्रम, जटा, घन, असे तिचे भेद आहेत. प्रत्येक वेदाचीं ब्राम्हणें निरनिराळीं आहेत, ऋग्वेदावर ऐतरेय व कौषीतकी ब्राम्हण; यजुर्वेदाच्या दोन शाखा आहेत, एक कृष्णयजुर्वेद व दुसरी शुक्लयजुर्वेद, यांवर अनुक्रमें तैत्तिरीय व शतपथ ब्राम्हण; सामवेदावर प्रौढ व अद्भुत ब्राम्हण; आणि अथर्वण वेदावर गोपथ ब्राम्हण असे आहेत. आरण्यकांत उपनिषदें आहेत. तीं अरण्यांत म्हणावीं लागतात, म्हणून त्यांना आरण्यक म्हटलें आहे. बहुतकरून सर्व वेद छंदोबद्ध आहेत. यजुर्वेदाचा कांहीं भाग मात्र गद्यरूप आहे. ऋग्वेद संहितेचे दहा भाग केले आहेत, त्या प्रत्येक भागास मंडल म्हणतात. मंडलाचे आणखी भाग केले आहेत त्यास सूक्तें म्हणतात. प्रत्येक सूक्तांत सुमारें दहा ऋचा आहेत. ऋग्वेदांत इंद्रादि देवतांची स्तुति आहे, यजुर्वे-

दांत यज्ञप्रकरण आहे, सामवेदांत ऋग्वेदांतील ऋचा आहेत परंतु त्या गायनाच्या रीतीनें म्हणावयाच्या आहेत. अथर्वण वेदांत जारणमारणादि क्रियेचे मंत्र आहेत. ब्राम्हणांत बहुतकरून यज्ञक्रियेविषयीं सांगितलें आहे. आरण्यकांत व उपनिषदांत आत्मा व परमात्मा ह्यांविषयीं सांगितलें आहे.

ऋग्वेदाच्या २१ शाखा आहेत. यजुर्वेदाच्या १० शाखा आहेत. सामवेदाच्या १००० शाखा आहेत. अथर्वणवेदाच्या ५० शाखा आहेत. ह्याप्रमाणें चारी वेदांच्या मिळून एकंदर ११८० शाखा आहेत. प्रत्येक शाखेचें एक एक उपनिषत् आहे. त्यांपैकीं मुख्य अशीं १०८ उपनिषदें आहेत. तीं अशीं कीं, ऋग्वेदाचीं १०, शुक्लयजूचीं १९ आणि कृष्णयजूचीं ३२ अशीं यजुर्वेदाचीं ५१, सामवेदाचीं १६ आणि अथर्वणवेदाचीं ३१ आहेत. ह्यापैकीं ज्यास दशउपनिषदें म्हणून म्हणतात तीं येणेंप्रमाणें—**ईश, केन, कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक.**

वेदांत स्वर आहेत. ते उदात्त, अनुदात्त, व स्वरित असे तीन प्रकारचे आहेत. हे पोथ्यावर तांबड्या शाईनें अक्षरावर उभी रेघ किंवा अक्षराखालीं आडवी रेघ करून दर्शविण्याची चाल आहे. ह्या स्वराच्या योगानें अर्थांत फेरफार होतो. ह्यास उदाहरण—वेदांत वृत्रासुराचे व इंद्राचे युद्धाचें वर्णन दिलें आहे. वृत्र हा ऋषीचा मुलगा होता. ह्याच्या बापानें पुत्रेष्टि करून देवाजवळ अशी प्रार्थना केली कीं, मला इंद्रशत्रु असा मुलगा व्हावा. परंतु अशी गोष्ट घडली कीं, इंद्रशत्रुः असें म्हणतांना बापानें पुढील पदावर स्वर द्यावयाचा तो न देतां मागील पदावर स्वर दिला. तेव्हां प्रार्थनेप्रमाणें त्याला मुलगा झाला, परंतु अपस्वराचा परिणाम वाईट झाला. तो असा कीं "इंद्रशत्रुंः" ह्यांत पुढील पदावर स्वर दिला असतां "इंद्रशत्रुः" हा षष्ठीतत्पुरुष होऊन इंद्राचा शत्रु म्ह-

१ ऋग्वेदसंहिता, अ० १ अ० २ व० ३७ ऋ० ६ पहा.

णजे इंद्राचा नाश करणारा असा अर्थ होतो, आणि मागील पदावर स्वर दिला असतां " इंद्रशत्रुः " हा बहुव्रीहि समास होऊन त्याचा अर्थ असा होतो कीं, इंद्र आहे शत्रु ज्याचा म्हणजे इंद्राकडून ज्याचा नाश व्हावयाचा असा. म्हणून त्यास इंद्राकडून नाश पावणारा असा मुलगा झाला. ह्यावरून हें स्पष्ट आहे कीं, वेद म्हणतांना अपस्वराविषयीं फार जपलें पाहिजे. व्याकरणसंबंधानें स्वराचा जो उपयोग आहे त्याविषयीं महाकौमुदींत व अष्टाध्यायींत पुष्कळ विवरण केलें आहे.

( पुढें चालू. )



# उपोद्घातः

परमेश्वरविषयकं मतद्वयं विद्यते । आस्तिकं नास्तिकंचेति कतिचन-जनाः ईश्वरोऽस्तीति वदंति । केचन जनास्तु ईश्वरो नास्तीत्येवं भणांति । तस्मात्परमेश्वरः वस्तुतः सत्यो मिथ्यावेति यदा निर्णेतुं मनीषा भवेत् तदा उभयप्रकारकाणां विदुषां मतयोर्विचारः पक्षपातं विना अवश्यं करणीयोऽस्ति ।

नास्तिकानां मध्ये चार्वाकस्तु नास्तिकशिरोमणिर्नाम तेषां मुख्योऽस्ति । सर्वदर्शनसंग्रहनामके ग्रंथे चार्वाकदर्शनमिति प्रकरणमस्ति । तत्र चार्वाकमतप्रदर्शनं संक्षेपतः कृतम् ।

चार्वाकस्य मतंत्विदं विद्यते । यत्सत्यज्ञानमनुभवितुं प्रत्यक्षप्रमाणं विना अन्यत्प्रमाणं नास्ति । प्रत्यक्षप्रमाणेन परमेश्वरस्य ज्ञानं न भवति । तस्मात्स-मूलत एव नास्ति । सत्यज्ञानाय अनुमानं तु नोपयुज्यते । यतः अनुमान-प्रमाणस्य बहवो दोषाः संति । अनुमातुं व्याप्तिज्ञानस्यावश्यकत्वं तदर्थंच व्याप्यव्यापकयोः संबंधस्य ज्ञानमपेक्ष्यं । परंतु इदं च ज्ञानं प्रत्यक्षं न भवति । अनुमानेनापि भवितुमसंभवनीयं । व्याप्तिज्ञानाय उपमानरूप-साधनमपि नोपयोगमर्हति । यतः उपमित्या केवलं शब्दार्थयोः संबंधज्ञानं भवति व्याप्तेः ज्ञानं कदापि न भवति । किंच वेदः मिथ्यास्ति स च कप-टिना वंचकेन च मानवेन रचितः । यतः प्रत्यक्षप्रमाणेन यन्मिथ्या बीभ-त्सं च निर्णेतुं शक्यते तादृशं तु वेदे बहुशः उपलभ्यते । यथा—मृत-स्य पितुः श्राद्धादिके कृते सति तत् पित्रा लभ्यते इति वेदे कथितं । परंतु प्रत्यक्षतः इदमनुभवसिद्धं वर्त्तते यत् जीवंतं पितरं शिरोगृहे संस्थाप्य तदुद्देशेन अधोगेहे ब्राम्हणभोजनं कारितं चेत् शिरोगृहस्थापि-

तुदुदरभरणं न भवति। तस्मात्परमेश्वरोऽस्ति न वेति निर्णेतुं वेदाः प्रमाणीभूताः नैव संति।

अधुनात्वेवं विचार्यते यत् चार्वाकः प्रत्यक्षप्रमाणं विनान्यत् प्रमाणं न मन्यते। तर्हि तस्य यत् यत् साधनीयं भवेत्। तत्तत् ते न केवलं प्रत्यक्षप्रमाणेनैव साधनीयं नान्येन। परंतु अनुमानं प्रमाणं नास्तीत्येवं निर्णयः चार्वाकेन प्रत्यक्षप्रमाणेन नकृतः। अपितु अनुमानप्रमाणेन साधयितुं यत्नः संपादितः। एतस्मात्कारणात् चार्वाकः यद्यपि अनुमानं प्रमाणं न मनुते तथापि कस्मिंश्चित् विषये अनुमानं विना तस्य कार्यसिद्धिर्नैव भवतीत्येवं सिद्धं जायते। चार्वाकः वस्तुतः यस्याः मातुरुदरे जन्म गृहीतवान् तस्याः मातुरुदरे त्वया जन्म न गृहीतं अपितु कस्याश्चित् वेश्याया उदरे जन्मं गृहीतमिति यदि कश्चित् चार्वाकं प्रति पृच्छेत् तर्हीदं त्वदुक्तं मिथ्येति प्रत्यक्षप्रमाणेन साधयितुं चार्वाकः न शक्नुयात्। केवलं परमेश्वरोस्तीति अस्वीकृत्य तूष्णीमुपविशेत्। इदमप्रकृतम्। पश्चात् परमेश्वरास्तिक्यं यो ब्रूयात् तदुपरि परमेश्वरस्य आस्तिक्यसाधनक्रिया संपतेत्। तथापि परमेश्वरो नास्तीति यदि चार्वाकः वदेत् तर्हि तद्भाषणं तेन प्रत्यक्षप्रमाणेन साधयितव्यं भवेत्। किंच तथा यावन्न कुर्यात् तावत्तस्य भाषणं श्रवणार्हं नास्तीति मंतव्यम्। प्रत्यक्षप्रमाणेन यत् ज्ञानं भवति तस्य समूहस्त्वतीवाल्पोऽस्ति। प्रायशः ज्ञानं अनुमानेन भवति। किं बहुना जगत्सु विद्यमानाः सर्वे व्यवहाराः अनुमानप्रमाणबलेन चलंति। तमुपायमंतराऽन्य उपायो नास्ति। गणितशास्त्रे न्यायशास्त्रे च अनुमानप्रमाणजन्यः कियान् अमर्यादः ज्ञाननिधिर्वर्त्तते। तस्य विचारे क्रियमाणे सति चार्वाकमतं अयुक्तमिति निश्चयः स्यादेव। यदि चार्वाकः अद्य जीवन् भवेत्। तर्हि सअनुमानं मनुते वानवेति तस्य प्रतिक्षणं वर्त्तने प्रत्यक्षतः दर्शयितुं सुलभं स्यात्। किंच कतिवारं अनुमानं यथायोग्यं न कृतं चेत् तज्जन्यज्ञाने दोषाः संपद्यंते। तस्मात् अनुमानं प्रमाणत्वेन न ग्राह्यमिति सयुक्तिकं न भवति। यतोऽयं दोषः प्रत्यक्षप्रमाणेऽपि समानएव। प्रत्यक्ष-

प्रमाणेनापि अनेककालेषु बहूनां मनुष्याणां यथार्थज्ञानमभूत्वा भ्रमात्मकं अयथार्थज्ञानं भवति । यथा रज्जुं दृष्ट्वा अयं सर्पोऽस्तीति भ्रांतिर्जायते । चलंतीं गृहगोधिकां पर्यालोच्य वृश्चिकोगच्छतीति प्रतिभाति । उदकमसदपि मृगजलमिति दृष्टिगोचरं भवति । पित्तलं दृष्ट्वा सुवर्णमिति दृश्यते । सूर्यमभितः पृथ्वी चक्राकारं न भ्रमति अपितु सूर्यः पृथ्वीमभितः चक्राकारं भ्रमतीत्येवं भानं भवति । कदाचित्प्रसंगेतु एकप्रकारं गायनं श्रुतं चेत् कश्चिद्रोदितीत्येवं श्रवणपथमायाति । एकस्यां दिशि वाद्यानि वादयंति चेत् तद्विपरीतायां दिशि वाद्यानां शब्दो भवतीति श्रूयते । एवं विधं भ्रांतिमूलकं ज्ञानं कदा कदा च भवति । एभिर्हेतुभिर्यदि प्रत्यक्षप्रमाणं न त्यज्यते । तर्हि जगत्सु यस्योपयोगः प्रतिक्षणं भवति तदनुमानं कस्मात्त्याज्यम् । अपितु नैव त्याज्यम् । तस्मात् अनुमानं सर्वतस्त्याज्यमिति चार्वाकस्यातीवा विचारणेति ज्ञेयम् ।

अधुना परमेश्वरोऽस्ति स च सर्वशक्तिमान् सर्वज्ञः सर्वव्यापी स्वतंत्रः अनादिः नित्यश्चेति एवं विधोऽस्तीति प्रत्यक्षेण अनुमानेन वा अस्मत्कृतोपनिषद्ग्रंथे निर्णीतमस्ति ।

किंच परमेश्वरोऽस्ति । एतद्विषये मुख्यं उत्तमं च प्रमाणं श्रुतिर्नाम वेदोऽस्ति । तस्य प्रामाण्यग्रहणात्प्राक् तत्संबंधेन यद्विषयकविचारः प्रसक्तः स च यथा—

१ वेदोनाम किम् ।

२ वेदाः सत्याः मिथ्यावा संति ।

३ वेदाः केनापि कृताः किं ।

४ केनापि वेदाः कृतास्तर्हि ते मनुष्येण परमेश्वरेण वा कृताः ।

५ वेदाः केनापि न कृतास्तर्हि ते जगत्सु कथं कदा च संप्रवृत्ताः ।

६ वेदानां प्रामाण्यं कुतः ।

७ वेदानां पठने कस्याधिकारः ।

८ वेदपठणपद्धतिः कथमस्ति ।

९ वेदस्यार्थः केन प्रकारेण कर्त्तव्यः।

१० वेदानां रक्षणाय क उपायः।

११ वेदानां च ये स्वरास्ते किं स्वरूपाः। तेषां च क उपयोगः।

१२ वेदानामायुः कति। नाम ते कियत्कालपर्यंतं अवस्थास्यंति।

१३ वेदेषु के विषयाः संति।

१४ वेदानां विभागाः के के। कथंच जाताः।

१५ वेदेभ्यः किं फलं। वेदानां च का आवश्यकता।

वेदेत्वेवं लिखितं यत् अष्टवर्षं ब्राम्हणमुपनयीत तमध्यापयीत। अस्यार्थः अष्टवर्षात्मकस्य ब्राम्हणबालकस्य उपनयनसंस्कारो विधेयः तस्मै वेदः पाठयितव्यश्च। किंचैवं पैंगीश्रुतिर्विद्यते यत् नाग्निर्नयज्ञोनक्रियानसंस्कारो नव्रतानिशूद्रस्य। अस्यार्थः—शूद्रस्य अग्निहोत्रं यज्ञः क्रिया संस्कारः व्रतानि च कर्त्तव्यत्वेन विहितानि न संति। किंच स्मृतिरप्येवं वर्त्तते। यत् श्रवणे त्रपुजतुभ्यां श्रोत्रपरिपूरणं अध्ययने जिव्हाच्छेदः अर्थावधारणे हृदयविदारणं। अस्यार्थः— शूद्रेण वेदः श्रुतश्चेत् तस्य कर्णयोः लाक्षा सीसंच निक्षेपणीयम्। तथैव वेदस्य अध्ययनं कृतं चेत् जिव्हाच्छेदो विधेयः। तद्वत् वेदस्य अर्थावधारणं कृतं चेत् हृदयं विदारणीयम्। तस्मात् यदि वेदः सत्याः संति तर्हि तेषां वेदानां पठने ब्राम्हणक्षत्रियवैश्यान् विना अन्येषां अधिकारो नास्ति। किंच ब्राम्हणादित्रिभिर्वर्णैः स्वस्मात् नीचैः शूद्रादिभिः यथा श्रूयेरन् तथा वेदाः न पठितव्याः। यदि वेदाः मिथ्या संति तर्हि नीचजातीयैः शूद्रादिभिः वेदेषु अध्ययनादिलोभकरणं अयुक्तमिति स्पष्टमेवास्ति। तात्पर्यं त्विदं वेदाः सत्याः संतु मावा तथापि ब्राम्हणादित्रिवर्णं विना अन्यैः वेदश्रावणं वेदाध्यायनं वेदानामर्थावधारणं न युक्तमिति ज्ञेयम्।

वेदाः सत्याः मिथ्या वा भवंतु। परंतु यदा ते आविर्भूतास्तदा येन रूपेण अवस्थिताः तेनैव स्वरूपेण संप्रत्यापि तेषां अवस्थानं प्रायशः संभवनीयम्। यतस्ते सर्वेऽपि छंदोबद्धाः संति। यजुर्वेदस्य कश्चिद्भागः

केवलं गद्यरूपोऽस्ति । वेदः मुखपाठः कर्त्तव्य इति संप्रदायः पूर्वमारभ्य चलितोऽस्ति । ब्राम्हणं विना अन्येषां वेदपठनेऽधिकारो नास्ति । अतस्ते ब्राम्हणाधीनाः एव संति । तस्मात् तेषु न्यूनाधिकतायाः संभवो नास्ति । किंच ब्राम्हणा अपि वेदेषु पूज्यबुद्धिं कृत्वा तेषां यथा शुद्धरीत्या पठनं स्यात्तथा सावधानतया यतंते । एतस्मात्कारणात् वेदेषु न्यूनाधिकतायाः मूलत एव संभवो नास्तीत्येवं वक्तुं कापि चिंता नास्ति ।

पूर्वस्मादप्यधिकमिदमेकं विचारार्हमस्ति यत् संप्रति यथा धौर्त्यं समुत्पन्नम् तत्तु प्रतिदिनं वर्धते च । तथा धौर्त्यम् पुरा मूलत एव नासीत् । प्राचीनास्तु धर्मं नीतिंच अनुसृत्य वर्त्तनमकुर्वन् । किंच धर्मस्य प्रतिबंधेन दुराचरणेन नावर्त्तंत । अधुनातु दुर्जनसंगतिबलेन धर्मानुसरणं न्यूनं भूत्वा तस्मिन् श्रद्धायाः न्यूनत्वं क्रमशः भवति । तस्मात् धर्मस्य निर्बंधं लोकाः न मन्यंतेऽतएव ते धर्मभ्रष्टाः संतो भक्ष्याभक्ष्यादिकं पेयापेयादिकं व्यवहारवर्त्तनं च धर्मविरुद्धं समाचरंति । पुरात्वेवं स्थितिर्नास । किंतु धर्मानुसारिणी स्थितिरासीत् । अस्मिन् भरतखंडे भिन्न जातीयानां लोकानां मध्ये जातिविषयकः यः निर्बंधः धर्मशास्त्रप्रतिपादितः तमेव कृत्स्नशः प्राचीनाः अनुसरंतिस्म । परंतु संप्रति स निर्बंधः न्यूनीभवन् अस्तप्रायो जातः । अधुना कतिपये स्वयं पंडिताः इति मन्यमानाः धर्मविषयं निंदंति किंच ते नानाप्रकारैः वेदान् तिरस्कुर्वंति च । एवं अस्य भरतखंडस्य स्थितिः संजाता । अन्यदेशीयास्तु एवं मन्यंते यद्वेदोऽयं अतिपुराणः श्रेष्ठः सत्यश्च ग्रंथोऽस्ति । तत्र च ज्ञाननिधिर्वर्त्ततइति किंच तस्य यावती प्रसिद्धिः स्यात्तथा यतंते किंच तद्विषये तेऽन्यदेशीयाः बहुप्रकारैरन्वेषयंति । अन्यच्च येषां ब्राम्हणानामयं वेदः पूज्यतमः ग्रंथोऽस्ति ते तदनुरोधेन वर्त्तनं न कुर्वंति प्रत्युत अन्यदेशीयानां धर्मविरुद्धाचरणमनुकुर्वंति । तस्मात् अन्यदेशीयाः भरतखंडस्थान् दूषयंति । एवंप्रकारा स्थितिरधुनास्ति । पुरातुतथानास । एतैः सर्वैः हेतुभिः वेदे न्यूनाधिकतायाः संभवोनासीत् । एतस्मादेवच इतरग्रंथवत् वेदे पाठभेदाः नसंति ।

वेदानां पाठं मुखेन कर्त्तुं संप्रदायोऽस्ति । वेदानां श्रुतिरिति नाम विद्यते । तस्यार्थस्तु यच्छ्रुतं तदिति । वेदानां मुखेन पाठः कर्त्तव्यः इति संप्रदायोऽस्ति । तेन च तेषां संरक्षणं सम्यक्रीत्या भवति । यदि वेदानां मुखेन पाठकरणं न भवेत् केवलं ग्रंथाः अभवन् तर्हि ते ग्रंथाः कीटादिभिः भक्षिताः स्युरथवा एतादृश्या अन्यया रीत्या तेषां नाशः संजात स्यात् । प्रतिपक्षीयैस्तेषां ध्वंसः कृतो भवेत् । स्तेनैर्वा स्तेयकर्मणा तेषामपहारः कृतः स्यात् । राज्यक्रांतौ च महति खटाटोपे तेषां महती अव्यवस्था जाता स्यात् । तथापि ब्राम्हणानां स्मृतौ वेदानां विद्यमानत्वात् पूर्वोक्तरीत्या तेषां नाशो भवितुं न शक्यः । अन्यच्च वेदपुस्तकानां नाशः कृतोऽथवा वेदवेत्तारः सर्वे ब्राम्हणाः घातिताः । तथापि तेषां नाशः भवितुं न शक्यः । अग्रेत्वेवं निर्णीतं यत् वेदः मनुष्येण ईश्वरेणापि वा न कृतः । एवं सति एतस्मात्कालात्प्राक् यथा वेदाः आविर्भूय जगत्सु संप्राप्ताः तथैव पुनरपि आविर्भवितुं शक्ष्यंति । तात्पर्यं तु वेदाः नित्याः संतीति ।

ज्ञानंतु द्विविधं । यथार्थमयथार्थं च । यथार्थं नाम सत्यं । अयथार्थं नाम मिथ्या । तद्यथा—त्रयः पंच च मिलित्वा अष्टौ भवंति इदं सत्यं ज्ञानं । त्रयः पंच च मिलित्वा नव भवंति इदं मिथ्याज्ञानं । किंच ज्ञानं यत्र तिष्ठति तत्संबंधेन द्वौ प्रकारौ विद्येते । एकं ईश्वरबुद्धिस्थं अन्यच्च इतरबुद्धिस्थं नाम परमेश्वरभिन्नमनुष्यादिप्राणिबुद्धिस्थं चेति । परमेश्वरः सर्वज्ञो नाम तेनाज्ञातं यत्किंचिन्नास्ति । किंच यः सर्वं वेत्ति तस्य मिथ्याज्ञानं न भवति । तस्मात् ईश्वरबुद्धिस्थेन सर्वेण ज्ञानेन सत्यमताभाव्यम् । परमेश्वरः अनादिरस्ति । तस्मात् तद्बुद्धिस्थं ज्ञानं अनादि वर्त्तते । परमेश्वरः नित्योऽस्ति । तस्मात् तद्बुद्धिस्थं ज्ञानं नित्यमस्ति । किंच मनुष्याः तदितरप्राणिनश्च अल्पज्ञाः संति । तेषां सर्वविषयकं सत्यज्ञानं नास्ति । तस्मात्तेषां अज्ञानं मिथ्याज्ञानं चेत्युभयं विद्यते । मनुष्ये जायमाने सति तस्येंद्रियैर्ज्ञानं भवति । तस्मात् तस्यज्ञानं अनादि नास्ति ।

वेदेषु ईश्वरविषयकं ज्ञानं विद्यते । वेदे तावदेवं प्रतिपादितं यत्सृष्टेः

प्राक् परमेश्वरः एक एव आसीत् इति स एवं अकामयत यदहं बन्हीः प्रजाः सृजेयमिति । परमेश्वरः सर्वव्यापी सर्वज्ञः सर्वशक्तिमांश्च विद्यते । अन्यच्च कस्यचित्पुरुषस्य यदि पुत्रः संजातस्तर्हि पुत्रोत्पत्यनंतरं तत्पुत्रविषयकं ज्ञानं पितुर्वर्त्तते नतूत्पत्तेः प्राक् कालीनं । तथैव यदारभ्य परमेश्वरोऽस्ति तदारभ्य तत्संबंधि ज्ञानमप्यवश्यकमस्त्येव परमेश्वरस्त्वनादिर्विद्यते । तस्मात्तद्विषयकज्ञानेन अनादिमता भाव्यम् । किंच परमेश्वरः सर्वज्ञोस्ति । तस्मात्तद्विषयकज्ञानेन तद्बुद्धिस्थेन भवितव्यम् । परमेश्वरोऽनादिश्चेत् तस्य बुद्धिरप्यनादिर्भवेत् । तस्मात् ईश्व बुद्धिस्थं परमेश्वरसंबंधि ज्ञानमनादि विद्यते किंच सर्वं सत्यज्ञानं ईश्वरबुद्धिस्थमस्ति । तस्मात् यावत् सत्यज्ञानं भवेत् तावत् सर्वं ईश्वरबुद्धिस्थं सत् अनादि वर्त्तते ।

अधुना गणितशास्त्रव्याकरणशास्त्रवैद्यशास्त्रवेदांतशास्त्रादिषु विद्यमानं यत्सत्यज्ञानं तद्यदि ईश्वरबुद्धिस्थं नित्यं अनादि च विद्यते । तथापि तेषु सर्वेषु वेदोऽतिशयेन श्रेष्ठः पूज्यश्च अस्ति । यतः सर्वविद्यासु ब्रम्हविद्या श्रेष्ठतमाऽस्ति । सर्वविद्यानां मध्ये ब्रम्हविद्यायां परमेश्वरस्य विभूतिरस्ति । तदुक्तं भगवद्गीतायां दशमाध्याये द्वात्रिंशे श्लोके सर्गाणामादिरंतश्च मध्यंचैवाहमर्जुन ॥ अध्यात्मविद्या विद्यानां वादःप्रवदतामहम् ॥३२॥ अस्यार्थस्तु हे अर्जुन सृष्टेरादिः मध्यः अंतश्च नाम उत्पत्तिरक्षणनाशाः तेषु मम विभूतिरस्ति । सर्वविद्यासु अध्यात्मविद्यायां मम विभूतिर्विद्यते किंच सर्वेषां प्रवदतां मध्ये वादे मम विभूतिरस्ति । वेदे च अध्यात्मविद्यास्ति तस्मात्तत्र परमेश्वरस्य विभूतिर्विद्यते ।

सम्प्रति यथा वेदे विद्यमानं सत्यज्ञानं नित्यं अनादि अधिकश्रेष्ठं अतिमहत्वद्योतकं च विद्यते तथा यदि अन्यलोकानां परमेश्वरज्ञानविषयग्रंथेषु यथा यवनानां कुराणाख्यो ग्रंथः पारसीकानां झेंडावेस्टाख्यो ग्रंथः ख्रिस्तानां बैबलाख्यो ग्रंथः तेच यदि सत्याः भवेयुः तर्हि तत्रत्यं सत्यज्ञानं ईश्वरबुद्धिस्थं अनादि अतिशयश्रेष्ठं अतिमहत्वेद्योतकं च विद्यते । किंच तेऽपिग्रंथाः वेदसमानाः संति तत्र संशयो नास्ति । तथापि ब्राम्हणैः स्वकीयः

वेदोक्तः धर्मः नैव त्याज्यः । तदुक्तं गीतायां तृतीयाध्याये पंचत्रिंशे श्लोके श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः । अस्यार्थस्त्वयं यत् अन्यस्य धर्माचरणं सम्यक्तया कृतं चेत् तदपेक्षया न्यूनत्वेन आचरितोऽपि स्वधर्मः कल्याणकारकोऽस्ति । यतः अन्यधर्माचरणं भयकारकमस्ति । एतद्विषये व्यावहारिकोदृष्टांतस्तु यथा यदि मूषकभक्षणं मार्जारस्य हितावहं विष्टाभक्षणं च श्वानस्य सूकरस्य च कल्याणकारकं विद्यते । तथापि तदेव मनुष्यस्य हितावहं नास्ति । तस्माद्यः यस्यां जातौ समुत्पन्नः भवेत् स कस्मिन्नपि स्थले कस्मिन्नपि काले केनापि कारणेन स्वजातिधर्मं परित्यज्य अन्यधर्मं नैव स्वीकुर्यात् । एतदेव न किंतु स्वधर्मं स्वीकारयितुं परकीयानां प्रवर्त्तनं विधातव्यं एतत्तुल्यः अधर्मः अधमत्वं च अन्यन्नास्ति । जातिविशेषार्थं कारणविशेषेण विशेषप्रकारकः धर्मः कृतोऽस्ति । तस्मात् तस्य जातिविशेषस्य सः विशेषप्रकारकः धर्मएव हितावहो भवति ।

यदि परमेश्वरः सर्वं जगत्ससर्ज । जगत्सु च परमेश्वरंज्ञातुं योग्याः अधिकारिणः मनुष्याः संति । परमेश्वरज्ञानेन मोक्षरूपमुत्तमं सुखं लभ्यमस्ति । तर्हि स्वकीयं ज्ञानं मनुष्यैः संपाद्यमिति परमेश्वरस्येच्छास्ति । इदं स्वाभाविकमेव । यदि च परमेश्वरस्य तथेच्छा विद्यते । तर्हि सस्वकीयं ज्ञानं प्रकटीकरिष्यति इदमपि स्पष्टमेवास्ति । मनुष्येषु ज्ञानप्रकटीकरणस्य प्रकारास्तु इत्थं वर्त्तंते तद्यथा–मुखेन उपदेशः कर्त्तव्यः। लिखित्वा दर्शनीयं। संज्ञाभिः सूचनाकरणं । परमेश्वरस्तु सर्वशक्तिमान् विद्यते। तस्मात् स अन्यस्मै ज्ञानं दातुं मनुष्योपायान् परिहाय केवलं स्वेच्छयैव ज्ञानं दातुं शक्नोति।

भरतखंडे याः भाषाः पूर्वमासन् अधुना च संति तासां सर्वासां मध्ये संस्कृतभाषात्वतीव पुरातनी विद्यते । परकीयदेशे झेंडाख्या अथवा पेहेलवी नाम्नी । गाथिक् इत्याकारका । ल्याटिन् इत्यभिधाना । ग्रीक् इत्याह्वया । सेल्टिक् इत्याख्याच अतीव प्राचीनाः उत्कृष्टाश्च भाषाः संति ।

तासु संस्कृतभाषांतर्गतानां शद्बानां तुल्यानुपूर्वीकाः शब्दा उपलभ्यंते। एकस्मिन्नर्थे विद्यमानानां पृथक्भाषीयानां शब्दानां संकलनमधस्तात् चतुष्कोणे कृतं विद्यते।

| संस्कृतभाषा | ग्रीक्भाषा | ल्याटिन्भाषा |
|---|---|---|
| पितृ | प्याटर् | प्याटर् |
| मातृ | मीटर् | म्याटर् |
| भ्रातृ | फ्राट्रिआ | फ्र्याटर् |
| दुहितृ | थुगेटर् | — |
| नासा | — | नेसस् |
| मूष | मूस | मूस् |
| दिव्य | डिआस | डिव्हस् |
| तारा | आस्टर | आस्ट्रम् |
| द्वि | ड्युओ | ड्युओ |
| त्रि | ट्रीस् | ट्रस् |
| सप्त | हेप्टा | सेप्टेम् |
| दश | डेका | डिसेम् |

पृथिव्यां अद्यतावत् नवशतानि भाषाः संति। स्वदेशीयाः परदेशीयाश्च विद्वांसः एवं स्वीकुर्वंति यत् संस्कृतभाषात्वतीव प्राचीना विद्यते। अतएव च अन्याः भाषाः संस्कृतभाषानंतरं समुत्पन्नाः इति स्फुटं संज्ञायते। यदि च ब्राम्हणेषु संस्कृतभाषा अतिप्राचीनाऽस्ति। किंच यदि परमेश्वरस्त्वेवं कामयेत यन्मया वेदः ब्राम्हणेभ्यः उपदेष्टव्यः। तदा सस्वयं साक्षात् स्वपुत्रब्रम्हदेवद्वारा वा ब्राम्हणेभ्यः संस्कृतभाषयैव वेदं उपदेक्ष्यति इति स्वाभाविकमेवास्ति। तस्मात् अग्निमीळइत्याद्यनुपूर्व्या वर्त्तमानाः ये वेदास्ते ईश्वरेण स्वयं प्रकटीकृताः अन्येन वा प्रकटीकारिताः इति सिद्धं भवति। मनुष्याणामग्रतः वेदानां प्रादुर्भावात्प्राक् ते अग्निमी-

ळइत्याद्यनुपूर्व्या ईश्वरबुद्धिस्थाः आसन्निति वक्तुमुचितम् । यतः एवं न गृहीतं चेत् परमेश्वरस्य सर्वज्ञतायां न्यूनत्वं भविष्यति ।

ईश्वरबुद्धिस्थाः अतएव अनादयः वेदाः यदि परमेश्वरेण कृता इति प्रतिपाद्येत तन्नयुक्तम् । यतस्तथोक्तं चेत् वेदाः अनादय इति व्याहन्येत । अधुनात्वेवं विचारणीयं यत् वेदाः अनादयः संतोऽपि ईश्वरबुद्धिस्थाः संति ते अन्यस्य ज्ञानगोचरं कथं गताः ।

यदि च वेदाः सत्याः संति तत्र चैवमुक्तं यत्प्रथमं ईश्वरः ब्रम्हाणं ससर्ज तस्मै वेदान् अध्यापयामास च । पश्चात् ब्रम्हणः मुखेभ्यः वेदाः निर्गताः । ततः ब्रम्हणा स्वपुत्रेभ्यः वेदाः पाठिताः एवं परंपरया वेदाः अद्यावधि संप्राप्ताः।यदि कश्चिदेवं ब्रूयात् यच्चतुर्मुखःब्रम्हा आसीदिति असंभवनीयमशक्यं च । तच्चायुक्तं । यतोऽधुनापि मनुष्यस्य पुत्रस्य मुखद्वयं गोर्वत्सस्यच मुखद्वयं बहुवारं दृष्टिपथमायाति । अनुमानेन चतुर्वर्षात्प्राक् पुण्यपत्तने गोर्वत्सस्य षट्मुखान्यासन् तदस्माभिरन्यैश्च पुण्यपत्तनस्थैः लोकैः साक्षात् दृष्टम् । यद्यपि एतादृशः प्राणिनो लोके विरलाः संति । तथापि तथाविधाः प्राणिनो न संभविष्यंतीति न । अपितु संभविष्यंत्येव । किंच भूगर्भशास्त्रपर्यालोचनयात्वेवं ज्ञायते यत् पृथिव्यां भिन्नभिन्नकाले भिन्नभिन्नाकृतयः भिन्नभिन्न परिमाणाश्च प्राणिनः आसन्निति । अन्यच्च सृष्टयुत्पादकः परमेश्वरः सर्वशक्तिमान् विद्यते । तर्हि स लोकविलक्षणां यत्किंप्रकारकां सृष्टिं उत्पादयितुं शक्नुयात् तत्र न कापि चिंता मनुष्योऽयं अल्पज्ञः कश्चित् प्राणी विद्यते । परमेश्वरस्य अघटितघटनापटीयस्याः शक्तेः कल्पनापि अल्पज्ञस्य मनुष्यस्य मनसि नायास्यति ।

इदानींतनकाले ये वेदा अस्माकमुपलब्धिं प्रयांति तेतु लिखितपुस्तकस्वरूपेण मुखपाठकर्तृब्राम्हणस्वरूपेण वेति तत्र लिखितपुस्तकानां विचारे क्रियमाणे सति मनस्येवमायाति यत्पुस्तकानां पत्राणि कैश्चित्पुरुषैः जीर्णकर्पटानि संकुट्यकृतानि भवेयुः यया लेखन्याच पुस्तकानि लिखितानि सापि केनाचित्पुरुषेण अल्पछुरिकया कर्त्तव्या स्यात्

पुस्तकानां लेखनक्रियार्थं या मषीका अत्यावश्यकी सापि केनापि पुरुषेण लाक्षां पक्त्वा निष्पादिता भवेत् पत्रेषु यान्यक्षराणि संदृश्यंते तान्यपि केनचित् मनुष्येण लिखितानि स्युः। यस्तु ब्राम्हणः वेदान् मुखपाठं भणति तस्मै ब्राम्हणायापि केनचित् ते वेदाः शिक्षायितव्याः संति। किंच कोऽपि ग्रंथः मानवकृतिं विना संजात इति कुत्रापि नोपलभ्यते। एतस्मात्कारणात् यदि कश्चित् ब्रूयात् यत् वेदाः मनुष्येण कृताः संति तर्हि तन्न युक्तम् यतः-

१ यदि यः कोऽपि वदेत् यन्मानवेन वेदाः कृता इति तर्हि तेन तथा सिद्धं कृत्वा दर्शनीयम्। एवं सति तथा केनापि न सिद्धीकृतम्।

२ उपरि यन्निर्णीतं यत् वेदेषु ईश्वरविषयकं ज्ञानं सदपि तत् परमेश्वरेणापि न निर्मितं यदि च वेदसर्जनं परमेश्वरस्य अशक्यमस्ति तर्हि तत् मानवस्य अशक्यमिति किमुवक्तव्यम्। यतः परमेश्वरस्य बुद्धेरग्रतः मनुष्यस्य बुद्धेः का कथा। नकापीत्यर्थः। मनुष्यः अल्पज्ञोऽस्ति अतस्तस्य वेदे विद्यमानं ज्ञानं वेदसहायं विना भवितुमशक्यम्। संकलनया महाकालसंबंधिनि विचारे क्रियमाणे सति मनुष्यस्य शतवर्षात्मकमायुः शून्यवदस्ति। मनुष्यस्य अनेकानि जन्मानि संति तत्रापि तस्य साधारणतः पूर्वगतस्य जन्मनोऽपि ज्ञानं अग्रिमजन्मनि न भवति। मनुष्येण स्वयं यावतां प्रदेशानां ज्ञानं कर्तुं शक्यते तावान् प्रदेशः अनंतस्य आकाशस्य अग्रतः शून्यप्रायोऽस्ति।

३ उपरि यत्सिद्धांतितं यत् वेदे विद्यमानं ज्ञानं अनादि अस्ति तस्मात् यदि वेदाः मनुष्येण कृताः इति वक्तव्यम् तर्हि ते अनादयः न संति इति भवेत्।

४ सृष्टेः प्राक् परमेश्वरः एकाकी आसीत्। ततः नानाविधं जगत् निर्मातुं स ऐच्छत्। पश्चात् अमुकप्रकारकमिदं जगन्निर्मितमिति ऐतरेयोपनिषदि प्रतिपादितमस्ति। तथैव ऋग्वेदसंहितायां अष्टमाष्टके अष्टमाध्याये अष्टचत्वारिंशे वर्गे कथितमस्ति यत् धातायथा पूर्वमकल्पयत्। अस्यार्थस्तु ब्रम्हदेवः यथा पूर्वमासीत् तथैव पुनः सृष्टिं चकार नत्वपूर्वामिति।

आहेत त्यांचें आम्ही ध्यान करतों. त्या ध्यानानें जगताचा नियंता अग्नि-नामक, व अग्नीच्या अंतर्यामीं राहणारा परशुरामनामक भगवान आमच्या मनाला सत्कर्माविषयीं प्रेरणा करो ( अथवा आम्हाला उत्तम ज्ञानाचा उपदेश करो. )

**कात्यायनायविद्महेकन्यकुमारिधीमहि । तन्नोदुर्गिःप्रचोदयात् ॥**

**टीका**—दुर्गांतर्गतं भगवंतं प्रार्थयते ॥ कात्यायनायेति ॥ **कात्यायनाय[1]** कृत्तौवसतीतिकात्यः रुद्रः स एवायनमाश्रयोयस्याः साकात्यायनी तस्यै कात्यायन्यै तां **विद्महे** जानीमः। **कन्यकुमारि[2]** कन्या च सा कुमारी च तां **धीमहि** ध्यायेम । **तत्** तस्मिन् ध्याने **दुर्गिः[3]** दुःखेनापि गंतुमशक्या **नः** अस्माकं मनः ज्ञानं वा **प्रचोदयात्** प्रेरयतु स्वविषयकं कुर्यात् ॥

**अर्थ**—[ दुर्गेच्या अंतर्यामीं असणाऱ्या भगवंताची प्रार्थना करतों. ] जिला वाघाचें कातडें पांघरणाऱ्या शंकराचा आश्रय आहे अशा कात्यायनीला आम्ही जाणतों. तीच कन्या असून दुष्टांना मारणारी आहे असें आम्ही ध्यान करतों. त्या ध्यानानें, दुःखानेंही प्राप्त होत नसल्यामुळें जिला दुर्गा म्हणतात तिच्या अंतर्यामीं असलेला भगवान आमच्या मनाला दुसरीकडे जाऊं न देतां आपल्याकडेस लावो. ( अथवा ती आम्हाला ज्ञान देवो. )

**सहस्रपरमादेवीशतमूलाशतांकुरा । सर्वंहरतुमेपापं दूर्वादुःस्वप्ननाशनी ॥**

**टीका**—सर्वकर्ममूलस्नानांगदूर्वयासहशिरसिमृत्तिकाधारणार्थंतद्देवताप्रा-

१ कात्यायनायेति लिंगव्यत्ययश्छांदसः ।

२ कन्यकुमारीति-ह्रस्वश्छांदसः ।

३ दुर्गिरित्याकारस्य इकारश्छांदसः ।

र्थनरूपमंत्रानाह ॥ सहस्रपरमेत्यादिना ॥ **सहस्रपरमा** सहस्रसंख्याकाभ्यः पवित्रकरीद्रव्याभिमानीदेवताभ्यः परमा उत्तमा **देवी** क्रीडादिगुणविशिष्टा **शतमूला** शतसंख्याकानि मूलानि अभिव्यंजकानि यस्याः सा **शतांकुरा** शतं शतसंख्याकाः अंकुराः यस्याः सा **दुःस्वप्ननाशनी** दुष्टस्वप्नदर्शनप्रयुक्तानिष्टफलनाशनी एषा **दूर्वा[1] मे सर्वं पापं हरतु ।** अथवा **सहस्रपरमा** सहस्राधिकसंख्यावती **शतमूला** शतसंख्याकनारायणनरहर्यादिरूपाणां मूला अभिव्यंजका **शतांकुरा** नारायणादिशतमूर्तिरूपांकुरवती **दुःस्वप्ननाशनी दूर्वा** दूरेवातिगच्छतीति दूर्वाशब्दवाच्याभगवन्मूर्तिः **मे सर्वं पापं हरतु ॥**

**अर्थ**—[ हजारों पवित्र करणाऱ्या भागीरथ्यादि देवतांपेक्षां पवित्र करणारी, क्रीडा करणारी, जिला शेंकडों मूळें आहेत, जिला शेंकडों अंकुर आहेत, व जी दुष्ट स्वप्नांचा नाश करते, अशी दूर्वा माझें पाप हरण करो. ( अथवा हजारों अवतार घेणारा, नरसिंह इत्यादि शेंकडों अंशावतार घेणारा, जीस नारायण इत्यादि मूर्ती अंकुर आहे अशी दुष्ट स्वप्नांचा नाश करणारी सर्व व्यापक भगवंताची मूर्ति माझें पाप नाहींसें करो. )

**कांडात्कांडात्प्ररोहंतीपरुषःपरुषःपरि ॥ ७ ॥ एवानोदूर्वेप्रतनुसहस्रेणशतेनच ॥**

**टीका**—इतः परं ऋग्द्वयं पूर्वोक्तदेवताविषयं । हे **दूर्वे** त्वं **कांडात् कांडात्** दंडात् दंडात् **परुषः परुषः** प्रतिपर्वतः **परि** उपरि परितो वा **प्ररोहंती[3] एव** जायमानेव सा **तेन शतेन च सहस्रेण च** मम सुकृते **प्रतनु[4]** विस्तारय ॥

**अर्थ**—हे दूर्वे, प्रत्येक दंडापासून हरएक कांड्याच्यावर पुढें पुढें वाढणारी अशी तूं आमचें पुण्य शंभरपट व हजारपट वाढीव.

---

१ अयंवैहरयोदशचशतानिचसहस्राण्यनंतानिचेति श्रुतेः ।

२ आसीनोदूरंव्रजतिशयानोयाति सर्वशइति श्रुतेः ।

३ प्रउपसर्गात्रुहबीजजन्मनिप्रादुर्भावेचेत्यस्माद्धातोःशतृप्रत्ययः ।

४ प्रउपसर्गात्तनुविस्तारइत्यस्माद्धातोर्लोट् ।

**याशतेनप्रतनोषिसहस्रेणविरोहसि। तस्यास्तेदेवीष्टके विधेमहविषावयम् ॥**

**टीका—या** त्वं **शतेन** मूलेन **प्रतनोषि**[1] विस्तारयसि **सहस्रेण** अंकुरादिना **विरोहसि**[1] विरोहयसि एवं रूपायाः **तस्याः ते** हे **देवि इष्टके** इष्टकर्त्रिदेवते त्वां **वयं हविषा** हविरादिपूजासाधनद्रव्येण **विधेम** पूजां कुर्मः । यद्वा भगवत्पक्षे **कांडात् कांडात्** प्रतिव्यूहरूपात् **परुषः परुषः परि** प्रतिकल्पं **प्ररोहंती** अभिव्यज्यमाना **दूर्वा** तच्छब्दवाच्या भगवन्मूर्तिः **या त्वं शतेन** नारायणादिशतरूपेण **प्रतनोषि** स्वमूर्तिं विस्तारयसि **सहस्रेण** विश्वादिसहस्ररूपेण **विरोहसि** विशेषकारणैः प्रादुर्भवसि **तस्याः ते देवि** विधेमेत्यादिप्राग्वत् ॥

**अर्थ**—जी शेंकडों मूलांनीं सर्वांस व्यापून टाकिते व हजारों अंकुरांनीं चोहोंकडून पसरते अशा दूर्वादेवीची आम्ही पूजेच्या योग्य पदार्थांनीं पूजा करितों. ( हाच अर्थ भगवंताच्या पक्षीं असा कीं, भगवंताची मूर्ति एका मूर्तीपासून प्रत्येक कल्पामध्यें भिन्नभिन्न मूर्ति घेऊन सर्व व्यापते, नारायणादि शंभर रूपानें व्यापक आहे, विश्वादि हजारों रूपांनीं सर्व जगताला व्यापून टाकते. आम्ही अशा भगवंताच्या मूर्तीची पूजा नानाप्रकारच्या पूजेच्या पदार्थांनीं करितों. )

**अश्वक्रांतेरथक्रांतेविष्णुक्रांतेवसुंधरा । शिरसाधारयिष्यामिरक्षस्वमांपदेपदे ॥**

**टीका**—अथ मृदभिमंत्रणमंत्रानाह ॥ अश्वेति ॥ **अश्वक्रांते** अश्वैः राजभिरश्वमेधार्थं विसृष्टैरश्वैः क्रांता व्याप्ता **रथक्रांते** प्रियव्रतपृथ्वादिभगवदंशयुक्तमहाराजरथैः क्रांता व्याप्ता **विष्णुक्रांते** विष्णुना त्रिविक्रमादिरूपेण पादप्रक्षेपेण क्रांता व्याप्ता **वसुंधरा** वसूनि धारयति इति सर्वत्र संबुध्यतां त्वां **शिरसा धारयिष्यामि** । अतस्त्वं **मां पदे पदे** प्रतिपदं **रक्षस्व** पालय ॥

---

१ प्रतनोषिविरोहसिइत्यत्रांतर्णिचौ ।

**अर्थ**—[ आतां मृत्तिकेची प्रार्थना करण्याचे मंत्र सांगतों. ] राजे लोकांनीं अश्वमेध यज्ञाकरितां सोडलेल्या अश्वांनीं व्यापलेली, प्रियव्रत, पृथु, इत्यादि भगवंताच्या अवतारांच्या राजाच्या रथांनीं भरलेली, वामन अवतारामध्यें तीन मोठे पाय केले त्यांपैकीं एका पायानें व्यापिलेली, सर्व प्रकारच्या द्रव्यांना धारण करणारी, अशा हे पृथ्वी, मी तुला मस्तकावर धारण करितों. ह्याकरितां तूं पावलोंपावलीं माझें रक्षण कर.

**भूमिर्धेनुर्धरिणीलोकधारिणी। उत्धृतासिवराहेणकृष्णेन शतबाहुना ॥**

**टीका**—भूप्रार्थनारूपंद्वितीयंमंत्रमाह ॥ भूमिरिति ॥ **धेनुः** सकलसस्य दोग्ध्री अथवा पृथुचक्रवर्तिनः धेनुर्भूत्वातद्योग्यपयोदोग्ध्री **धरिणी लोक-धारिणी** लोकान् धारयतीति **कृष्णेन** उत्कृष्टज्ञानानंदघनेन कृष्णवर्णेन वा **शतबाहुना** अनंतबाहुना **वराहेण** वरान् ब्रह्मदत्तवरानवध्यत्वादी-न्हिरण्याक्षादीन्वा आहंतीति वराहः तेन क्रोडरूपेण **उत्धृता** ऊर्ध्वंनीता असि ॥

**अर्थ**—[ पृथ्वीच्या प्रार्थनेविषयीं दुसरा मंत्र सांगतों. ] सर्व धान्यें देणारी ( अथवा पृथुनामक चक्रवर्ती राजा असतां जिनें गाईचें रूप घे-ऊन पाहिजे ते पदार्थ दिले ) अशी हे गोरूपी पृथ्वी, तूं सर्व लोकांना धारण करणारी आहेस, तुला हिरण्याक्ष दैत्यांना मारणाऱ्या वराह अवतार घेणाऱ्या, कृष्णवर्णाच्या सच्चिदानंदानें परिपूर्ण व अनंत हात असलेला अशा कृष्णानें पाताळांतून वर काढिली आहे.

**मृत्तिकेहनमेपापं यन्मयादुष्कृतंकृतं। मृत्तिकेब्रम्हदत्ता-सि काश्यपेनाभिमंत्रिता ॥ मृत्तिकेदेहिमेपुष्टिंत्वयिसर्वंप्रति-**

---

१ उक्तंचैतद्भागवतेचतुर्थस्कंधेअष्टादशाध्यायेवत्संकृत्वामनुंपाणावदुहत्सकलौषधी-रिति ।

२ अनंतशीर्षोऽनंतबाहुरितिश्रुतेः ।

३ तांवराहोभूत्वाहरादितिश्रुतेः ।

ष्ठितं ॥ ८ ॥ मृत्तिकेप्रतिष्ठितेसर्वंतन्मेनिर्णुदमृत्तिके । तयाहतेनपापेनगच्छामिपरमांगतिं ॥

**टीका**—मृत्तिकाप्रार्थनारूपमंत्रांतराण्याह ॥ मृत्तिकइति ॥ हे **मृत्तिके मया यत् दुष्कृतं पापं कृतं** तत् **मे** पापं **हन** परिहर । हे **मृत्तिके ब्रह्मदत्ता** ब्रम्हणा वराहरूपिणा चतुर्मुखेन वा दत्ता **असि काश्यपेन** ऋषिणा स्थैर्याय मंत्रोच्चारणपूर्वकं **अभिमंत्रिता** स्पृष्टा असि । हे **मृत्तिके मे पुष्टिं देहि** यतः **त्वयि सर्वं** पुष्टिसाधनीभूतव्रीहियवादिद्रव्यं **प्रतिष्ठितं** । हे **मृत्तिके सर्वं प्रतिष्ठिते** सर्वाभिमुख्येन स्थितायां त्वयि सर्वं जगत् प्रतिष्ठितं पापहरणोपायादिकं च त्वयि प्रतिष्ठितं । **तत्** तस्मात् **मे** पापं **निर्णुद** परिहर । हे **मृत्तिके तया** मृत्तिकया **हतेन** नाशितेन **पापेन परमां** उत्तमां **गतिं** स्वर्गादिलक्षणां **गच्छामि** यास्यामि ॥

**अर्थ**—[ मृत्तिकेच्या प्रार्थनेविषयीं दुसरा मंत्र सांगतो. ] हे मृत्तिके, मीं जें पाप केलें आहे त्याचा तूं नाश कर. हे मृत्तिके, तुला वराह अवतार घेऊन भगवंतानें उद्धारिलें आहे, व तुला स्थिर करण्याकरितां कश्यप ऋषीनें मंत्रांनीं अभिमंत्रण केलें आहे. ह्याकरितां, हे मृत्तिके, तूं मला पुष्ट कर; कारण पुष्ट करण्याचे सर्व पदार्थ तुझे ठिकाणीं आहेत. हे मृत्तिके, तुझे ठिकाणीं सर्व जग राहिलें आहे. हे मृत्तिके, तूं माझें पातक नाहींसें कर म्हणजे मी पापरहित होऊन उत्तम स्वर्गादि लोकांस जाईन.

यतइंद्रभयामहेततोनोअभयंकृधि । मघवंच्छग्धितवतन्नऊतयेविद्विषोविमृधोजहि ॥

**टीका**—स्नानतीर्थयात्रासमये संभावितभयपरिहारार्थं पापशत्रुनिबर्हणार्थं इंद्रांतर्गतं हरिं अर्थयते ॥ यतइति ॥ हे **इंद्र**[1] परमैश्वर्यशालिन् भगवन् **मघवन्**[2] यज्ञशालिन् **यतः** पापात् शत्रोर्वा **भयामहे** भीताः वर्त्तामहे ।

---

१ इदिपरमैश्वर्येइतिधातोरौणादिकोरप्रत्ययः। सर्वविषयभोगाच्चइंद्रइतिऋग्भाष्योक्तेः।
२ तथाचभट्टिकाव्येहविर्जक्षितिनिःशंकोमखेषुमघवानसाविति ।

**तनः नः** अस्माकं **अभयं कृधि** कुरु **तत्र** त्वम् **तन्** भयादिकं अ-स्माकं **ऊतये** त्राणाय **न** भवति । **तत् शग्धि** आच्छादय । **विद्विषः विमृधः** विशेषितपापांश्च कामक्रोधादिकान् **जहि** नाशय ॥

**अर्थ**—[ स्नान तीर्थ व यात्रा करते वेळीं जें भय होण्याजोगें आहे त्याचा परिहार होण्याकारितां व पाप आणि शत्रु ह्यांचा नाश करण्यास्तव इंद्रामधील परमेश्वराची प्रार्थना करितों. ] हे ऐश्वर्यांनीं परिपूर्ण व यज्ञ करणाऱ्या इंद्रा, आम्ही ज्या पापापासून ( अथवा शत्रूपासून ) भय पावत आहों तीं पापें ( अथवा शत्रु ) ह्यांचा नाश करून आम्हांला भयरहित ( अथवा शत्रुरहित ) कर. कारण तीं पापें ( अथवा ते शत्रु ) आमच्या कल्याणास विघ्न करणारे आहेत. त्या पापांचा व विशेषेंकरून कामक्रोधादिक षड्रिपूंचा नाश कर.

**स्वस्तिदाविशस्पतिर्वृत्रहाविमृधोवशी । वृषेंद्रः पुरएतु-नःस्वस्तिदाअभयंकरः ॥**

**टीका—स्वस्तिदा**[2]**:** स्वस्तिददातीति **विशस्पतिः**[3] विशां प्रजानां वैश्यानां पतिः स्वामी **वृत्रहा**[4] वृत्रं असुरं पातकं वा अपहंता अज्ञाननाशक इति यावत् **विमृधः** विपापान् **वशी** वशीकरणशीलः **वृषा** सर्वाभीष्टसेचकः **इंद्रः** इंद्रांतर्गतः परमात्मा **स्वस्तिदाः** क्षेमदः अभयंकरः अभीतिकारी सन् **नः पुरः** पुरोभागे **एतु** गच्छतु ॥

**अर्थ**—कल्याण देणारा, सर्व प्रजेचा मालक ( अथवा सर्व वैश्यांचा पति ), वृत्रासुराला मारणारा ( अथवा पातकाचा नाश करणारा ), ज्यांना पाप नाहीं अशा लोकांना आपल्याकडे आणणारा, व सर्व प्रकारचें कल्याण करणारा, असा इंद्राच्या अंतर्यामीं असलेला परमात्मा आम्हाला कल्याण करणारा होऊन आमच्यापुढें येवो.

---

१ कृधातोर्हुझल्भ्योहेर्धिरितिछांदसःधिः ।

२ स्वस्तिदाइतिसुपांसुलुक्पूर्वसवर्णाच्छेयाडाड्यायाजालइतिसूत्रेणपूर्वसवर्णदीर्घः ।

३ विशस्पतिःसुडागमश्छांदसः ।

४ वृत्रंतमपापमितिऋग्भाष्यं ।

**स्वस्तिनइंद्रोवृद्धश्रवाःस्वस्तिनःपूषाविश्ववेदाः । स्वस्तिनस्तार्क्ष्योअरिष्टनेमिःस्वस्तिनोबृहस्पतिर्दधातु ॥**

**टीका—वृद्धश्रवाः** वृद्धमभिवृद्धंश्रवः यशः श्रोत्रं वा यस्य सः तया विधः **इंद्रः** तदंतर्गतभगवान् **नः स्वस्ति** विदधातु करोत्विति यावत् **विश्ववेदाः** विश्वंवेत्तीति सर्वज्ञः **पूषा** पूर्णः पूषन्शब्दवाच्यः पूषांतर्यामी परमात्मा **नः** अस्माकं **स्वस्ति** विदधातु । **अरिष्टनेमिः** अरिष्टानि शुभाशुभानि नियमयतीति अरिष्टपरिहारकः **तार्क्ष्यः** गरुडः तदंतर्गतोभगवान् **स्वस्ति** कल्याणं विदधातु । **बृहस्पतिः** ब्रम्हादीनां पतिः स्वामी देवगुरोरंतर्गतो भगवान् **नः** अस्माकं **स्वस्ति** कल्याणं **दधातु** करोतु ॥

**अर्थ**—ज्याचें यश चोहोंकडे प्रसिद्ध व पसरलेलें आहे असा इंद्राच्या अंतर्यामीं असलेला भगवान आमचें कल्याण करो. सर्वज्ञ असा सूर्याच्या अंतर्यामीं असलेला परमात्मा आमचें कल्याण करो. शुभ व अशुभ ह्या दोहोंचा नाश करणारा असा गरुडाच्या अंतर्यामीं असलेला भगवान आमचें कल्याण करो. ब्रम्हादिक देवांचा पालन करणारा असा देवगुरू ह्याच्या अंतर्यामीं असलेला परमेश्वर आमचें कल्याण करो.

**आपांतमन्युस्त्रिफलप्रभर्माधुनिःशमीवांत्छरुमांऋजीषी । सोमोविश्वान्यतसावनानिनार्वागिंद्रं प्रतिमानानिदेभुः ॥ ९ ॥**

**टीका**—इतः परमेकेन सोमलताभिमानिनं चंद्रं भगवंतं चार्थयते ॥ आपांतमन्युरित्यादिना ॥ **आपांतमन्युः** आपांतः व्याप्तः मन्युः क्रतुर्येनसः **त्रिफलप्रभर्मा** ऐहिकस्वर्गमोक्षलक्षणफलत्रयपूरकः **धुनिः** देवप्रीतिजन-

१ द्वितीयांतोपपदाद्विदेः कर्तरिअसुन्प्रत्ययः ।

२ बृहस्पतिरित्यत्रतद्बृहतोः करपत्योश्चोरदेवतयोरितिसूत्रेणसुडागमः ।

३ आप्लृव्याप्तावितिधातोर्निष्ठार्थेऔणादिकोऽच्प्रत्ययः । मन्युर्दैन्येक्रतौक्रुधीतिशद्बानुशासनात् ।

४ धुप्रीणनेइतिधातोः कर्त्तरिऔणादिकोडिप्रत्ययः ।

कः शमीवान् स्निग्धरसवान् **चरुमान्** सोमयोगचर्वादिसहितः **ऋजी-षी**' रसद्रव्यवान् एतादृशः **सोमः** सोमांतर्यामी भगवान् **विश्वानि इंद्र-प्रतिमानानि** इंद्रवनसदृशानि **वनानि अतसा** सततप्रसरणेन **अर्वाक्** अधस्तात् **देभुः** विनामयत् उत्पादितवानिति यावत् ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें एका ऋचेनें सोमवल्लीची अभिमानी देवता चंद्र-नामक भगवंताची प्रार्थना करितें. ] ज्यानें सर्व ठिकाणीं यज्ञ केले आ-हेत, इहलोक स्वर्गलोक व मोक्ष हे तीन लोक प्राप्त करून देणारा, देवा-ची प्रीति उत्पन्न करणारा, उत्तम रसांनीं पूर्ण, सोमयज्ञामध्यें होणाऱ्या चरूचा ग्रहण करणारा, रसयुक्त द्रव्यांनीं भरलेला, अशा चंद्राच्या अंतर्या-मीं असणाऱ्या परमात्म्यानें इंद्राच्या वनांसारखीं वनें पृथ्वीवर सर्व ठिकाणीं उत्पन्न केलीं.

**ब्रम्हजज्ञानंप्रथमंपुरस्ताद्विसीमतःसुरुचोवेनआवः ।**
**सबुध्नियाउपमाअस्यविष्ठाःसतश्चयोनिमसतश्चविवः ॥**

**टीका**—इतः परं ब्रम्होत्पन्नज्ञानमेकमेव स्वोत्प्रेक्षानुसारेण अनेकरूपेण सदसत्फलहेतुरभूदित्याह ॥ ब्रम्हजज्ञानमिति ॥ **ब्रम्हजज्ञानं** ब्रम्हणा परब्र-म्हणा वेदेन च उत्पन्नज्ञानं **प्रथमं** एकमेवाभूत् । **पुरस्तात्** स्वोत्प्रेक्षा-नुसारेण असुरव्यामोहनाय **विसीमतः** अनेकमर्यादारूपेण स्थापितवतः **सुरुचः** प्रकाशमानाः तत्तद्रुच्यनुसारेण **वेनः** अस्वामिकः अनीश्वरवाद इति यावत् **आवः** स्वीकृतवंतः । **सबुध्निया** समूलं प्राप्त्या **विष्ठाः** निष्ठाः परमेश्वरविषयकं ज्ञानं **सतः** मोक्षादेः सज्जनस्य वा **योनिः** कारणं **अस-तः च विवः** विनाशकं **अस्य** परमेश्वरस्य **उपमा** ज्ञानं अस्ति । अतः प्रयत्नेनोत्पन्नपरमात्मसर्वोत्तमत्वज्ञानमादरणीयमितिभावः ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें परब्रम्हापासून उत्पन्न झालेलें ज्ञान एकच आहे,

---

१ तृतीयसवनमृजीषमभिषुण्वंतीतिश्रुतेः ।

२ दभीगात्रविनामेइतिधातोर्लङ् ।

तें आपल्या कल्पनेप्रमाणें अनेक रूपांनीं चांगलें किंवा वाईट फळाला कारण होतें, असें सांगतो. ] परब्रम्हाच्या ( अथवा वेदाच्या ) योगानें जें ज्ञान उत्पन्न झालें तें एकच आहे. पुढें आपल्या उत्प्रेक्षेप्रमाणें दैत्यांना मोह पाडण्यास्तव अनीश्वरवादाचा स्वीकार केला. परमात्म्याचें ज्ञान चांगल्यांना मोक्ष मिळण्यास कारण आहे, आणि परमात्म्याच्या ज्ञानासारखें जें ज्ञान तें वाइटांचा नाश होण्यास कारण आहे. सारांश, परमेश्वर सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे असें जें ज्ञान प्रथम उत्पन्न झालें तें स्वीकारावें.

**स्योनापृथिवीभवानृक्षरानिवेशनी। यच्छानःशर्मसप्रथाः॥**

**टीका**—पृथिवीं तत्स्थं पृथिवीनामकं भगवंतं च प्रार्थयते॥ स्योनेति॥ **निवेशनी** ग्रहवती **अनृक्षरा** नॄन् मनुष्यान् क्षरतीति नृक्षरा सा न भवतीति **स्योना**[1] सुखकरी **सप्रथाः** सविस्तारा **पृथिवी** प्रथनात् तच्छब्दवाच्या त्वं **नः शर्म यच्छ**[2] सुखं देहि। भगवद्विषये **निवेशनी** श्वेतद्वीपानंतासनवैकुंठादिस्थानवती **सप्रथाः अनृक्षरा पृथिवी** पृथिवीस्थ भगवन्मूर्तिः त्वं **नः** अस्माकं **शर्म** कल्याणं **यच्छ** देहि। **स्योना** सुखकरी **भव**[3]॥

**अर्थ**—[ पृथिवी व तिच्या अंतर्यामीं असलेल्या पृथ्वीनामक परमेश्वराची प्रार्थना करतो. ] जी एकाजागीं ठेवलेली आहे, जी कधीं मनुष्यांना आपल्यापासून दूर करीत नाहीं, जी सुख देणारी आहे, जी सर्व ठिकाणीं पसरलेली असल्यामुळें जिला पृथिवी असें नांव आहे, अशी पृथिवी आम्हाला कल्याण देवो. ( अथवा सर्व ठिकाणीं व्यापून राहणाऱ्या पृथिवीच्या अंतर्यामीं असलेली भगवंताची मूर्ति अविनाशी आहे, श्वेतद्वीप, अनंतासन व वैकुंठ अशा तीन लोकीं राहणारी आहे, ती कोणाची हयगय करीत नाहीं, सर्वत्र प्रसिद्ध आहे म्हणून पृथिवीनामक आहे, अशी ही भगवंताची मूर्ति आम्हाला कल्याण देवो ); व आम्हाला नेहेमीं सुखकारक होवो.

---

१ सिवु धातोः सकाशात्नःप्रत्ययः।

२ यम्धातोः सकाशाल्लोण्मध्यमपुरुषः

३ भू धातोः सकाशाल्लोण्मध्यमपुरुषः

**गंधद्वारांदुराधर्षांनित्यपुष्टांकरीषिणीं। ईश्वरीᳪंसर्वभूता-नांतामिहोपव्हयेश्रियं। श्रीर्मेभजतुअलक्ष्मीर्मेनश्यतु ॥**

**टीका**—लक्ष्मीं पृथिवीं वा प्रार्थयते ॥ गंधद्वारामिति ॥ **गंधद्वारां** घ्राणग्राह्योगुणोगंधः तदेव द्वारं ज्ञप्तिकारणं यस्याः तां **दुराधर्षां** दुष्टैरसु-रादिभिः बलाद्वशीकर्तुं तिरस्कर्तुं वा अशक्यां **नित्यपुष्टां करीषिणीं** नि-रंतरं पुष्टां सस्यधनधान्यसमृद्धिकारिणीं यद्वा नित्यपुष्टां स्वस्थां प्रजां करीषिणीं कर्तुमिच्छतीं **सर्वभूतानां** समस्तप्राणिनां **ईश्वरीं** स्वामिनीं ए-तादृशीं **श्रियं तां** पूर्वोक्तां पृथिवीं च **उपव्हये** समीपमाव्हयामि सा **श्रीः मे** समीपं **भजतु। अलक्ष्मीः** दौर्भाग्यं मे **नश्यतु** ॥

**अर्थ**—[ लक्ष्मी ( अथवा पृथिवी ) ह्यांची प्रार्थना करतों. ] ना-कानें ज्या गुणाचें ज्ञान होतें तो गुण म्हणजे वास ह्याच्या योगानें जिचें ज्ञान होतें अशी, दुष्ट असुरलोक जिला वश करण्यास झटतात ( अ-थवा पृथिवीपक्षीं जिचा तिरस्कार करण्यास झटतात ) अशी, नेहेमीं धन-धान्य इत्यादिकांची समृद्धि करणारी ( अथवा पृथिवीपक्षीं प्रजेला स्वस्थ करणारी ), सर्व प्राणिमात्रांना नियमन करणारी, अशी लक्ष्मी व पृथिवी ह्या दोन देवतांना आपल्याजवळ येण्याकरितां बोलावितों. ती लक्ष्मी देवता ( अथवा पृथिवी ) माझेजवळ नेहेमीं येवो, आणि माझें दौर्भाग्य नाहींसें करो.

**विष्णुमुखावैदेवाश्छंदोभिरिमाल्लोँकाननपजय्यमभ्यज-यन्। महाᳪंइंद्रोवज्रबाहुःषोडशीशर्मयच्छतु ॥ १० ॥**

**टीका**—विष्ण्वादिदेवतामाहिमोक्तिपूर्वकामिंद्रमर्थयते ॥ विष्णुमुखा इति ॥ **विष्णुमुखाः** विष्णुः मुखः प्रधानं येषां ते **देवाः वै** खलु **अपजय्यं** अन्यैर्जेतुमशक्यं दैत्यसंघं च **इमान् लोकान् च छंदोभिः** वेदमंत्रैः **अभ्य-जयन्** जितवंतः। तत्र **महान्** सर्वोत्तमः देवाधिकः **वज्रबाहुः** वज्रहस्तः **षोडशी** षोडशग्रहवान् **इंद्रः** प्रसिद्धभगवांश्च **शर्म** सुखं **यच्छतु** ददातु ॥

**अर्थ**—[ परमेश्वर आदिकरून सर्व देवांचा महिमा सांगतों आणि इंद्राची प्रार्थना करितों. ] परमेश्वर ज्यामध्यें मुख्य आहे अशा सर्व देवांनीं, दुसऱ्यांनीं जिंकण्यास अशक्य अशा दैत्यांना व पृथिव्यादिक सर्व लोकांना वेदमंत्रांनीं जिंकिलें. त्या सर्व देवांमध्यें मुख्य असा इंद्र हातामध्यें वज्र घेऊन नानाप्रकारच्या ऐश्वर्यांनीं युक्त होऊन आम्हाला कल्याण देवो.

**स्वस्तिनोमघवाकरोतुहंतुपाप्मानंयोऽस्मान्द्वेष्टि। सोमानꣳस्वरणंकृणुहिब्रम्हणस्पते ॥**

**टीका—मघवा** यज्ञशालीप्रसिद्धः इंद्रः भगवांश्च **नः** अस्माकं **स्वस्ति** क्षेम **करोतु** । **यः अस्मान्** अस्मद्विषये **द्वेष्टि** अनिष्टं करोति तं **पाप्मानं हंतु** नाशयतु। **ब्रम्हणः** ब्रम्हणश्चतुर्मुखस्य वेदस्य वा **पते**[1] स्वामिन् **सोमानं**[2] उत्कृष्टज्ञानपरिमाणपूजायुक्तं एतादृशभगवंतं **स्वरणं** सुअरणं शरणं **कृणुहि**[3] कुरु ॥

**अर्थ**—यज्ञ करणारा प्रसिद्ध इंद्र ( अथवा भगवान ) आमचें कल्याण करो. जो कोणी आमचा द्वेष करितो अशा पातकी लोकांचा नाश परमात्मा करो. हे ब्रम्हदेवाच्या पालका ( अथवा वेदाच्या पालका ), आम्ही अशा परमात्म्याची उत्तम रीतीनें भक्ति करावी व आम्हाला आश्रय मिळावा असें कर.

**कक्षीवंतंय औशिजंशरीरंयज्ञशमलंकुसीदंतस्मिन्सीदतुयोऽस्मान्द्वेष्टि ॥**

**टीका—कक्षीवंतं** कक्ष्याद्यवयवोपेतं सोमानं उत्कृष्टज्ञानप्रमाणौ यस्येति जीवत् शरीरमितियावत् **यज्ञशमलं** यज्ञेन ज्योतिष्ठोमादिना भगवत्पूजादिना वा शमलं अपहतं शमलं पापं यस्येति एतादृशं **शरीरं स्वरणं**

---

१ वेदस्तत्वंतपोत्रम्हब्रम्हाविप्रः प्रजापतिरितिशब्दानुशासनाच्च । ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिरित्युत्तरवाक्याच्च ।

२ उत्कृष्टंमानंज्ञानंपरिमाणंवातेनसहितं ।

३ कृणुहिइत्यत्रउतश्चप्रत्ययादसंयोगपूर्वादित्यनेनलुक्नभवतिछांदसत्वात् ।

स्वाश्रयं यऔशिजं सहजं कृणुहि । **यः अस्मान् द्वेष्टि तस्मिन् तत् कुसीदं ऋणं सीदतु** गच्छतु ऋणमस्माकं माभूच्छत्रून् प्रतिगच्छत्वितिभावः ॥

**अर्थ**—ज्यास वरगडया इत्यादि अवयव असून ज्यामध्यें ज्ञान व परिमाण आहे, ज्याचें पाप यज्ञादिकांनीं ( अथवा भगवंताच्या पूजांनीं ) नाहींसें झालें आहे, अशा देहाला तूं आपला आश्रय सहज दे. जो कोणी आमचा द्वेष करील त्याकडे आमचें कर्ज जावो. सारांश, मला कर्ज न होतां तें सर्व शत्रूला होवो.

**चरणंपवित्रंविततंपुराणंयेनपूतस्तरतिदुष्कृतानि । तेन पवित्रेणशुद्धेनपूता अतिपाप्मानमरातिंतरेम ॥**

**टीका—पवित्रं** पावित्र्यकारि **विततं** भक्तेषु धारणादिना व्याप्तं **पुराणं**[1] पुरातनं **यत् चरणं** चक्रं परमात्मनः वर्तते **येन** परमात्मचक्रेण **पूत**-पवित्रितः **दुष्कृतानि** दुष्कर्माणि **तरति** तरणंकरोति **तेन शुद्धेन पवित्रेण पूताः अरातिं पाप्मानं अतितरेमं**[2] अतीत्यतरेमं[3] ॥

**अर्थ**—पवित्र करणारें, सर्व भक्तांच्या ठिकाणीं व्यापून राहिलेलें, फार प्राचीनचें, असें जें परमात्म्याचें चक्र आहे, आणि ज्या परमात्म्याच्या चक्रानें मनुष्यें पवित्र होऊन सर्व पातकांपासून तरून जातात, त्या शुद्ध करणाऱ्या व पवित्र अशा परमात्म्याच्या चक्रानें आम्ही पवित्र होऊन सर्व पातकांपासून तरून जाऊं.

**सजोषाइंद्रसगणोमरुद्भिः सोमंपिबवृत्रहंच्छूरविद्वान् । जहिशत्रूंरपमृधोनुदस्वाथाभयंकृणुहिविश्वतोनः ॥**

---

१ पुराणि शरीराणि अणतिगच्छतीतिवा ।

२ छंदसिव्यवहिताश्चेतिसूत्रात् उपसर्गोव्यवहितोऽपिभवति ।

३ तथाचमाध्यंदिनशाखायांधृतोर्ध्वपुंड्रतिलकः समदुःखसुखःक्षमी । सदापरमयाभक्त्यास्मरन्पुरुषविग्रहं । दिव्यैस्तुपंचभिः खड्गचक्रशार्ङ्गगदांबुजैः । मुद्रैः कृताखिलांगोऽसौसूरिरित्युच्यतेबुधैरिति ॥

**टीका**—**शूर** शौर्यादिगुणसंपन्न **विद्वान् वृत्रहन्** शत्रुहन् हे **इंद्र मरुद्भिः** एकोनपंचाशन्मरुद्भिस्तदुपलक्षितैर्देवैर्वा **सगणः** गणैस्सहितः **सजोषा** सपरिवारः **सोमं** सोमरसममृतं वा **पिब** पीत्वा **शत्रून् जहि** नाशय । **मृधः** पापानि **अपनुदस्व** परिहर । **अथ** पापपरिहारानंतरं **विश्वतः** सर्वतः **नः** अस्माकं **अभयं कृणुहि** कुरुष्व ॥

**अर्थ**—शौर्यादिगुणांनीं संपन्न, विद्वान, व शत्रूंचा नाश करणारा, अशा हे इंद्रा, एकूणपन्नास मरुतांच्या गणांसहवर्तमान व परिवारासहवर्तमान असा तूं सोमयज्ञांतील सोमलतेचा रस ( अथवा अमृत ) पिऊन आमच्या शत्रूंचा नाश कर. आमच्या पातकांचा परिहार कर. नंतर आम्हाला चोहोंकडून निर्भय कर.

**सुमित्रानआपओषधयःसंतुदुर्मित्रास्तस्मैभूयासुर्योऽस्मान्द्वेष्टियंचवयंद्विष्मः ॥**

**टीका**—इतःपरमर्धेनमंत्रेण अब्रोषधादिप्रार्थना ॥ सुमित्रानइति ॥ **नः** अस्माकं **आपः ओषधयः** च तदभिमानिनोदेवताः **सुमित्राः** सुप्रियाः **संतु** । **यः अस्मान् द्वेष्टि च वयं यं द्विष्मः तस्मै दुर्मित्राः** अप्रियकारिण्यः **भूयासुः**[२] भवंतु ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें अर्ध्या मंत्रानें उदकें व ओषधी ह्यांची प्रार्थना करितों. ] सर्व उदकें व ओषधी व त्यांच्या अभिमानी देवता हीं आमचें कल्याण करोत. जो कोणी आमचा द्वेष करितो अथवा आम्ही ज्याचा द्वेष करितों त्या आमच्या शत्रूचा नाश करोत.

**आपोहिष्ठामयोभुवस्तानऊर्जेदधातनः ॥ ११ ॥ महेरणायचक्षसेयोवःशिवतमोरसस्तस्यभाजयतेहनः । उशतीरिवमातरः तस्माअरंगमामवोयस्यक्षयायजिन्वथआपोजनयथा चनः ॥**

---

१ असभुविइत्यस्माद्धात्तोर्लोट् ।

२ भूसत्तायामित्यस्माद्धातोराशीर्लिङ् ।

**टीका**—याः **आपः**[1] जलाभिमानिन्योदेवताः **ताः** भगवन्मूर्तयः **मयोभुवः** सुखाश्रयाः **ष्ठाः** स्थाः भवथः **हि** प्रसिद्धाः **नः ऊर्जे**[2] अन्नाय रूपश्रैष्ठ्याय **महेरणाय**[3] महस्य उत्सवस्य मोक्षाख्यस्य ईरणाय प्रेरणाय **नः चक्षसे** व्यक्तापरोक्षज्ञानाय **दधात** अभवन् किल । हे **आपः यः वः** भवतीनां **शिवतमः** अतिशयेन मधुरः **रसः**[4] तत्रस्थः परमात्मा **तस्य** रसस्य भगवद्विषयकापरोक्षस्य **नः** अस्मान् **उशतीः** पुत्रवत्सलाः **मातरः इव इह** अस्मिन् जन्मनि **भाजयत** अपरोक्षभागिनः कुरुत । **हे आपः** यूयं **वः** रसं भगवद्विषयकापरोक्ष ज्ञानं **यस्य** पापस्य **क्षयाय नः** अस्माकं **जिन्वथ** उत्पादयथ तेन भगवत्प्रसादद्वारा मोक्षं **जनयथ च । तस्मै** संसारबंधादिनाशाय **अरं**[6] क्षिप्रं **गमाम**[7] अपरोक्षीकुर्मः ॥

**अर्थ**—जलाभिमानी देवतास्वरूपी भगवंताच्या मूर्ती सुखरूपीं आहेत, त्या आमच्या अन्नाकरितां (अथवा आम्हाला उत्तम रीतीचें स्वरूप देण्याकरितां), मोक्षासाठीं प्रेरणा करण्याकरितां, मोक्षोपयोगी भगवंताचा साक्षात्कार करून देण्याकरितां, प्रसन्न होऊन सिद्ध असोत. जलाभिमानी भगवंताच्या मूर्तींचा जो अतिशय उत्तम मधुर रस आहे त्या रसामध्यें राहणारा परमात्मा आम्हाला त्या भगवंताच्या साक्षात्कार होण्याचे ज्ञानाचा उपदेश, जशी पुत्राविषयीं दयाळू माता पुत्रावर कृपा करते तशी करो. हे जलाभिमानी देवतांनो, तुम्ही आम्हाला भगवंताच्या साक्षात्काराविषयीं ज्ञान द्या ( म्हणजे आमच्यावर प्रसाद करून आम्हाला प्रपंचांतील बंध-

---

१ एकशब्दैर्द्विशब्दैश्चबहुशब्दैश्चकेशवः। एकएवोच्यतेवेदैरितिच। आपयंत्यखिलान्भोगानापइत्युच्यतेहारिरिति ।

२ ऊर्वाअन्नमितिश्रुतेः ।

३ महउद्धवउत्सवइतिशब्दानुशासनं ।

४ रसोवैसःरसंह्येवायलब्ध्वानंदीभवतीतिब्रह्मवल्ल्युक्तेः।रसोऽहमप्सुकौंतेयेतिगीतोक्तेः।

५ ज्ञानज्ञानिनोरभेदात् ।

६ लघुक्षिप्रमरंद्रुतमितिशब्दानुशासनं ।

७ गम्‌गतावित्यस्माद्धातोर्लट्गच्छादेशाभावश्छांदसः ।

त्याचा नाश करण्याकरितां आम्हावर कृपा करा ) म्हणजे आम्ही भगवंताचे दर्शन करून घेऊं.

**हिरण्यशृंगंवरुणंप्रपद्येतीर्थंमेदेहियाचितः । यन्मयाभुक्तमसाधूनांपापेभ्यश्चप्रतिग्रहः । यन्मेमनसावाचाकर्मणावादुष्कृतंकृतं । तन्नइंद्रोवरुणोबृहस्पतिःसविताचपुनंतुपुनःपुनः ॥**

**टीका**—एभिर्मंत्रैर्जलाधिपं वरुणशब्दवाच्यं तत्स्थं भगवंतं च असाधूनामन्नभोजनादिकृतपापपरिहाराय तीर्थदानायार्थयते ॥ हिरण्यशृंगमिति ॥ **हिरण्यशृंगं** स्वर्णमुकुटं **वरुणं** जलाधिपतिं वरोन्नयनात् तन्नामकं भगवंतं च **प्रपद्ये** शरणं गच्छामि । वरुणः तन्नामा भगवान् **याचतः** प्रार्थयतः **मे तीर्थं** गंगादिजलं **देहि** । दत्वा च **असाधूनां** पापिनां गृहे **यत् मया भुक्तं पापेभ्यः** यः **परिग्रहः** प्रतिग्रहः कृतः **यत् मे मनसा वाचा कर्मणा वा दुष्कृतं कृतं तत् नः** अस्माकं पापादि **इंद्रः वरुणः बृहस्पतिः सविता च पुनः पुनः पुनंतु** शोधयंतु ॥

**अर्थ**—[ ह्या मंत्रांनीं वरुणदेवतेची व त्यामधील भगवंताची प्रार्थना करून दुष्टाचे घरीं प्रतिग्रह घेतल्यानें जें पाप होतें त्याचा नाश होण्याकरितां व तीर्थ देण्याकरितां त्यांची प्रार्थना करितो. ] ज्याचा मुगुट सोन्याचा असून जो जलाचा राजा वरुण आहे आणि जो वर देणारा असल्यामुळें वरुण नांवाचा आहे अशा भगवंताला आम्ही शरण आहों. वरुणनामक भगवान मला गंगा इत्यादि तीर्थ देवो; आणि तीं देऊन दुष्टांच्या घरीं भोजन केल्याबद्दलचें पाप, मनामध्यें पापाचा संकल्प केल्यामुळें झालेलें पाप, अमुक पाप करीन असें मुखानें उच्चारल्यापासून झालेलें पाप, ह्या सर्व आमच्या पातकांचा नाश इंद्र, वरुण, बृहस्पति, व सूर्य आणि त्यांमधील परमात्म्याच्या मूर्ती वारंवार पातकें धुवून टाकून करोत.

नमोऽग्नयेऽप्सुमतेनमइंद्रायनमोवरुणायनमोवारुण्यैन-
मोद्भ्यः ॥ १२ ॥ यदपांक्रूरंयदमेध्यंयदशांतंतदपगच्छतात् ॥

टीका—जलावस्थितदेवतानां नमस्कारमंत्रानाह ॥ नमोऽग्नयइति ॥ **अप्सुमते**[1] अप्सुमत्वगुणकाय **अग्नये** वाडवानलाय **नमः**। **इंद्राय**[2] **नमः**। **वरुणाय**[3] **नमः**। **वारुण्यै** शेषपत्न्यै नमः वरुणान्यै वा नमः। **अद्भ्यः** उदकाभिमानिभ्यः **नमः**। **अपां** उदकानां **यत् क्रूरं** आवर्तादि **यत् अमेध्यं** अपवित्रं निष्ठीवनादिदुष्टं **यत् अशां** तं असुखं **तत्** श्लेष्मादिजनकं **अपगच्छतात्** अस्मान्निमज्जनदेशात् अपयातु ॥

अर्थ—[ जलांत राहणाऱ्या देवतांना नमस्कार करण्याचे मंत्र सांगतो. ] उदकामध्यें राहणाऱ्या वडवाग्नीला नमस्कार असो. इंद्राला नमस्कार असो. वरुणाला नमस्कार असो. शेषाच्या पत्नीला ( अथवा वरुणपत्नीला ) नमस्कार असो. उदकाभिमानी देवतांना नमस्कार असो. माझ्या स्नान करण्याच्या ठिकाणीं जे उदकामध्यें भोंवरे, मूत्र, पुरीष, इत्यादि असतील ते सर्व माझ्या स्नान करण्याच्या स्थानापासून दूर जावोत.

अत्याशनादतीपानाद्यच्चउग्रात्प्रतिग्रहात् । तन्नोवरुणोराजापाणिनाह्यवमर्शतु । सोहमपापोविरजोनिर्मुक्तोमुक्तकिल्बिषः । नाकस्यपृष्ठमारुह्यगच्छेद्ब्रम्हसलोकतां । यश्चाप्सुवरुणः सपुनात्वघमर्षणः ॥

टीका—इतःपरं निमज्जनमंत्रानाह ॥ अत्याशनादिति ॥ **अत्याशनात्** भगवन्निवेदनमतिक्रम्य अशनात् बहुभोजनाच्च **अतिपानात्**[4] भगवत्तीर्थमतिक्रम्यपानात् अत्यंबुपानाद्वा **उग्रात्** उच्छास्त्रवर्तीयस्तस्मात् **प्रतिग्रहात्** यद्वा कालपुरुषादिदानप्रतिग्रहाच्च **यत्** जनितं पापं **तत्** मे मदीयं

१ आपोयोनियन्मतुप्इतिसूत्रेणसप्तम्याअलुक् ।

२ इदिपरमेश्वर्येइत्यस्माद्धातोरक्प्रत्ययः ।

३ वृवरणेइत्यस्माद्धातोरुन्प्रत्ययः ।

४ अतीपानादित्यत्रउपसर्गस्यदीर्घश्छांदसः ।

**वरुणः राजा पाणिना** स्वकीयेन हस्तेन **अवमर्शतु** अपनयतु **हि** । ततः **सः अपापः** पापरहितः **अहं विरजः** रजोगुणोपलक्षितप्रकातिबंधरहितः संसारकारणरागद्वेषादिभ्यः **निर्मुक्तः** अतएव **मुक्तकिल्बिषः** संचितागामिपापविधुरः **नाकस्य** स्वर्गस्य **पृष्ठं** ततोप्युच्चं महरादिलोकं **आरुह्य** ब्रम्हसलोकतां चतुर्मुखस्यसलोकतां परब्रम्हसमानलोकतांसालोक्यमुक्तिं च **गच्छेत्** गच्छेयं । **यः च अप्सु** उदके **वरुणः** वरणीयः हरिः **सः** प्रसिद्धः **अघमर्षणः** पापमर्षकः **पुनातु** ।

**अर्थ**—[ ह्या पुढें बुडी मारण्याचा मंत्र सांगतो. ] भगवंताला अर्पण केल्याशिवाय अन्न खाल्ल्यानें ( किंवा फार जेवल्यानें ), भगवंताचें तीर्थ घेतल्याशिवाय पाणी प्याल्यानें ( किंवा फार पाणी प्याल्यानें ), शास्त्रांत जें दान घ्यावें म्हणून सांगितलें आहे त्याशिवाय दुसरें दान घेतल्यानें ( किंवा काळपुरुषाचें दान घेतल्यानें ), उत्पन्न झालेलें जें आमचें पाप तें वरुणराजा आपल्या हातानें दूर करो. त्यानंतर पापरहित झालेला असा मी, रजोगुणानें युक्त अशा प्रकतिबंधानें रहित, संसारास कारणभूत अशा प्रीति, द्वेष, इत्यादिकांपासून मोकळा झालेला, व ह्या कारणानें पूर्वींचें सांचलेलें व पुढें येणारें अशा पापानें रहित, असा होऊन स्वर्गापेक्षां उंच असलेल्या महरादिक लोकीं जाऊन ब्रम्हदेवाच्या लोकाला व तेथून भगवंताच्या लोकाला जाईन. जो उदकामध्यें भगवान् आहे तो पापनाश करणारा मला पवित्र करो.

**इमंमेगंगेयमुनेसरस्वतिशुतुद्रिस्तोमꣳसचतापरुष्णिया ।**
**असिक्नियामरुद्वृधेवितस्तयार्जीकीयेशृणुह्यासुषोमया ।**

**टीका**—तीर्थभूतानांगंगादिनदीनांजलदेवतानामावाहनमंत्रानाह ॥ इमामिति ॥ **गंगे** हे भागीरथि **यमुने** हे सूर्यतनये **सरस्वति** सरस्वतीचप्रसिद्धा **शुतुद्रि** इति नदीविशेषस्य संज्ञा **मरुद्वृधे** हे कावेरि **आर्जीकीये**

---

१ पुरुषव्यत्ययश्छांदसः

२ कवेरकन्याकावेरीसह्ययोनिर्मरुद्वृधेतिकोशात् ।

इति नदीविशेषस्यसंज्ञा **अपरुष्णिया असिक्निया वितस्तया आसुषो-मया** एताभिर्नदीभिः सहिता **मे** मदीयं **इमं स्तोमं** स्तोत्रं **शृणुहि** । तत्-श्रुत्वा ततः **सचत** आगत्य जलद्वारेण मयि समवेता भवत ।

**अर्थ**—[ तीर्थप्रमाणें असलेल्या गंगा इत्यादि जलदेवतारूप नद्यांना बोलावण्याचे मंत्र सांगतों. ] हे भागीरथी, हे यमुने, हे सरस्वति, हे शुतु-द्रि, हे कावेरी, हे आर्जीकीये, तूं अपरूष्णी असिक्नी वितस्ता व आसु-षोमा ह्या नद्यांसह माझें हें स्तोत्र ऐक. तें ऐकून मग तुम्ही येऊन माझे ठिकाणीं जलरूपानें एकत्र व्हा.

**ऋतंचसत्यंचाभीद्धात्तपसोऽध्यजायत । ततोरात्रिरजा-यतततःसमुद्रोअर्णवः ॥ १३ ॥ समुद्रादर्णवादधिसंवत्सरो अजायत । अहोरात्राणिविदधद्विश्वस्यमिषतोवशी । सू-र्याचंद्रमसौधातायथापूर्वमकल्पयत् । दिवंचपृथिवींचांतरि-क्षमथोसुवः ।**

**टीका**—जलेनिमग्नस्यप्राणायामार्थमघमर्षणसूक्तमाह ॥ ऋतंचेति ॥ **ऋतं** यथार्थविज्ञानं **च सत्यं** यथार्थभाषणं **च** तत्सर्वं **अभीद्धात्** आभि-तःप्रकाशमानात् परमात्मनः **तपसः अधि** स्रष्टव्यपर्यालोचनालक्षणतपसः ऊर्ध्वं **अजायत** उत्पन्नं । **ततः** तस्मात् परमेश्वरात् **रात्रिः** उत्पन्ना । **ततः** परमेश्वरात् **अर्णवः** अब्धिः अवांतरभेदयुक्तः समुद्रिक्तः **समुद्रः** उत्प-न्नः । **समुद्रात् अर्णवात् अधि संवत्सरः** ब्रम्हा **अजायत** उत्पन्नः । तत्र **अहोरात्राणि** प्राणरयिरूपाणि **विदधत्** कृतवान् । **मिषतः** पश्यतः **विश्वस्य वशी** समस्तप्रपंचवशीकरणकर्ता **धाता** परमेश्वरः **यथापूर्वं**

---

१ चशब्दात्स्वीयंवर्नजातंसमुच्चीयते ।

२ सतपस्तत्वाइदं सर्वमसृजतेतिब्रम्हवल्ल्यां । यस्य ज्ञानमयं तपइतिश्रुत्यंतराच्च ।

३ सात्मनोमनसाऽध्याक्षीदपएवजनार्दनः ॥ शयानस्तासुभगवान्निर्ममेंऽडं महत्तरं ॥ तत्र संवत्सरंनाम ब्रम्हाणमसृजत्प्रभुरितिभाष्योदाहृतमहाकौर्मवचनात् ॥

४ अहरेवप्राणोरात्रिरेवरयिरितिप्रश्नो । निघादि ।

अतीतसृष्टौयस्ययादृशंरूपंतादृशमनतिक्रम्य **सूर्याचंद्रमसौ** सूर्यादिदेवान् **दिवं च पृथिवीं च** पृथिव्यादिलोकांश्च **अंतरिक्षं च सुवः** तदुपरितनलोकांश्च **अकल्पयत्** संकल्पमात्रेणसंपादितवानित्यर्थः ।

**अर्थ**--[ पाण्यांत बुडी मारलेल्यानें प्राणायाम करण्यासाठीं अघमर्षणसूक्त ( म्हणजे पाप दूर करणारें स्तोत्र ) सांगतो. ] वास्तविक ज्ञान व खरें भाषण इत्यादि सर्व धर्म, प्रकाशमान परमात्म्यानें आपण सृष्टिउत्पन्न करण्याविषयीं विचार केल्यावर उत्पन्न झाले. परमेश्वरापासून रात्र उत्पन्न झाली. परमेश्वरापासून सागर व महासागर उत्पन्न झाले. सागर व महासागर ह्यांच्यापुढें ब्रम्हदेव उत्पन्न झाला. त्यांत प्राणरूप दिवस व रयिरूप रात्र हीं परमेश्वरानें केलीं. सर्व दृश्य जगताला आपल्या स्वाधीन ठेवणारा अशा परमेश्वरानें पूर्वीप्रमाणेंच सूर्य इत्यादि देव, पृथिवी इत्यादि लोक, अंतरिक्ष लोक, व त्याच्याही वर असणारे लोक केवळ संकल्पानें उत्पन्न केले.

**यत्पृथिव्याꣳरजस्वमांतरिक्षेविरोदसी । इमाꣳस्तदापोवरुणःपुनात्वघमर्षणः पुनंतुवसवःपुनातुवरुणःपुनात्वघमर्षणः ।**

**टीका**—अघमर्षणस्नानंकृत्वाततऊर्ध्वमवगाहनार्थंतिस्रोऋचोदर्शयति ॥ यदिति ॥ **पृथिव्यां** वर्त्तमानानांअस्माकं **यत् स्वं** स्वकीयं **रजः** पापं अस्ति । **आंतरिक्षे** अंतरिक्षलोके वर्त्तमानदशायां **विरोदसी** द्यावापृथिव्योर्वर्त्तमानदशायां यत् पापमस्ति च सर्वेष्वपि लोकेषु तत्तच्छरीराण्यनुभूयमानानामस्माकं तत्तच्छरीरेष्वनुष्ठितं यत् पापमस्ति **तत्** सर्वं **इमान्** अवगाहमानान् प्राणिनः **आपः** जलस्वामित्वेन तद्रूपः **अघमर्षणः** पापहारी **वरुणः** हरिः **पुनातु** शोधयतु शुद्धानस्मान्करोत्वितियावत्। **वसवः** अष्टवसवः पुनंतु । **वरुणः पुनातु** । **अघमर्षणः** हरिः पुनातु ।

**अर्थ**--[ पापनाशक स्नान करून त्यानंतर पुढील स्नानाकरितां

---

1 देवताद्वंद्वेचेतिसूत्रेणपूर्वपदस्यअनादेशः ।

तीन ऋचा सांगतो. ] पृथ्वीवर असणाऱ्या अशा आमचें जें पाप आहे, अंतरिक्ष लोकांत असतांना आणि पृथ्वी व स्वर्ग ह्यांमध्यें असतांना आमचें जें पाप आहे, तसेंच सर्व लोकीं तेथील शरीरें धारण करणारे अशा आम्ही त्या शरीरांत जें पाप केलें आहे, त्या सर्व पापाला व स्नान करणाऱ्या प्राण्यांना उदकरूप व उदकांचा स्वामी व पापनाशक असा वरुण पवित्र करो, आठ वसु पवित्र करोत, वरुण पवित्र करो व हरि पवित्र करो.

एषभूतस्यमध्येभुवनस्यगोप्ता । एषपुण्यकृतान्लोकानेषमृत्योर्हिरण्मयं । द्यावापृथिव्योर्हिरण्मय ँ स ँ श्रित ँ सुवः ॥ १४ ॥

**टीका**—कथंभूतः परमात्माइत्यतआह ॥ एषइति ॥ **एषः** परमात्मा **भूतस्य** अतीतस्य पंचमहाभूतस्य वा **भुवनस्य** चतुर्दशभुवनस्य स्वसृष्ट प्रपंचस्य वा **मध्ये** अंतः प्रविष्टः[1] ततः **गोप्ता** रक्षकः । **एषः** परमात्मा **पुण्यकृतान्** पुण्यकारिणः **लोकान्** दत्वा गोप्तारक्षकः । **एषः** अघमर्षणः परमात्मा **मृत्योः** सर्वप्राणिमारकस्य यमस्य संबंधिनं **हिरण्मयं** लोकविशेषं **द्यावापृथिव्योः संश्रितं सुवः** स्वर्गलोकं दत्वा गोप्ता रक्षकः अस्ति ॥ १४ ॥

**अर्थ**--[ परमात्मा कसा आहे तें सांगतो. ] परमात्मा हा, भूतकाळच्या ( किंवा पंचमहाभूतांच्या ) चवदा भुवनांमध्यें ( किंवा आपण उत्पन्न केलेल्या प्रपंच्यामध्यें ) शिरलेला आहे. म्हणून तो रक्षण करणारा आहे. परमात्मा हा, पुण्यांनीं मिळणाऱ्या लोकांस नेऊन रक्षण करितो. परमात्मा हा, सर्व प्राण्यांचा नाश करणारा असा जो यम त्याच्या हिरण्मय लोकाला नेतो. परमेश्वर हा, आकाश व पृथिवी ह्यांच्या आश्रयानें असणाऱ्या स्वर्गलोकाला नेऊन रक्षण करणारा आहे ॥ १४ ॥

---

१ तत्सृष्ट्वातदेवानुप्राविशदितिब्रह्मवल्ल्यां ।

**सनः सुवः सꣳशिशाधि । आर्द्रंज्वलतिज्योतिरहमस्मि । ज्योतिर्ज्वलतिब्रम्हाहमस्मि । योहमस्मिब्रम्हाहमस्मि । अहमस्मिब्रम्हाहमस्मि । अहमेवाहंमांजुहोमिस्वाहा ॥**

**टीका—सः** त्वं पूर्वोक्तोभगवान् **नः** अस्माकं **सुवः** सुखं **संशिशाधि** देहि । स्नानोत्तरमाचमनार्थंमंत्रानाह ॥ आर्द्रमिति ॥ **आर्द्रं** जलं **ज्वलति** । यतः स्नानेनापगतमलः अतः **अहं ज्योतिः** प्रकाशमानः अभिव्यक्तज्ञानानंदरूपः **अस्मि ज्योतिः** प्रकाशमानस्वरूपे जीवे **ज्वलति** सति **अहं ब्रम्हा** स्वयोग्यज्ञानानंदादिपूर्णः **अस्मि । यः** प्रकाशितस्वरूपः **अहं अस्मि** सः **अहं ब्रम्हा** स्वयोग्यज्ञानानंदादिपूर्णः **अस्मि । अहं** अहेयः मदंतर्यामिब्रम्ह **अस्मि** नित्यमस्ति । **अहं ब्रम्ह** ब्रम्हाधीनः तदाश्रितः तत्सदृशो वा **अस्मि । अहं एव अहं मां** अहं ममताबुद्धिं अप्सु आत्माग्नौवा **जुहोमि स्वाहा**[1] वेदप्रतिपाद्य इति ॥

**अर्थ**—पूर्वी सांगितलेला असा तूं भगवान्, मला सुख दे. [ स्नान केल्यावर आचमन करण्याकरितां मंत्र सांगतो. ] जल प्रकाशमान आहे. स्नानानें मळ नाहींसा होऊन स्वच्छ झालेला अशा मला माझें ज्ञानानंदस्वरूप प्रकट झालें आहे. माझें प्रकाशमान स्वरूप प्रकट झालें असतां मी आपल्या योग्यतेनुसार ज्ञानानंदानें पूर्ण आहें. जो प्रकाशमान स्वरूप मी आहें तो मी आपल्या योग्यतेनुसार ज्ञानानंदानें पूर्ण आहें. माझ्या अंतर्यामी असलेलें ब्रम्ह नित्य आहें. मी ब्रम्हाचे स्वाधीन ( किंवा त्याच्या आश्रयानें किंवा त्याच्यासारखा ) आहें. हा मी व हे माझें अशा माझ्या बुद्धीला मीच जलामध्यें किंवा आत्मरूप अग्नीमध्यें जाळून टाकितों. स्वाहा[2] ॥

---

१ सुष्ठु आहूयतेवेदवचनैरितिस्वाहा । गोविंदोवेदप्रतिपाद्यइतियावत् ।

२ वेदानें ज्याचें वर्णन उत्तम रीतीनें केलें आहे तो.

**अकार्यकार्यवकीर्णीस्तेनोभ्रूणहागुरुतल्पगः । वरुणो ऽपामघमर्षणस्तस्मात्पापात्प्रमुच्यते । रजोभूमिस्त्वमाꣳ रोदयस्व प्रवदंतिधीराः ॥**

**टीका**—आचमनमंत्रानभिधायाचमनोर्ध्वं पुनरपिस्नानमंत्रानाह ॥ अकार्यकार्यवकीर्णीति ॥ अहं **अकार्यकारी** अभक्ष्यभक्षणाद्यकारी यद्वा अकार्यं शास्त्रप्रतिषिद्धं कलंजभक्षणादिकरणशीलः **अवकीर्णी** क्षतव्रतः प्रतिषिद्धस्त्रीगंतावा **स्तेनः** तस्करः ब्रम्हस्वहर्ता वा **भ्रूणहा** वेदवेदांगविद्ब्राम्हणभ्रूणहंता **गुरुतल्पगः** गुरुभार्यानुगः एतादृशं मां **अघमर्षणः** पापहारी **अपां वरुणः** तच्छब्दवाच्यः परमात्मा **तस्मात् पापात् प्रमुच्यते**[1] प्रमोचयेत् । यद्यप्यहं **रजोभूमिः** रजोगुणप्रचुरः अविद्याबद्धः पापाश्रयः इति **धीराः** ज्ञानिनः **प्रवदंति** तथापि त्वं **मां रोदयस्व** दुःखोद्रेकं कारयित्वा तत्कार्यरोदनं माकारय यद्वा कृच्छ्रचांद्रायणादितपःक्लेशयुक्तान्नः कुरु इतिधीराः प्रवदंति ॥

**अर्थ**—[ आचमनाचा मंत्र सांगून पुनः स्नानाचा मंत्र सांगतो. ] अभक्ष्य पदार्थ खाणारा ( अथवा शास्त्रामध्यें निषिद्ध अशीं कलंगडें इत्यादि खाणारा ), ब्रम्हचर्य व्रतापासून भ्रष्ट ( अथवा निषिद्ध स्त्रीबरोबर संग करणारा ), चोरी करणारा ( अथवा ब्राम्हणाचें द्रव्य चोरणारा ), वेदादि जाणणाऱ्या ब्राम्हणापासून झालेल्या गर्भाची हत्या करणारा, गुरुपत्नीशीं गमन करणारा, अशा मला, पापापासून दूर करणारा असा पाण्याचा राजा वरुण नांवाचा परमात्मा पापापासून दूर करो. जरी मी स्वतः मायेनें बद्ध, मोठा पातकी, व रजोगुणानें पूर्ण, असा आहे असें ज्ञानी लोक म्हणतात, तरी मला ह्या पातकापासून होणाऱ्या दुःखापासून तो दूर करो ( अथवा चांद्रायण व कृच्छ्र इत्यादि तपानें दुःखयुक्त असा )

---

१ प्रपूर्वात् मुच्लृमोक्षण इत्यस्माद्धातोर्लंतर्णितण्यर्थाच्छंदसिलट् ।

मला करो. तात्पर्य, मला चांगल्या रस्त्यानें जाण्याची बुद्धि देवो असें ज्ञानी म्हणतात ॥

**आक्रान्समुद्रःप्रथमेविधर्मन्जनयन्प्रजाभुवनस्यराजा । वृषापवित्रेअधिसानोअव्येबृहत्सोमोवावृधेसुवानइंदुः॥१९॥**

**टीका**—स्नानानंतरमात्मशुध्यर्थं जप्यमंत्रानाह आक्रानिति ॥ **समुद्रः** समुत् मुदं प्रीतिं रातिददातीति अथवा मुद्रयाशंखादिकया सहितः परमात्मा **आक्रान्** व्याप्तः पदविक्षेपवान्वा **विधर्मन्** विधर्मणि नामरूपादिधर्मरहिते **प्रथमे** सृष्ट्यादौ **प्रजाः जनयन् भुवनस्य** चतुर्दशभुवनस्य तत्स्थजनस्य **राजा** स्वामी **वृषा** भक्ताभीष्टसेचकत्वात् **सोमः** मया लक्ष्म्यासहितः **इंदुः** चंद्र इव परमात्मा **सानः** सासनः **पवित्रे** शुद्धे **अव्ये** रक्षणीये **अधि** मयि **बृहत्** वृधिं **सुवानः** सुवनं कुर्वन् **वावृधे** अभिवृद्धः सः अस्मान् रक्षतु ॥ १९ ॥ इति प्रथमानुवाकः ॥ १ ॥

**अर्थ**—[ स्नान केल्यावर आपली शुद्धि होण्याकरितां ज्यांचा जप करणें योग्य आहे असे मंत्र सांगतो. ] आनंद देणारा ( अथवा शंखचक्र इत्यादि मुद्रांनीं युक्त असणारा ) म्हणजे परमात्मा सर्व व्यापक ( अथवा वामनअवतारीं सर्व त्रैलोक्य पायानीं व्यापणारा ) असा आहे. सृष्टि करण्याचे पूर्वीं चौदा लोकांना उत्पन्न करणारा, भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा, लक्ष्मीसहित असणारा, चंद्राप्रमाणें आनंद देणारा, आपल्या आसनानें सहित असा, पवित्र आणि रक्षणास योग्य अशा माझ्या ठिकाणीं वृद्धि करणारा, फार मोठा वृद्धि पावलेला, असा परमात्मा माझें कल्याण करो व माझें रक्षण करो ॥ १९ ॥ ह्याप्रमाणें पहिला अनुवाक संपला ॥ १ ॥

**परस्ताद्यशोगुहासुममचक्रतुंडायधीमाहि तीक्ष्णदꣳष्ट्रायधीमाहि परिप्रतिष्ठितं देभुर्यच्छतुदधातनाद्ध्योर्णवः सुवोराजैकंच ॥ १ ॥ रुद्रोरुद्रश्च दंतिश्च नंदिः षण्मुख एवच । गरुडोब्रम्हाविष्णुश्च नारासिꣳहस्तैथवच । आदित्योग्निश्च दुर्गिश्चक्रमेणद्वादशांभासि । ममवच मसुवेनावभावैकात्यायनाय ॥**

**जातवेदसेसुनवामसोममरातीयतोनिदहातिवेदः । सः पर्षदातिदुर्गाणिविश्वानावेवासिंधुंदुरितात्यग्निः ।**

टीका—अथानिष्टपरिहारार्थेंजप्यमंत्रानाह ॥ जातवेदसइति ॥ **जातवेदसे** जातं सर्वंवेत्तीति तस्मै सर्वज्ञाय अग्नये तदंतस्थाय हरये च **सोमं** सोमरसं अमृतं वा **सुनवाम** अभिषवयुक्तं करवाम । स च **देवः** अस्मान् **अरातीयतः**[1] शत्रुवदाचरतः जनान् **निदहाति** नितरां भस्मीकरोतु । **सः अग्निः अतिपर्षत्** अतिपर्षयती अतिशयेननाशयंती **विश्वा** विश्वानि **दुर्गाणि** यथा नाविकः **नावा इव सिंधुं**[2] समुद्रंवानद्यां तारयाति तथा **देवः नः दुरितात्** पातकात् **अति** तारयतु ॥ १ ॥

**अर्थ**—[ आतां अनिष्टांचा नाश होण्याकरितां जप करण्याचे मंत्र सांगतो. ] सर्वज्ञ अशा अग्नीला व त्यामधील परमात्म्याला सोमरसांनीं ( अथवा अमृतांनीं ) युक्त आहे अशा रीतीनें जाणून आम्ही त्याची पूजा करतो. तो अग्नि ( अथवा अग्नीमधील परमात्मा ) आमच्याशीं शत्रुभावानें वागणाऱ्या दुष्ट लोकांचा अतिशय नाश करो. जसा एकादा नावाडी नावेमध्यें बसवून मनुष्याला नदींतून किंवा समुद्रांतून तारून नेतो तसा तो अग्नीमधील परमात्मा आम्हाला आमच्या पातकापासून तारो ॥१॥

**तामग्निवर्णांतपसाज्वलंतींवैरोचनींकर्मफलेषुजुष्टां । दुर्गांदेवीꣳशरणमहंप्रपद्येसुतरसितरसेनमः ॥ २ ॥**

टीका—द्वितीयांऋचमाह ॥ तामिति ॥ **तां** पूर्वोक्तां प्रसिद्धां **अग्निवर्णां** अग्निसमानवर्णां **तपसा ज्वलंतीं** स्वकीयेन संतापेन दीप्यमानां **वैरोचनीं**[3] विरोचनस्य परमात्मनः संबंधिनीं **कर्मफलेषु** स्वर्गपशुपुत्रादिषु

---

१ अरातिशब्दादाचारार्थे उपमानादाचारइतिसूत्रेण क्यजंताच्छतृप्रत्ययः ।

२ सिंधुर्नासरितिद्वियामितिशब्दानुशासनात् ।

३ विशेषेणरोचतेऽसौविरोचनः परमात्मातस्येयमित्यर्थेअण्णंतात्ङीप्प्रत्ययः ।

उपासकैः **जुष्टां** सेवितां **दुर्गां देवीं अहं शरणं प्रपद्ये ।** हे दुर्गे स्वयं दुर्गाणि **सुतरासि** तीर्णा वर्त्तसे **तरसे**[1] परान्तारयसि वा । अतः ते तुभ्यं-तारयिंत्र्यै **नमः ॥ १ ॥**

**अर्थ**—[ दुसरी ऋचा सांगतों. ] पूर्वी सांगितलेली अग्नीच्या वर्णा-सारखी, स्वतःच्या तपानें प्रकाशमान असणारी, परमात्म्याच्या संबंधाची, आपापल्या कर्मांचें फल स्वर्ग पुत्र पशु इत्यादिक मिळण्याकरितां विद्वान लोकांनीं जिची उपासना केली आहे, अशा दुर्गादेवीला मी शरण जातों. हे दुर्गादेवी, तूं स्वतः संकटांपासून दूर आहेस ( किंवा तूं आपल्या भक्तांचें संकट दूर करण्यास समर्थ आहेस ). ह्यास्तव तुला मी नमस्कार करितों ॥ १ ॥

**अग्नेत्वंपारयानव्योअस्मांत्स्वस्तिभिरतिदुर्गाणिविश्वा । पूश्चपृथिवीबहुलानउर्वीभवातोकायतनयायशंयोः ।**

**टीका**—हे **अग्ने** अग्निशब्दवाच्यपरमात्मन् **त्वं अनव्यः** प्राचीनः **स्वस्तिभिः** क्षेमैः **विश्वा दुर्गाणि** सर्वाणिदुःखानि **अस्मान् अति-पारय**[2] पारं गमय संसारस्य पारं तारय । **नः** अस्माकं **तोकाय तनयाय** आत्मजाय **शंयोः**[3] सुखार्थं **भव** । निवासयोग्या **पूः**[4] **च** पुरी सापि **पृथिवी बहुला** विस्तीर्णा **उर्वी** सस्यादिधान्यनिष्पादनयोग्या भवतु ।

**अर्थ**— हे अग्निनामक परमात्म्या, तूं फार पूर्वींचा आहेस. तूं आमचें कल्याण करून आम्हास दुःखापासून तार म्हणजे आम्हाला प्रपंचांतून पार ने. आमच्या मुलांना सुख दे. आम्हास रहाण्याकरितां नगरी दे व ती नगरी मोठी व धान्यांनीं पूर्ण अशी असो.

---

१ तरसइत्यत्रतृतरणइत्यस्मादंतार्णतोलट् ।

२ पारतीरकर्मसमाप्ताविविधातोर्णिजंतालोट् ।

३ शंशब्दात् ।

४ पूःस्त्रीपुरीनगर्यौवेतिशब्दानुशासनं ।

**विश्वानि नो दुर्गहा जातवेदः सिंधुंननावादुरितातिपर्षि। अग्नेअत्रिवन्मनसागृणानोऽस्माकंबोध्यवितातनूनां॥**

**टीका**—हे **जातवेदः दुर्गहा** सर्वासामापदां अपहंता त्वं **विश्वानि दुरिता** दुरितानि सर्वाणि पापानि **नावा सिंधुं** नदीमिव **नः** अस्मान् **अतिपर्षि** अतिशयेन तारयसि । हे **अग्ने अत्रिवत्** अत्रिरिव **त्वं मनसा गृणानः** निश्चितवान् **अस्माकं तनूनां अविता** रक्षकः सन् **बोधि** मदिंगितं जानीहि अनुग्रहोन्मुखोभवेति यावत् ॥

**अर्थ**—हे सर्वज्ञ अग्नि, तूं सर्व विपत्तींचा नाश करणारा आहेस. जसा एखादा नावाडी नावेच्या सहायानें दुसऱ्याला नदींतून पार करितो तसा तूं सर्व पापांपासून आम्हाला तार. हे अग्नि, तूं मनानें जाणून आमचे शरीराचें रक्षण कर व माझ्या मनांतील अभिप्राय जाण ( म्हणजे माझ्यावर कृपा कर. )

**पृतनाजितँ सहमानमुग्रमग्निँ हुवेमपरमात्सधस्थात्। सनःपर्ष दतिदुर्गाणि विश्वाक्षामद्देवोअति दुरितात्यग्निः**

**टीका**—**पृतनाजितं** पृतनाः परकीयसेनाः जयतीतितं अतएव **सहमानं** शत्रूनाभिभवंतं **उग्रं** क्रूरं **अग्निं परमात् सधस्थात्** स्वकैर्भृत्यैः सहअवस्थानदेशात् **हुवेम** आव्हयामः । **सः** अग्निः **नः विश्वा दुर्गाणि** सर्वाणि पापानि **पर्षदति** नाशयतु **क्षामद्देवः अग्निः दूरिता** पातकेभ्यः **अति** अतिक्रमणंकरोतु ॥

**अर्थ**—शत्रूंच्या सेनांचा नाश करणारा, म्हणून शत्रूंचा नाश करणारा, व फार क्रूर, अशा अग्नीला आम्ही त्याच्या चाकरासुद्धां बोलावितो. तो अग्नि आमचे सर्व पातकांचा नाश करो. सर्वांमध्यें समर्थ असा अग्नि आम्हाला आमच्या पातकांपासून दूर करो.

**प्रत्नोषिकमीड्योअध्वरेषुसनाच्चहोतानव्यश्चसत्सि। स्वांचाग्नेतनुवंपिप्रयस्वास्मभ्यंचसौभगमायजस्व।**

**टीका**--हे अग्ने **अध्वरेषु** यज्ञेषु **ईड्यः** स्तुत्यः सन् **कं** सुखं **प्रत्नोषि**[1] प्रतनोषि प्रकर्षेण करोषीतियावत् । चत्वं **सनात्**[2] हविर्भाजकात् **च नव्यः** नूतनः **होता** स्तुत्यश्च **सत्सि** सीदसि । अतः **च अग्ने स्वां** स्वकीयां **तनुवं** तनूं **पिप्रयस्व** अस्मदीयहविषा प्रीणय ततः **च अस्मभ्यं सौभगं** शोभनभाग्योपेतं **आयजस्व**[3] सर्वतः देहि ॥

**अर्थ**-हे अग्नि, तूं यज्ञामध्येंस्तुतीस योग्य असून आम्हाला सुख देतोस. होमद्रव्य घेणाऱ्यांमध्यें तूं नवा व स्तुत्य आहेस. म्हणून हे अग्नि, तूं आपल्या स्वतःचे शरीरास आम्ही दिलेल्या होमद्रव्यांनीं संतुष्ट कर. नंतर आम्हाला सर्व ऐश्वर्य दे.

**गोभिर्जुष्टमयुजोनिषिक्तंतवेंद्रविष्णोरनुसंचरेम । नाकस्यपृष्ठमभिसंवसानोवैष्णवींलोकइहमादयंतां । इति द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥ अग्निश्चत्वारिच ॥ २ ॥**

**टीका**--हे **इंद्र गोभिः** धेनुभिः **जुष्टं** प्राप्तं पयः[4] दधि वा **अयुजः**[5] अकारवाच्यविष्णुनासहितस्य **तव निषिक्तं** नितरां सिक्तं घृतसिक्तं वा । **विष्णोः अनु** पश्चात् तत्धोमकरणानंतरं वा **संचरेम** होमाचरणं कुर्मः । त्वं **नाकस्य** स्वर्गस्य **पृष्ठं** विस्तीर्णप्रदेशं सुधर्मसभादिकं **अभिसंवसानः** आवासं कुर्वन् **वैष्णवीं** विष्णुभक्तप्रजा **इह लोके मादयंतां**[6] मादय हर्षय ॥ इति द्वितीयोनुवाकः ॥

**अर्थ**--हे इंद्रा, परमात्म्यासहित तुला प्रसन्न करण्याकरितां गायीचें दूध किंवा दहिं किंवा तूप अर्पण केलें. विष्णूच्या मागून ( किंवा त्या-

---

१ प्रत्नोषीत्यत्रतनोतेरुपः लोपश्छांदसः ।

२ सनात् वनषणसंभक्तावितिधातोः ।

३ यजदेवपूजासंगतिकरणदानेष्वितिधातोः ।

४ ऐंद्रंपयोअमावास्यायामितिवेदोक्तेः ।

५ अकारोवासुदेवःस्यादाकारस्तुपितामहः इति शब्दानुशासनोक्तेः ।

६ एकवचनव्यत्ययश्छांदसः

च्या उद्देशानें ) होम केल्यानंतर तुझ्यासाठीं होम करितों. तूं स्वर्गामध्यें सुधर्मानामक सभेंत राहून ह्या लोकीं परमात्म्याचे भक्तांना आनंदित कर. ह्याप्रमाणें दुसरा अनुवाक संपला ॥ २ ॥

**भूरन्नमग्नये पृथिव्यै स्वाहा भुवोऽन्नं वायवेऽन्तरिक्षाय स्वाहा सुवरन्नमादित्याय दिवे स्वाहा भूर्भुवःसुवरन्नं चंद्रमसे दिग्भ्यः स्वाहा नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवःसुवरन्नमों ॥ इति तृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥**

**टीका—अग्नये** प्रसिद्धाग्निदेवतायै **भूः** भूस्थं हविः समिधादिकं **अन्नं** अद्यं तदन्नप्रदायै **पृथिव्यै स्वाहा** सुहुतमस्तु। परमात्मपक्षे **भूः**[1] ज्ञानरूपो-भूस्थोऽनिरुद्धः **अग्नये अन्नं**[2] उपजीव्यः। **पृथिव्यै** सएव अन्नं **स्वाहा** वेदप्रतिपाद्यः परमात्मास्ति। **भुवः** भुवर्लोकः **वायवे** भूतवायवे **अंतरिक्षाय** च तदाश्रितप्राणिभ्यश्च **अन्नं** संचर्वणीयः उपजीव्यः **स्वाहा**। परमात्मपक्षे **भुवः** भूरिवीर्यत्वात् भुवःशब्दवाच्यः प्रद्युम्नः **वायवे** मुख्यप्राणाय **अंतरिक्षाय** अंतरिक्षस्थः प्राणिनां चान्नं उपजीव्यः। अंतरीक्षणीयत्वेनांतरिक्षशब्दवाच्याय परमात्मने **स्वाहा**। **सुवः** सुवर्लोकः **आदित्याय** तदुपलक्षितदेवेभ्यः **अन्नं** उपजीव्यं **दिवे** दिव् तस्मै **स्वाहा**। परमात्मपक्षे **सुवः** सुबलरूपत्वात् सुवर्लोकगतः संकर्षणः **आदित्याय** अदितिपुत्रेभ्यः देवेभ्यः **अन्नं दिवे**[3] द्योतमानाय परमात्मने **स्वाहा**। **भूः भुवः सुवः** तल्लोकानां तत्स्थानां ओषधिवनस्पतिनक्षत्रदेवतानां च **अन्नं** उपजीव्यः चंद्रमाः तस्मै **चंद्रमसे दिग्भ्यः** दिग्देवताभ्यः **स्वाहा**। परमात्मपक्षे **भूःभुवःसुवः** भूर्भुवःसुवर्नामकाय **चंद्रमसे** आल्हादकारिणे **दिग्भ्यः**

---

१ भूर्नामास्फूर्तिरूपत्वादितिवचनोक्तेः।

२ सोऽन्नंसर्वोपजीव्यत इतिवचनात्। अद्यतेऽत्तिचभूतानितस्मादन्नंतदुच्यत इतिच ब्रह्मवल्ल्यां।

३ द्योतनाद्दिवईरित इति वचनात्।

दिग्देवतागतभगवन्मूर्तिभ्यः **स्वाहा । देवेभ्यः नमः** अस्तु । **पितृभ्यः स्वधा** अस्तु । **भूर्भुवःसुवरन्नं** भूरादिनामकानिरुद्धादिभ्यउपजीव्याय वासुदेवाय ॐ अनंतगुणपूर्णाय तेनमः ॥ इति तृतीयेऽनुवाकः ॥ ३ ॥

**अर्थ**--अग्नीचें अन्न पृथ्वीवर उत्पन्न होणारे समिधा इत्यादि पदार्थ आहेत. ते पदार्थ देणाऱ्या पृथ्वीला आहुति असो. ( परमात्म्याच्यासंबंधानें असा अर्थ होतो कीं, भू म्हणजे ज्ञानरूप व पृथ्वींत राहाणारा असा अनिरुद्ध नांवाचा परमात्मा हा अग्नीचा उपजीव्य म्हणजे आश्रय देणारा आहे ). पृथ्वीला आश्रय देणाराही तोच आहे. भुवर्लोक हा वायु अंतरिक्ष व त्यामधील प्राणी यांना आश्रय देणारा आहे. त्याला आहुति असो. ( परमात्म्याच्या संबंधानें असा अर्थ कीं, पुष्कळ वीर्य असल्यामुळें भुव नांवाचा प्रद्युम्न नामक परमात्मा मुख्यप्राणास व अंतरिक्षांतील प्राण्यांस आश्रय देणारा आहे ). सर्वांनीं आपल्या हृदयांतील परमात्मा जाणण्यास योग्य आहे म्हणून अंतरिक्ष नांवाच्या परमात्म्याला आहुति असो. सुवर्लोक हा सूर्यादि सर्व देवांना आश्रय देणारा आहे. त्याला आहुति असो. ( परमात्म्याच्या संबंधानें असा अर्थ कीं, बलवान व स्वर्गांत राहाणारा असल्यामुळें सुव नांवाचा संकर्षण नामक परमात्मा अदितीच्या पुत्रांना आश्रय देणारा आहे ). त्याला आहुति असो. भू, भुव, सुव ह्या लोकांना व तेथें असणाऱ्या ओषधि, वनस्पति, नक्षत्र ह्यांच्या देवतांना आश्रय देणारा चंद्र आहे. चंद्राला व दिशांचे देवतांना आहुति असो. ( परमात्म्याच्या संबंधानें असा अर्थ कीं, भूर्भुवःसुवर्नामक चंद्राला व दिशांमध्यें राहणाऱ्या देवतांना आहुति असो. ) सर्व देवांना नमस्कार असो. सर्व पितरांना नमस्कार असो. भूः म्हणजे अनिरुद्ध भुवः म्ह० प्रद्युम्न सुवः म्ह० संकर्षण ह्यांना, त्यांना आश्रय देणाऱ्या वासुदेवाला, व अनंत गुणांनीं पूर्ण अशा नारायणाला नमस्कार असो. ह्याप्रमाणें तिसरा अनुवाक संपला ॥ ३ ॥

**भूरग्नयेपृथिव्यैस्वाहा भुवोवायवेंतरिक्षायस्वाहा सुवरादित्यायदिवेस्वाहा भूर्भुवः सुवश्चंद्रमसेदिग्भ्यःस्वाहा नमोदेवेभ्यःस्वधापितृभ्योभूर्भुवःसुवरग्नओं ॥ इतिचतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥**

**टीका—भूः** भूदेवतायै **अग्नये** अग्निस्थानिरुद्धाय **पृथिव्यै** धरायैं तत्स्थाय च हरये **स्वाहा । भुवः** भुवर्देवतायै **वायवे** प्रद्युम्नाय **अंतरिक्षाय** अंतरिक्षणीयत्वादंतरिक्षसंज्ञकाय हरये **स्वाहा । सुवः** सुवरभिमानिदेवतायै आदित्याय तत्स्थाय संकर्षणाय **दिवे** द्योतमानाय स्वाहा । **भूर्भुवःसुवः** विशिष्टव्याहृत्यभिमानिने **चंद्रमसे** आल्हादकारित्वाच्चंद्रमसे तदंतर्गतवासुदेवाय **दिग्भ्यः** दिग्देवतांतर्भूतेभ्यो भगवद्रूपेभ्यश्च **स्वाहा । देवेभ्यः नमः** अस्तु । **पितृभ्यः स्वधा** अस्तु । **भूर्भुवःसुवरग्नओं** व्यस्तसमस्तव्याहृतिप्रतिपाद्याय अनिरुद्धप्रद्युम्नसंकर्षणवासुदेवाय गुणपूर्णब्रम्हेवेत्यर्थः ॥ इति चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

**अर्थ**—भू देवता, अग्नींत रहाणारा अनिरुद्ध, पृथ्वींत राहाणारा हरि ह्यास आहुति असो. भुवर्देवता, वायूंत राहाणारा प्रद्युम्न, अंतरिक्षांत राहाणारा हरि ह्याला आहुति असो. सुवर्देवता, आदित्यांत राहाणारा संकर्षण, प्रकाशमान हरि ह्याला आहुति असो. भूर्भुवःसुवः हे तिन्ही मिळून होणाऱ्या व्याहृतीची अभिमानिदेवता, चंद्रामध्यें राहाणारा वासुदेव, दिशांचे देवतेमध्यें असलेलें भगवंताचें रूप ह्यास आहुति असो. देवांना नमस्कार असो. पितरांना नमस्कार असो. भूर्भुवःसुवरों ह्यानें प्रतिपादन केलेले अनिरुद्ध प्रद्युम्न संकर्षण व वासुदेव आणि ॐ ह्यानें प्रतिपादन केलेलें गुणपूर्ण ब्रम्ह ह्यांना आहुति असो. ह्याप्रमाणें चवथा अनुवाक संपला ॥ ४ ॥

**भूरग्नयेचपृथिव्यैचमहतेचस्वाहा भुवोवायवेचांतरिक्षायचमहतेचस्वाहा सुवरादित्यायचदिवेचमहतेचस्वाहा भू-**

भुवःसुवश्चंद्रमसेचनक्षत्रेभ्यश्चदिग्भ्यश्चमहतेचस्वाहा नमो देवेभ्यःस्वधापितृभ्योभूर्भुवःसुवर्महरों ॥ इतिपंचमोऽनुवाकः ॥ ५ ॥

**टीका—भूरग्नये** भूरभिमानिने अग्नये **च पृथिव्यै** धरायै च उभयांतर्गतानिरुद्धाय **च महते** महत्तत्वाभिमानिने सर्व जीवोत्तमाय हिरण्यगर्भाय **स्वाहा** । **भुवोवायवे** भुवर्लोकाभिमानिने वायवे तदंतर्गत प्रद्युम्नाय **च** अंतरिक्षाय अंतरिक्षदेवतायै **च** अंतरिक्षशब्दवाच्यहरये **च महते** महतत्वाभिमानिने सर्वजीवोत्तमाय हिरण्यगर्भाय **च स्वाहा** । **सुवरादित्याय** सुवर्लोकाभिमानिने आदित्याय तदंतर्गत संकर्षणाय **च दिवे** द्युलोकाभिमानिने तदंतर्गतहरये **च महते** महत्तत्वाभिमानिने सर्व जीवोत्तमाय हिरण्यगर्भाय **च स्वाहा** सुहुतमस्तु । **भूर्भुवःसुवश्चंद्रमसे** समस्तव्याहृतिदेवतायै **च चंद्रमसे** आल्हादकत्वेन चंद्रमःशब्दवाच्याय वासुदेवाय **च नक्षत्रेभ्यः च दिग्भ्यः च महते** तदंतर्गतभगवते **स्वाहा** । **देवेभ्यः नमः** अस्तु । **पितृभ्यः स्वधा** अस्तु । **भूर्भुवःसुवर्महरों** व्यस्तसमस्तव्याहृतिप्रतिपाद्यं च गुणपूर्णं ब्रम्हैवेत्यर्थः ॥ इति पंचमोऽनुवाकः ॥ ५ ॥

**अर्थ**—भूलोकाची अभिमानि देवता अग्नि व पृथिवी ह्या दोहोंमध्ये असलेला अनिरुद्ध आणि महत्तत्वाची अभिमानि देवता असा उत्तम जीव म्हणजे ब्रम्हदेव ह्यांना आहुति असो. भुवर्लोकाची अभिमानि देवता वायु ह्याचे आंत असणाऱ्या प्रद्युम्नाला, व अंतरिक्षाचे देवतेला व अंतरिक्ष नांवाच्या हरीला आणि महत्तत्वाची अभिमानि देवता असा उत्तम जीव म्हणजे ब्रम्हदेव ह्यांना चांगली आहुति असो. सुवर्लोकाची अभिमानि देवता आदित्याला व त्यांत असलेल्या संकर्षणाला व स्वर्गाच्या देवतेला व त्या देवतेंत असलेल्या हरीला आणि महत्तत्वाची अभिमानि देवता असा उत्तम जीव म्हणजे ब्रम्हदेव ह्यांना चांगली आहुति असो. भूर्भुवःसुवः ह्या तिन्ही व्याहृतींच्या देवतेला व आनंद देत असल्यामुळे चंद्रमस्

नांवाच्या वासुदेवाला आणि नक्षत्र, दिशा व महत्तत्व ह्यांच्यामध्यें असले- ल्या भगवंताला चांगली आहुति असो. देवांना नमस्कार असो. पितरांना नमस्कार असो. भूर्भुवःसुवर्महः ह्या सर्व व्याहृति मिळून ज्याचें प्रतिपादन केलें आहे त्याला आणि गुणपूर्ण ब्रम्हाला चांगली आहुति असो. ह्या- प्रमाणें पांचवा अनुवाक संपला ॥ ५ ॥

**पाहिनोअग्नएनसेस्वाहा । पाहिनोविश्ववेदसेस्वाहा । यज्ञंपाहिविभावसोस्वाहा । सर्वं पाहिशतक्रतोस्वाहा ॥६॥ पाहिनोअग्नएकया। पाह्युत द्वितीयया । पाह्यूर्जंतृतीयया। पाहिगीर्भिश्चतसृभिर्वसोस्वाहा ॥ ७ ॥**

**टीका**—अथ प्रतिबंधकनिवारणेन मुमुक्षोर्ज्ञानप्राप्त्यर्थाः होममंत्रा उच्यंते ॥पाहीति ॥ हे **अग्ने नः** अस्मान् **एनसे** एनसः ज्ञानप्रतिबंधकीभूतपापात् **पाहि** रक्ष **स्वाहा** तुभ्यमग्नये सुहुतमस्तु । **नः** अस्माकं **विश्ववेदसे** कृत्स्न- तत्वज्ञानाय तत्साधनसंपादनेन **पाहि** पालय तदर्थं **स्वाहा** तुभ्यमिदं सुहुतमस्तु **विभावसो** विशेषेणभादीप्तिः विभासैववसु धनं यस्यसः तदंतर्गतोभगवान् तत्संबुद्धौ हे विभावसो हे परमात्मन् **यज्ञं**[1] विविदिषाहेतुत्वेन अस्माभिरनुष्ठीय- मानं भगवत्पूजादिलक्षणंनिवृत्तंकर्म **पाहि** निर्विघ्नत्वेन परिसमाप्तिनीत्वाफ- लदानशक्तंकुरु **स्वाहा** तुभ्यंसुहुतमस्तु । हे **शतक्रतो**[2] हे पूर्णज्ञान **सर्वं** ब्रम्हज्ञानतत्साधनकर्मादिकं **पाहि** सफलंकुरु **स्वाहा** तुभ्यंसुहुतमस्तु । हे **अग्ने** अग्न्यंतर्गतभगवन् **एकया** भूरित्यादिकया व्याहृत्या **नः पाहि** । **उत द्वितीयया** भुवरित्यादिकया व्याहृत्या **पाहि** । **तृतीयया** सुवरित्यादिक या व्याहृत्या **पाहि** । **ऊर्जं** अन्नं तदुपलक्षितभोग्यं च सर्वं **पाहि** । हे **वसो**[3] आच्छादकसर्वत्राविद्यमान **चतसृभिः** भूर्भुवःसुवर्महरिति **गीर्भिः** व्याहृतिभिः **पाहि स्वाहा** तुभ्यमिदंसुहुतमस्तु ॥ इतिसप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

---

१ यजदेवपूजासंगतिकरणदाने ष्वितिधातोः सकाशात् न प्रत्ययः ।

२ स क्रतुर्ज्ञानरूपत्वादितिभाष्याच्च ।

३ वसआच्छादन इत्यस्माद्धातोः उप्रत्ययः ।

**अर्थ**—[ ह्यानंतर मोक्षाची इच्छा करणाऱ्यास ज्ञान मिळण्याला जें प्रतिबंध करितें तें दूर करून त्याला ज्ञान मिळण्यास्तव होमाचे मंत्र सांगतों. ] हे अग्नि, ज्ञान मिळण्यास आड येणारे पातकापासून आमचें रक्षण कर. तुला दिलेली आहुति फळ देणारी होवो. आम्हाला तत्वज्ञान मिळवून देण्याकरितां तूं सहाय कर. ह्यास्तव तुला दिलेली आहुति फळ देणारी होवो. विशेष कांतीनें प्रकाशणाऱ्या अर्थात असलेल्या परमेश्वरा, आम्हाला ज्ञान मिळण्याकरितां आम्ही जें भगवंताची पूजा इत्यादि निष्काम कर्में करितों तीं निर्विघ्नपणें शेवटास जाऊन त्यापासून आम्हाला उत्तम फळ मिळेल असें कर. आम्ही दिलेली आहुति फळ देणारी होवो. हे सर्वज्ञ परमेश्वरा, ब्रम्हज्ञान व त्याचीं साधनभूत कर्में ह्यांस सफळ कर. आम्ही दिलेली आहुति फळ देणारी होवो. हे अग्नीच्या आंत असलेल्या भगवंता, आम्हाला पहिल्या म्हणजे भू व्याहृतीनें आमचें रक्षण कर. दुसऱ्या म्हणजे भुव व्याहृतीनें आमचें रक्षण कर. तिसऱ्या म्हणजे सुव व्याहृतीनें अन्न इत्यादि सर्व भोग्य पदार्थांचें रक्षण कर. हे सर्वव्यापी परमेश्वरा, चार म्हणजे भूः, भुवः, सुवः, महः ह्या व्याहृतींनीं रक्षण कर. ह्यास्तव तुला दिलेली आहुति फळ देणारी होवो. ह्याप्रमाणें सातवा अनुवाक संपला ॥ ७ ॥

**यश्छंदसामृषभोविश्वरूपः । छंदोभ्यश्छंदांस्याविवेश । सचाशिक्यः पुरोवाचोपनिषदिंद्रोज्येष्ठइंद्रियायऋषिभ्यो नमो देवेभ्यः स्वधापितृभ्योभूर्भुवःसुवश्छंद ओम् ॥ ८ ॥**

**टीका**—अथ कृत्स्नवेदांतप्रतिपाद्यवेदांतप्रापिकजप्यमंत्रानाह ॥ य इति ॥ **यः छंदसां** वेदानां मध्ये **ऋषभः** श्रेष्ठः प्रणवः तत्प्रतिपाद्यः परमात्मा **विश्वरूपः** पूर्णरूपः[1] व्यापरूपो वा तादृशः प्रणवः **छंदोभ्यः** वेदेभ्यः **प्रथं-**

१ विश्वं पूर्णं महोच्यत इति वचनं ।

२ सिसृक्षोः परमाद्विष्णोः प्रथमं द्वौ विनिःसृतौ ओंकारश्चाथ शब्दश्च तस्मात्प्राथमिकौक्रमादितिवचनं ।

**मं** प्रादुर्भूतः सन् **छंदांसि** तदुपलक्षितसर्वमंत्रादौ **आविवेश च** प्रथमतः अंतेचं प्रयोज्यो बभूवेत्यर्थः च **सः** प्रणवः **आङ्** सम्यक् **शिक्यः** शिक्यइव सर्वाधारः **ज्येष्ठः** कारणत्वेन श्रेष्ठः **इंद्रः** परमात्मा **उपनिषत्** ब्रम्हविद्यां **पुरा** पूर्वं ब्रम्हणे चतुर्मुखाय किंतु **इंद्रियाय** इंद्रियाभिमानिदेवताभ्यः ऋषिभ्यः पुरा **उवाच** । **देवेभ्यः नमः** । **पितृभ्यः स्वधा** । **भूर्भुवःसुवश्छंद ओम् इति** पठति । इति अष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

**अर्थ**--[ ह्या पुढें ज्याचें वेदांत वर्णन करिता व जो वेदांतानें प्राप्त होतो अशा परमात्म्यासंबंधीं जप करण्याजोगे मंत्र सांगतों. ] जो वेदांमध्यें श्रेष्ठ आहे अशा प्रणवानें वर्णन करण्यास योग्य असलेला परमात्मा पूर्णरूप ( अथवा सर्वव्यापी ) आहे. असा प्रणव वेदापासून प्रथम प्रगट होऊन वेदमंत्रामध्यें त्यानें प्रवेश केला, म्हणजे मंत्राच्या प्रारंभीं व शेवटीं लावण्याजोगा झाला. आणखी प्रणव हा शिंक्याप्रमाणें सर्वांचा उत्तम आधार आहे, व सर्वांचें आदिकारण आहे. परमात्म्यानें ब्रम्हविद्या पूर्वीं ब्रम्हदेवाला आणि इंद्रियांच्या अभिमानिदेवतांना व ऋषींना सांगितली. देवांना नमस्कार असो. पितरांना नमस्कार असो. भूर्भुवःसुवश्छंद ओं ह्या व्याहृतींचा उच्चार करितों. ह्याप्रमाणें आठवा अनुवाक संपला ॥ ८ ॥

**नमोब्रम्हणेधारणंमेअस्त्वनिराकरणंधारायिताभूयासंकर्णयोः श्रुतंमाच्योढ्ंममामुष्य ओम् ॥ १ ॥**

**टीका**--अथ लब्धानां वेदविद्यार्थिनां अविस्मरणाय जाप्यमंत्रानाह ॥ नम इति ॥ **ब्रम्हणे** परब्रम्हणे **नमः** अस्तु । तदनुग्रहेण **मे** मदीये मनसि वेद तदर्थयोः **धारणं अस्तु** । **अनिराकरणं** अविस्मरणं यथा भवति तथा **धारयिता** धारणकर्त्ता **भूयासं** । **अयुष्यः** इत्यर्थं प्रार्थयमान-

---

१ ब्रम्हणः प्रणवः कार्यं आदावंतेच सर्वशः स्रवत्यनोंकृतं ब्रह्मपरस्ताच्चविशीर्यत इति श्रुतेः ।

२ उपसमीपे नितरां झटितिसादयतिप्रापयातिसैव ब्रम्हविद्या ।

**स्य मम कर्णयोः** श्रोत्राभ्यां **श्रुतं** यत्किंचित् वेदशास्त्रतदर्थादिकं श्रुतमस्ति तत् सर्वं **मा व्ययोढ्वं** मा विनाशय । ॐ गुणपूर्णपरंब्रह्म चिरंधारयिष्यामि ॥ इति नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥

**अर्थ**—[ आतां वेद मिळविलेल्या विद्यार्थ्यांनीं केलेलें अध्ययन विसरूं नये ह्याकरितां जप करण्याचे मंत्र सांगतों. ] परत्म्याला नमस्कार असो. त्याच्या कृपेनें वेद व त्याचा अर्थ हे दोन्ही माझे मनांत राहोत. आम्ही आपल्या कानांनीं वेदशास्त्र इत्यादि जें ऐकिलें आहे त्यांचा माझ्या मनांत नाश करूं नको. गुणपूर्ण परमात्म्याला मी आपल्या मनांत ठेवितों. ह्याप्रमाणें नववा अनुवाक संपला ॥ ९ ॥

**ऋतंतपःसत्यंतपःश्रुतंतपः शांतंतपोदमस्तपः शमस्तपो दानंतपोयज्ञंतपो भूर्भुवः सुवर्ब्रम्हैतदुपास्यैतत्तपः ॥ १० ॥**

**टीका**—**ऋतं** यथार्थविज्ञानरूपं **तपः** ब्रम्हैव । **सत्यं** सद्भावप्रापकं **तपः**। **श्रुतं** वेदांतशास्त्रश्रवणं **तपः**। **शांतं तपः**। **दमः** बाह्येंद्रियनिग्रहः **तपः**। **शमः** भगवन्निष्ठताबुद्धिः **तपः** । **दानं** अन्नदानादिकं **तपः** । **यज्ञं** अग्निहोत्रज्योतिष्टोमादिकं **तपः**। **भूः भुवः सुवः** एतत् सर्वं **ब्रम्ह एतत् उपास्य** उपासनंकुरु । **एतत् तपः**। इति दशमोऽनुवाकः॥१०॥

**अर्थ**—यथार्थज्ञान हें तप म्हणजे ब्रम्हच आहे. चांगलें अंतःकरण देणारा तप आहे, वेदांतशास्त्रश्रवण हें तप आहे, भगवंतावर एकसारखी निष्ठा करणें हें तप आहे, अन्न इत्यादि दान करणें हें तप आहे, अग्निहोत्र, ज्योतिष्ठोम इत्यादि यज्ञ करणें हें तप आहे, भूः भुवः सुवः हें सर्व ब्रम्ह आहे. ह्याची उपासना करणें हें तप आहे. ह्याप्रमाणें दहावा अनुवाक संपला ॥ १० ॥

**यथावृक्षस्य संपुष्पितस्यदूराद्गंधोवात्येवंपुण्यस्यकर्मणोदूराद्गंधोवाति यथासिधाराकर्त्तेवहितामवक्रामेयद्युवेयुवेहवाविव्हयिष्यामिकर्त्तंपातिष्यामीत्येवममृतादात्मानंजुगुप्सेत् ॥ ११ ॥**

**टीका**--अथ विहितानुष्ठानरूपं पुण्यं निवृत्तं। ज्ञानसाधनतपःप्रशंसति। तत्वस्यातिगोपनीयत्वमाह ॥ यथेति ॥ **यथा** लोकेउद्यानादौस्थितस्य **संपुष्पितस्य** पुष्पोपेतस्य चंपकपाटलादेः **वृक्षस्य गंधः** सुरभि **दूरात्** दूरदेशात् **वाति** वहति। **एवं** तथा **पुण्यस्य कर्मणः** ज्योतिष्टोमादेः **गंधः** पुण्यकीर्तिः **दूरात्** मनुष्यलोकात् **वाति** स्वर्गादिकं गच्छति। तस्मात्पुण्यमनुष्ठेयं पापादिकंच न कर्त्तव्यमिति। उभयत्रदृष्टांतमाह ॥ यथेति ॥ **यथा कर्त्ता** छेत्ता पापकर्त्ता वा **हितां** इष्टां **असिधारां** खड्गधारां **यत्** यदि **युवे युवे** प्रतिप्रतिपुरुषे **विह्वयिष्यामि** चित्तवैकल्ययुक्तं करिष्यामीति **अवक्रामे** युद्धे प्रसक्तेसति असिं गृहीत्वा कर्त्तौ प्रणतिष्यामीति तथा असिधारां जुगुप्सेत् गोप्तुमिच्छेत् **एवं** तथा **अमृतात्** मोक्षार्थमिति यावत् **आत्मानं** आत्मतत्त्वं **जुगुप्सेन्** गोप्तुमिच्छेत्। समाचत्वरादौब्रम्हविद्याविष्कारं न कुर्यादित्यर्थः। यद्वा **कर्त्ते** गर्त्ते **अवहितां** कुशलपुरुषेणस्थापितां **असिधारां यत्** यदा **अवक्रामे** आक्रमिष्यामि-तदा **विह्वयिष्यामि** विव्हलितोभविष्यामि **ह वा** यदि न अवक्रामे तदा **कर्त्तं** गर्त्तं पतिष्यामीति यथा पुरुषः भीतः सन् तत्र गंतुं नेच्छति **एवं** **आत्मानं** स्वमात्मानं **अमृतात्** अनृतादिपापात् **जुगुप्सेन्** गोप्तुमिच्छेत् ॥ इति एकादशोऽनुवाकः ॥ ११ ॥

**अर्थ**--[ आतां योग्य कर्माचें अनुष्ठान करणें हें जें पुण्यकर्म तें झालें, ज्ञान प्राप्त करून देणाऱ्या तपाची स्तुति करितो, भगवंताचें ज्ञान अति गुप्त ठेवावें, असें सांगतो. ] जसा बाग इत्यादि ठिकाणीं असलेल्या व चाफा इत्यादि फुलें आलेल्या झाडांचा वास फार लांब जातो, तशी ज्योतिष्टोमादिपुण्यकर्माची कीर्ति मनुष्यलोकापासून स्वर्गलोकीं जाते. म्हणून पुण्य करावें, पाप करूं नये. [ ह्या दोहोंविषयीं उदाहरण सांगतो. ] जसा तोडणारा ( किंवा पाप करणारा )

---

१ विद्याहवै ब्राम्हणमाजगाम गोपय मामिति। अनाविष्कुर्वन्नन्वयात्। इतिश्रुतिसूत्राभ्यां विद्याया अति गोप्यत्वोक्तेः।

पुरुष प्रत्येक मनुष्याला घायाळ करितां येण्यास्तव चांगल्या तरवारीचें रक्षण करितो, तसें मोक्ष मिळण्यासाठीं ब्रम्हज्ञानाचें रक्षण करावें. तात्पर्य, मंडळींत चारचौघांपुढें ब्रम्हविद्या प्रसिद्ध करूं नये. (अथवा कोणा चतुर मनुष्यानें एका खड्डयांत ठेविलेल्या तरवारीवर उडी टाकून जाऊं लागलों असतां घायाळ होईन आणि तसें न केलें असतां खड्डयांत पडेन अशा भीतीनें तिकडे जाण्याची कोणी इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें पापापासून आपलें रक्षण करावें.) ह्याप्रमाणें अकरावा अनुवाक संपला ॥ ११ ॥

**अणोरणीयान्महतोमहीयानात्मागुहायांनिहितोऽस्यजंतोः तमक्रतुंपश्यतिवीतशोकोधातुःप्रसादान्महिमानमीशं**

**टीका**—परमात्मापरोक्षदर्शनंगुरुप्रसादायत्तमित्याह ॥ अणोरिति ॥ **अस्य** परिदृश्यमानस्य **जंतोः**[1] प्राणिनः **गुहायां** हृदयगुहासु **अणोः** प्रकृतिसूक्ष्मात् **अणीयान्** अत्यंताणुः **महतः** अव्याकृताकाशमहत्तत्वादपि **महीयान्** परममहत्परिमाणयुक्तः **आत्मा**[2] जीवांतर्यामी परमात्मा **निहितः** प्रविष्टः अस्ति । **अक्रतुं** क्रतूपलक्षितकर्माद्यगम्यं **तं ईशं** परमात्मानं **धातुः** भगवतः चतुर्मुखस्य च **प्रसादात् पश्यति** साक्षात्कुरुते । **वीतशोकः** अपगतसंसारादिक्लेशः मुक्तोभवतीत्यर्थः अस्य **महिमानं** च पश्यति ।

**अर्थ**—[ परमात्म्याचें प्रत्यक्ष दर्शन गुरुकृपेनें होतें असें सांगतो. ] जे प्राणी दिसतात त्यांच्या हृदयांत परमाणूपेक्षां लहान व आकाश महत्तत्व इत्यादिक मोठ्या पदार्थांपेक्षां मोठा असा परमात्मा आहे. जो यज्ञादिक कर्मांनीं प्राप्त होण्यासारखा नाहीं अशा त्या परमात्म्याला भगवंताच्या व ब्रम्हदेवाच्या कृपेनें जीव पाहातो, तो मुक्त होतो, व त्याचें माहात्म्य पाहातो.

---

१ एकवचनंजात्यभिप्रायेणपरिदृश्यमानानांप्राणिनामितियावत् ।

२ जीवांतर्यामिको विष्णुरात्मनामासमीरितइतिएकादशस्कंधत त्वर्यवचनात् । ऋतंपिबंतौसुकृतस्यलोकेगुहांप्रविष्टौपरमेपरार्धइतिश्रुतेः । गुहांप्रविष्टावात्मानौहितद्दर्शनादितिसूत्राच्च ।

**सप्तप्राणाः प्रभवंति तस्मात्सप्तार्चिषःसमिधःसप्तजिव्हाः।**
**सप्तइमेलोका येषुचरंतिप्राणा गुहाशयान्निहिताःसप्तसप्त ।**

**टीका**--भगवतः इंद्रियादिजगत्सर्जकत्वमहिमानमाह ॥ सप्तप्राणा॰ इति ॥ **तस्मात्** परमात्मनः सकाशात् **सप्त प्राणाः** बुध्द्यासहज्ञानेंद्रियाणि सप्त तदभिमानिदेवताश्च सप्त **प्रभवंति** उत्पद्यंते । **सप्त अर्चिषः** ज्ञानेंद्रियवृत्तयः **समिधः** समित्स्थानापन्नाः शब्दादिविषयाः **सप्त जिव्हाः** इंद्रियाणां विषयैः सह संबंधाश्च **इमे** परिदृश्यमानाः **सप्त लोकाः** इंद्रियगोल-गोलकाः।तदभिमानिदेवताश्च तस्मात्भगवतः प्रभवंति। सप्तके ते लोकाइत्यत आह ॥ येष्विति ॥ **येषु** स्थित्वा **प्राणाः** इंद्रियाणि **चरंति** विषयसंबत्धाः भवंति ते लोकाः **गुहाशयां** हृदयगुहाआशयः स्थानं यस्यास्तस्यां बुद्धौ प्राणिनां ज्ञानप्राप्त्यर्थं **सप्त सप्त** प्रतिशरीरं इंद्रियाद्याः **निहिताः** ॥

यद्वा **तस्मात्** परमात्मनः सकाशात् **सप्त प्राणाः** बुध्द्यासहज्ञानेंद्रियाणि सप्त तदभिमानिदेवताश्च सप्त **प्रभवंति** उत्पद्यंते । यज्ञसाधनीभूताः **सप्त अर्चिषः** अग्निज्वालाः **समिधः** पलाशादयः **सप्त जिव्हाः** ताश्च परमात्मन उत्पद्यंते । **इमे** भूरादयः **सप्त** सप्तसंख्याकाः **लोकाः** तस्मात्प्रभवंति । **येषु** लोकेषु देवमनुष्यादिशरीरवर्त्तिनः **प्राणाः चरंति** तादृश लोकाः उत्पन्नाः । **गुहाशयात्** गुहायां हृदयगुहायां शेते वर्तत इति गुहाशयः परमात्मा तस्मात् **सप्त सप्त** सप्तसंख्याकाः सप्त समुद्राः सप्त द्वीपाः सप्त कुलाचलाः सप्त रूपाणि पातालादयः सप्त भूरादयश्च सप्त सूर्यस्य सप्ताश्वश्च **निहिताः** जातास्तिष्ठंतीत्यर्थः ॥

**अर्थ**—[ भगवंताचें इंद्रियादिक जग उत्पन्न करण्याचें माहात्म्य सांगतो. ] परमात्म्यापासून बुद्धि, मन व पांच ज्ञानेंद्रियें अशीं सात इंद्रियें

---

१ अग्निजिव्हानां सप्तत्वमाथर्वणिके आम्नायते । कालीकरालीचमनोजवाच सुलोहितायाच सुधूम्रवर्णा ॥ स्फुलिंगिनी विश्वरुचीच देवी लेलायमाना इतिसप्तजिव्हा इति ।

२ गुहाशयालोपः समानइतिसूत्रादेकयकारलोपः ।

३ तथाच सूत्रं सप्तगतेर्विशेषि तत्वाच्च ।

व त्यांच्या अभिमानीदेवता उत्पन्न होतात. ( ह्या सात ) ज्ञानेंद्रियांच्या सात वृत्ती, समिधांच्या जागीं असलेले शब्द इत्यादि विषय आणि विषयांशीं इंद्रियांचे संबंध, हे परमात्म्यापासून उत्पन्न होतात. प्रत्यक्ष दिसणारे सात लोक म्हणजे इंद्रियांचे गोलक व त्यांच्या अभिमानीदेवता हे परमात्म्यापासून उत्पन्न होतात. [ ते सात लोक कोणते हें सांगतों. ] ज्या ठिकाणीं इंद्रियें राहून विषयांशीं संबद्ध होतात ते सात लोक ( समजावेत ). प्राण्यांना ज्ञान होण्यासाठीं प्रत्येकाच्या शरीरांत बुद्धीच्या ठिकाणीं सात सात इंद्रियादिक ठेविले आहेत.

दुसऱ्या रीतीनें असा अर्थ होतो कीं, परमात्म्यापासून बुद्धि, मन व पांच ज्ञानेंद्रियें अशीं सात इंद्रियें व त्यांच्या अभिमानीदेवता उत्पन्न होतात. यज्ञाला साधन अशा अग्नीच्या ज्वाला, पळस इत्यादि समिधा, व अग्नीच्या ( काळी, कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिंगिनी आणि विश्वरुचि ह्या ) सात जिभा परमात्म्यापासून उत्पन्न होतात. ज्या ठिकाणीं देव मनुष्य इत्यादिकांच्या शरीरांत असलेले प्राण संचार करितात असे हे भूः भुवः इत्यादि सात लोक परमात्म्यापासून उत्पन्न होतात. परमात्म्यापासून सात समुद्र, सात द्वीप, सात कुलपर्वत, सात रंग, पाताल इत्यादि सात लोक, भूः इत्यादि सात लोक, आणि सूर्याचा सप्ताश्व नांवाचा घोडा हे उत्पन्न झालेले आहेत.

**अतःसमुद्रागिरयश्चसर्वेऽस्मात्स्यंदंतेसिंधवःसर्वरूपाः । अतश्चविश्वाओषधयोरसाश्चयेनषभूतस्तिष्ठत्यंतरात्मा ।**

**टीका—येन** परमात्मना तत्प्रसादेन **एषः भूतः** भूतसंपरिष्वक्तः **आत्मा** जीवः **अंतः** शरीरांतः **तिष्ठति अतः** परमेश्वरात् उक्ताः **सर्वे समुद्राः च गिरयः** प्रभवंति । **अस्मात्** तस्मात्परमेश्वरात् **सर्वरूपाः** नानारूपाः **सिंधवः** सरितः **स्यंदंते** प्रस्रवंति । **अतः च** प्रस्रवणेनैव **विश्वाः** सर्वाः **ओषधयः** व्रीह्यादयः फलपाकांताः **च रसाः** मधुरादयः प्रभवंति ।

**अर्थ**—ज्या परमेश्वराच्या कृपेनें हा पंचमहाभूतांनीं वेष्टिलेला जीव शारिरामध्यें राहतो, त्या परमेश्वरापासून पूर्वीं सांगितलेले सर्व समुद्र आणि पर्वत उत्पन्न होतात. त्या परमेश्वरापासून नानाप्रकारच्या नद्या वाहातात. आणखी नद्या वाहाण्याच्या योगानेंच सर्व साळी इत्यादिक धान्यें व गोड इत्यादिक रस उत्पन्न होतात.

**ब्रम्हादेवानांपदवीःकवीनामृषिर्विप्राणांमहिषोमृगाणां। श्येनोगृध्राणा॰ स्वधितिर्वनाना॰ सोमःपवित्रमत्येति-रेभन् ॥**

**टीका**—परब्रम्हज्ञानं धातुःप्रसादायत्तं तस्य प्रथमं ज्ञानमार्गप्रकाशत्वा-दितिभावेनाह ॥ ब्रम्हेति ॥ **देवानां** रुद्रादीनां मध्ये **ब्रम्हा** ब्रम्हदेवः **पदवीः** भगवद्विभूत्यंशभूतः । **कवीनां ऋषिः** व्यासः पदवीः भगवद्वि-भूत्यंशभूतः **विप्राणां** वैदिकमार्गानुवर्तिनां मुनीनां ऋषिः व्यासः पदवीः भगवद्विभूत्यंशभूतः। **मृगाणां** वन्यचतुष्पदां मध्ये **महिषः** पदवीः। **गृध्राणां श्येनः** पदवीः । **वनानां** अस्मदीयस्वाहाकारस्वधाकारानु-सारेण यजतां **स्वधा इति** पदवीः । **सोमः** चंद्रः **पवित्रं** पवित्रकारकः **रेभन्** सन् **अत्येति** सर्वानतिक्रम्य वर्तते ।

**अर्थ**—[ परब्रम्हाचें ज्ञान ब्रम्हदेवाच्या प्रसादानें होतें. ज्ञानाचा प्रकाश करणारा ब्रम्हदेव आहे हें प्रथम सांगतो. ] शंकर इत्यादि सर्व देवांमध्यें ब्रम्हदेव हा भगवंताच्या विभूतीचा अंश आहे. कवींमध्यें वेद-व्यास हा भगवंताच्या विभूतीचा अंश आहे. वेदोक्त कर्म करणाऱ्या ब्राम्हणांमध्यें व्यास हा भगवंताच्या विभूतीचा अंश आहे. चतुष्पद प्राण्या-मध्यें रेडा हा भगवंताच्या विभूतीचा अंश आहे. पक्ष्यांमध्यें बहिरीससा-णा हा भगवंताच्या विभूतीचा अंश आहे. स्वाहा व स्वधा असे शब्द बोलून कर्म करणारे अशा आम्हांमध्यें स्वधा ही भगवंताचे विभूतीचा अंश आहे. पवित्रकारक चंद्र उत्कृष्ट असून सर्व पवित्र करणाऱ्या पदा-र्थांहून श्रेष्ठ आहे.

**अजामेकांलोहितशुक्लकृष्णांबर्ह्वीःप्रजाःजनयंतीꣳसरूपां। अजोह्येकोजुषमाणोनुशेतेजहात्येनांभुक्तभोगामजोन्यः ॥ १ ॥**

**टीका**—जीवानां परस्परं भेदमाह ॥ अजामिति ॥ **एकः अजः** न जायत इत्यजः जीवः **लोहितशुक्लकृष्णां** रजः सत्वतमोमयीं **बह्वीं प्रजां जनयंतीं सरूपां** स्वसदृशीं **एकां अजां** नजायत इत्यजा तां जडप्रकृतिं **जुषमाणः** सेवमानः सन् **अनुशेते** अनुसरति। **अन्यः अजः** विरक्तोजीवः **भुक्तभोगां** भुक्ताः भोगाः यस्याः तां **एनां जहाति हि** ॥ १ ॥

**अर्थ**—[ जीवांचा परस्पर भेद सांगतो. ] एक जीव, रज, सत्व व तम ह्या तीन गुणांनीं युक्त असलेली, पुष्कळ लोकांना उत्पन्न करणारी, आपणासारखी असलेली, अशा एक जड प्रकृतीला स्वीकार करून तिला अनुसरतो. दुसरा विरक्त जीव, जड प्रकृतीचा उपभोग घेऊन तिला टाकतो ॥ १ ॥

**हꣳसःशुचिषद्वसुरंतरिक्षसद्धोतावेदिषदतिथिर्दुरोणसत्। नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जागोजाऋतजाअद्रिजाऋतंबृहत्।**

**टीका**—**हंसः** परमेश्वरः **शुचिषत्**[१] शुचौसीदतीति **वसुः** वसतिसर्वमस्मिन्निति **अंतरिक्षसत्** अंतरिक्षेसीदतीति **होता** जुहोतीति **वेदिषत्** वेद्यांसीदतीति **अतिथिः** अतिथिरिव **दुरोणसत्** दुरोणेगृहेसीदतीति अतिथिरिवगृहेयोवसतिसईश्वरविभूतिरित्यर्थः दुरोणे यज्ञगृहे सीदतीति वा **नृषत्** नृषुसीदतीति **वरसत्** वरेदेशे सीदतीति **ऋतसत्** ऋतेकर्मणिसीदतीति **व्योमसत्** व्योम्नि सीदतीति **अब्जा** अप्सुजायतइति **गोजा** गोषुजायतइति **ऋतजा** ऋतेषुजायतइति **अद्रिजा** अद्रिषुजायतइति **ऋतं बृहत्** अस्ति।

---

१ पूर्वपदादितिषत्वं।

**अर्थ**—परमेश्वर पवित्र जागीं राहणारा, ज्याचे ठिकाणीं सर्व राहतें असा, अंतरिक्षांत राहणारा, हवन करणारा, यज्ञांतील वेदीच्या ठिकाणीं राहणारा, अतिथीप्रमाणें घरांत राहणारा ( जो अतिथीप्रमाणें घरांत राहतो तो ईश्वराची विभूति आहे असा अभिप्राय जाणावा ), मनुष्यांच्या ठिकाणीं राहणारा, श्रेष्ठ जागीं राहणारा, कर्मांच्या ठिकाणीं राहणारा, आकाशांत राहणारा, पाण्यांत उत्पन्न होणारा ( मच्छ, कूर्म इत्यादि अवतार घेणारा ), पशूंच्या ठिकाणीं उत्पन्न होणारा ( वराह, नारसिंह इत्यादि अवतार घेणारा ), सत्याचे ठिकाणीं उत्पन्न होणारा, पर्वतामध्यें उत्पन्न होणारा, खरा, आणि मोठा असा आहे.

**घृतंमिमिक्षिरेघृतमस्ययोनिर्घृतेश्रितोघृतमुवस्यधाम ।**
**अनुष्वधमावहमादयस्वस्वाहाकृतंवृषभवक्षिहव्यं ॥**

**टीका**—पूर्वयजमानाः आहवनीयाग्नौ **घृतं मिमिक्षिरे**[1] सिक्तवंतः । **अस्य** अग्नेः **घृतं योनिः** कारणं अस्ति । घृतेन ज्वालावृद्धेः । अतः अयमग्निः **घृते श्रितः** अस्ति । **घृतं उ अस्य धाम** अस्ति घृतमेवास्य स्थानं । हे अग्ने **अनुष्वधं** अस्मदीयं हविरनुसृत्य **आवह** देवानत्रानय । **मादयस्व** देवान् पितॄन् हृष्टान् कुरु त्वं हृष्टो भवेतिवा । हे **वृषभ** हे अग्ने त्वं **स्वाहाकृतं हव्यं वक्षि** वहसि देवान् प्रति प्रापयसिवा ।

**अर्थ**—पूर्वीचे यज्ञ करणाऱ्यांनीं आहवनीय अग्नीमध्यें तूप टाकिलें. तूप हें अग्नीचें कारण आहे; कारण तुपानें ज्वाला वाढते. म्हणून अग्नीला तुपाचा आश्रय आहे. तूप हें त्याचें राहण्याचें ठिकाण आहे. हे अग्नी, आमच्या हवीला अनुसरून देवांना येथें आण. देवांना व पितरांना संतुष्ट कर ( अथवा तू संतुष्ट हो ). हे अग्नी, तूं स्वाहाकारानें दिलेलें हवि घेतोस ( अथवा देवांना पोंचवितोस ).

---

१ मिक्षसेचन इति धातोर्लिट् बहुवचनं ।

**समुद्रादूर्मिर्मधुमाॅं उदारदुपांॅशुनासममृतत्व मानट् ।
घृतस्यनामगुह्यंयदस्तिजिव्हादेवानाममृतस्यनाभिः ।**

**टीका**—**समुद्रात्** समुद्रवत् अति प्रभूतात् समुद्रिक्तात् परमात्मनः सकाशात् **ऊर्मिः** ऊर्मिसदृशः प्रपंचः **मधुमान्** भोग्यत्वेन माधुर्ययुक्तः **उदारत्** उत्पन्नः । **घृतस्य** दीप्तस्य परमात्मनः **यत् गुह्यं नाम** प्रणवरूपं रामकृष्णादिनामवा **अस्ति** तेन प्रणवादिरूपेण मंत्रेण ध्यानकाले **उपांशुना** संततं शनैरुच्चार्यमाणेन **अमृतत्वं** उत्पत्तिशून्यादिलक्षणं मोक्षं **समानट्** सम्यगानसे । तच्च प्रणवादिनाम **देवानां जिव्हा** जिव्हेव देवैर्ध्यानपरैः निरंतरमुच्चार्यप्राणत्वेन जिव्हेव सदा मुखे वर्तते । **अमृतस्य** मुक्तवर्गस्य **नाभिः** रथचक्रस्यनाभिरिव आश्रयभूतं[3] ।

**अर्थ**—समुद्राप्रमाणें अतिशय मोठा असलेल्या परमात्म्यापासून लाटांप्रमाणें असलेला प्रपंच उपभोग घेतांना गोड लागणारा असा उत्पन्न झाला आहे. परमात्म्याचें प्रणवरूप किंवा रामकृष्ण इत्यादि नांव आहे तें ध्यान करिते वेळीं निरंतर हळू उच्चारिलें असतां जन्ममरणरहित मोक्ष प्राप्त होतो. तें परमेश्वराचें प्रणवादिक नांव देवांच्या तोंडांत नेहेमीं ध्यान करते वेळीं जिभेप्रमाणें असतें. जसा गाडीच्या चाकाला कण्याचा आधार आहे तसा मुक्तलोकांना त्या नांवाचा आधार आहे.

**वयंनामप्रब्रवामाघृतेनास्मिन्यज्ञेधारयामानमोभिः । उपब्रम्हाशृणवच्छस्यमानंचतुःशृंगोवमीद्गौरएतत् ।**

**टीका**—घृतस्य परमात्मनः **नाम** प्रणवादिरूपं **अस्मिन् यज्ञे**[4] ज्ञानयज्ञे **घृतेन** दीप्त्युत्पादेन परमात्मना तदर्थभूतेन निमित्तेन वा **नमोभिः** स

१ घृक्षरण दीप्तयोरिति धातोः क्तप्रत्ययः ।

२ तत्तेपदं संग्रहेण ब्रवीमीति प्रणवस्य ब्रम्हनामत्वस्य कठवल्ल्युक्तेः ।

३ अतएव कठैराम्नातं एतदेवाक्षरंजप्त्वायोयादिच्छति तस्य तद् इति ।

४ तथाच गीतायां स्वाध्यायज्ञानयज्ञाश्चेति ।

ह नाम **वयं प्रब्रवाम** सर्वदाप्रकर्षेण परमात्मानं ध्यायंत उच्चारयाम मनसि ब्रम्हतत्वं सर्वदा **धारयाम । शस्यमानं** अस्माभिः प्रणवेनस्तूयमानं **उप-ब्रम्ह** ब्रम्हणः समीपवर्त्तिभिः **चतुःशृंगः** चतुर्मुखः **गौरः** गौरवर्णोपेतः ब्रम्ह **अशृणवत् ।** श्रुत्वा च **अवमीत्** अवगतवान् ।

**अर्थ**—परमात्म्याला नमस्कार करून त्याचीं प्रणवइत्यादि नामें ह्या ज्ञानयज्ञांत त्याच्याकरितां आम्ही उच्चारितों, व आम्ही मनांत नेहेमीं त्याचें ध्यान करितों. परमात्म्याजवळ असणाऱ्या भक्तांनीं प्रणवाचा उच्चार करून जें स्तवन केलें त्यांत परमात्मा चतुःशृंग म्हणजे चार तोंडांचा व गोऱ्या रंगाचा आहे असें ऐकिलें व तसें ऐकून आम्हास त्याचें ज्ञान झालें.

**चत्वारिशृंगात्रयोअस्यपादाद्वेशीर्षेसप्तहस्तासोअस्य ।**
**त्रिधाबद्धोवृषभोरोरवीतिमहोदेवोमर्त्यां* आविवेश ॥ २ ॥**

**टीका**—चतुःश्रृंगः कः इत्यतआह ॥ चत्वारीति ॥ अधिभूतेऽर्थे । **अस्य** अग्नेः **श्रृंगाः चत्वारि पादाः त्रयः द्वे शीर्षे सप्त हस्तासः** हस्ताः सप्त ज्वालाएव हस्तस्थानीयाः ऋगादिरूपेण **त्रिधा बद्धः वृषभः** ऋषभः श्रेष्ठः **रोरवीति** शब्दायमानो वर्त्तते । यः सः **महोदेवः** तेजसां स्वामी एतादृशोऽग्निः वैश्वानररूपेण **अमर्त्यान्** इंद्रादिदेवान् **आविवेश** प्रविष्टो वर्त्तते ॥ २ ॥

यद्वा अधिदैवादिविषये । **अस्य** यज्ञपुरुषस्य **चत्वारी श्रृंगाः** ऋगादिवेदाः चत्वारएव श्रृंगाः प्रधानभूताः । **त्रयः पादाः** प्रातर्माध्यंदिनसायमिति सवनत्रयमेव पादाः । **द्वे शीर्षे** प्रायणीयोदयनीयाख्ये द्वे शिरस्थानीये । **सप्त** सप्तछंदांसि **हस्तासः** हस्तस्थानीयानि मंत्रैः सप्तच्छंदस्कैः आहुत्यादानात् । **त्रिधा बद्धः** मंत्रब्राम्हणकल्पैस्तु त्रिभिर्बद्धः संबद्धः । **वृषभः** ऋषभः श्रेष्ठः । **रोरवीति** स्तोत्रशस्त्रोद्गानाख्यैः ऋत्विङ्मुखात् स्तूयते । **महोदेवः** उत्सव-

*१ महस्तूत्सवतेजसोरिति कोशात् ।

तेजसोः स्वामीपूजाफलप्रदोवा । एतादृशः **मर्त्यान्** तदुपलक्षितप्राणिनः वैश्वानररूपेण **आविवेश** प्रविष्टोऽभूत् ॥ २ ॥

यद्वा परमात्मविषये । **अस्य** मूलरूपिणोनारायणस्य **चत्वारि शृंगाः** अनिरुद्धादयः शृंगाः प्रधानभूताः । **त्रयः** विश्वतैजसप्राज्ञाः **पादाः** अंशाः । **द्वे** आत्मांऽतरात्मरूपे **शीर्षे** शिरस्थानीये । **सप्त** भूरादिनामकाः सप्तलोकाः भगवद्रूपविशेषाः **हस्ताः** हस्तस्थानीयाः **त्रिधा** पातालभूम्यंतरिक्षात्मना **बद्धः** संबद्धः । **वृषभः** ऋषभः सर्वश्रेष्ठः मूलरूपी । **रोरवीति** अतिशयेन प्रतिपाद्योभवति । **महोदेवः** तेजसां स्वामी मर्त्यान् अंतर्यामिरूपेण **आविवेश** ॥ २ ॥

अर्थ—[ चतुःशृंग म्हणजे कोण हें सांगतो. ] पंचभूतांतील अग्नीच्यासंबंधानें अर्थ असा होतो कीं, अग्नि चार शिंगांचा, तीन पायांचा, दोन डोक्यांचा, ज्वालारूप सात हात असलेला, ऋग्वेदादिक रूपानें तीन ठिकाणीं बांधिलेला, श्रेष्ठ, शब्द करणारा असा आहे. जो तेजांचा धनी आहे असा अग्नि वैश्वानराच्या रूपानें इंद्रादिक देवांमध्यें जाऊन राहिला आहे ॥ २ ॥

दुसरा अर्थ देवादिकांच्यासंबंधानें असा होतो कीं, चार वेद हे यज्ञपुरुषाचीं चारच शिंगें म्हणजे मुख्य आहेत; सकाळ, दोन प्रहर, व संध्याकाळ हे त्याचे तीन पाय आहेत; उदय व अस्त हे त्याचीं दोन डोकीं कल्पिलीं आहेत; गायत्री इत्यादि सात छंदांतल्या मंत्रांनीं आहुति घेत असल्यामुळें सात छंद हे त्याचे सात हात आहेत; मंत्र, ब्राम्हण व कल्प ह्या तिघांनीं तो बांधला गेला आहे; तो श्रेष्ठ आहे; याज्ञिक ब्राह्मण स्तोत्र, शस्त्र व उद्गान ह्या तिहींनीं त्याची स्तुति करितात; तो उत्सव व तेज ह्यांचा धनी ( अथवा पुजेचें फळ देणारा ) आहे; असा यज्ञपुरुष हा मनुष्य इत्यादि प्राण्यांमध्यें वैश्वानर रूपानें जाऊन राहिला आहे ॥२॥

१ तदुक्तं भागवते अष्टमस्कंधतात्पर्ये पंचदशाध्याये । चत्वारिशृंगावेदास्तु पादास्त्रिसवनानिचेति ।

तिसरा अर्थ परमात्म्याच्यासंबंधानें असा होतो कीं, मूलरूप नाराय- णाचीं अनिरुद्धादिक हे शिंगें म्हणजे मुख्य रूपें आहेत; विश्व, तैज- स व प्राज्ञ हे त्याचे पाद म्हणजे अंश आहेत; आत्मा व अंतरात्मा हीं दो- न रूपें त्याच्या दोन डोक्यांच्या जागीं कल्पिलीं आहेत; भगवंताचीं वि- शेष रूपें असे जे भूरादिक सात लोक हे त्याचे हात आहेत; पाताळ, भूमि, व अंतरिक्ष ह्या तीन लोकीं तो संबद्ध आहे; तो सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे; तो वर्णन करण्यास अति योग्य आहे; तो सर्व तेजस्वी पदार्थांमध्यें श्रेष्ठ आहे; आणि तो प्रत्येक प्राण्याच्या हृदयामध्यें अंतर्यामी ह्या रूपानें आहे ॥ २ ॥

**त्रिधाहितंपणिभिर्गुह्यमानंगविदेवासोघृतमन्वविंदन् ।**
**इंद्रएकंसूर्यएकंजजानवेनादेकंस्वधयानिष्टतक्षुः ।**

**टीका**—पूर्वोक्तमेवविशदयति ॥ त्रिधा हितमिति ॥ **त्रिधा** विश्वतैज- सप्राज्ञात्मना त्रिधा देहे **आहितं** निक्षिप्तं । **पणिभिः**[1] व्यवहर्तृभिः स्तो- तृभिः **गवि** वेदवाक्यैः **गुह्यमानं** परमरहस्यत्वेन गोप्यमानं । **घृतं** दीप्तं स्वप्रकाशं ब्रम्ह **देवासः अन्वविंदन्** अजानन् । केदेवाइत्यतआह ॥ इंद्रमेकामिति ॥ **एकं** विश्वाख्यरूपं **इंद्रः जजान** ज्ञातवान् । **सूर्यः एकं** तैजसाख्यं **रूपं** जजान[2] ज्ञातवान् । **वेनाः**[3] वायुप्रधानाः देवाः **स्वधया** स्वावस्थितया प्राज्ञमूर्त्या **एकं** प्राज्ञमूर्तिं **निष्टतक्षुः**[4] नितरांज्ञातवंतः ।

**अर्थ**—[ पूर्वी सांगितलेलेंच स्पष्ट करून सांगतो. ] देहामध्यें पर- मात्मा विश्व, तैजस, व प्राज्ञ अशा तीन रूपांनीं राहिला आहे. विद्वान

---

१ पणिर्व्यवहारेस्तुतौचेतिधातोर्णिनि प्रत्ययः ।

२ जन जनने इत्यस्माल्लिट् प्रत्ययः ।

३ वातिगच्छतीति वः वायुः इनः स्वामी येषांतेवेनाः वायुप्रधानाः देवाः सुपां सुलुगितिजसआदादेशः ।

४ तक्षतनूकरण इति धातोः सकाशाल्लिट् ।

वेदवाक्यांनीं परमात्म्याचें स्तवन करतात. परमात्मा स्वप्रकाशमान परब्रम्ह आहे असें देवांनीं जाणिलें. [ ते देव कोणते हें सांगतों. ] इंद्रानें विश्व-नामक परमात्म्याचें रूप जाणिलें. सूर्यानें तैजसनामक परमात्म्याचें रूप जाणिलें. वायु आदिकरून इतर देवांनीं आपल्या ठिकाणीं सूक्ष्मबुद्धीनें प्राज्ञ नामक परमात्म्याचें रूप जाणिलें.

**योदेवानांप्रथमंपुरस्ताद्विश्वाधियोरुद्रोमहर्षिः। हिरण्य गर्भंपश्यतजायमानंसनोदेवः शुभयाः स्मृत्याः संयुनक्तु।**

**टीका—यः विश्वाधियः** विश्वाधिपः जगत्पतिः **महर्षिः** सर्वज्ञः **रुद्रः** रुद्रशब्दवाच्यः परमात्मा **देवानां प्रथमं जायमानं हिरण्यगर्भं पुरस्तात्** पूर्वं **पश्यत** अपश्यत **सः देवः नः** अस्मान् **शुभयां स्मृत्या** भगवत्स्मरणेन **संयुनक्तु** संयोजयतु।

**अर्थ**—जगाचा मालक व सर्वज्ञ अशा ज्या परमात्म्यानें देवांच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाला अगोदर पाहिलें तो परमात्मा आम्हाला आपल्या स्मरणाकडे लावो.

**यस्मात्परन्नापरमस्तिकिंचिद्यस्मान्नाणीयोनज्यायोऽस्ति-किंचित्। वृक्षइवस्तब्धोदिवितिष्ठत्येकस्तेनेदंपूर्णंपुरुषेण-सर्वं॥**

**टीका**—ब्रम्हस्वरूपं पुनरप्याह॥ यस्मादिति॥ **यस्मात्** परमात्मनः सकाशात् **अपरं** अन्यत् **परं** उत्कृष्टं **न अस्ति। यस्मात्** परमात्मनः **अणीयः** अणुपरिमाणोपेतं किंचित् वस्तु **न** अस्ति। **यस्मात् किंचित् ज्यायः** महापरिमाणोपेतं वस्तु **न अस्ति। वृक्षः** अश्वत्थादिः गमनागमनर-हितः तस्य **इव स्तब्धः दिवि** तदुपलक्षिते सर्वत्र **एकः** समभ्यधिकरहितः

१ रुजंद्रावयतेयस्माद्रुद्रस्तस्माज्जनार्दन इतिस्मृतेः।

२ शुभंयापयतिप्रापयति इतिव्युत्पत्तेर्या धातोः सकाशात् विचूप्रत्ययः।

लिष्ठति तेन पुरुषेण[1] परमात्मना इदं परिदृश्यमानं जगत् सर्वं पूर्णं[2] व्याप्तं आस्ति ।

अर्थ—[ पुनः परमात्म्याचें स्वरूप सांगतो. ] ज्या परब्रम्हापेक्षां दुसरा कोणीही उत्तम नाहीं, ज्या परब्रम्हापेक्षां दुसरा कोणी लहान नाहीं, ज्या परब्रम्हापेक्षां दुसरा कोणी मोठा नाहीं, जसा एकादा वृक्ष येत नाहीं व जात नाहीं परंतु स्तब्ध असतो, तसा जो परमात्मा सर्व ठिकाणीं एकसारख्या स्वरूपानें राहिलेला आहे, त्यानेंच हें दिसणारें सर्व जगत व्यापलें आहे.

**नकर्मणानप्रजयाधनेनत्यागेनैके अमृतत्वमानशुः । परेणनाकंनिहितंगुहायांबिभ्राजदेतद्यतयोविशंति ।**

**टीका**—परमात्मप्राप्तिलक्षणोमोक्षः कर्मादिना न भवति किंतु सर्वसंगपरित्यागसंन्यासेनेत्याह ॥ नकर्मणेति ॥ **कर्मणा**[3] काम्यकर्मणा अमृतत्वं **न** आनशुः **प्रजया** पुत्रादिना अमृतत्वं **न** आनशुः **धनेन** द्रविणादिना अमृतत्वं न आनशुः । किंतु **त्यागेन** सर्वसंगपरित्यागलक्षणसंन्यासेन **एके** मुख्याः ज्ञानिनः **अमृतत्वं आनशुः**[4] प्राप्नुवंति । सर्वसंगपरित्यागेन प्राप्तममृतत्वं किं स्वरूपमित्यत आह ॥ परेणेति ॥ **गुहायां** हृदयगुहायां **नाकं परेण** स्वर्गादुत्कृष्टं सत् **निहितं** स्वेच्छया संनिहितं **बिभ्राजत्** प्रकाशमानं **एतत्** अणोरणीयानित्यादिनोक्तं **यतयः** संन्यासिनः **विशंति**[5] प्रविशंति ॥

---

१ पूर्षु सर्वशरीरेषु शेतेनियामकतयेतिपुरुषः ।

२ पृपालनपूरणयोरित्यस्माद्धातोः सकाशात् क्तप्रत्ययेरदाभ्यांनिष्ठातोनः पूर्वस्य च दइति सूत्रेण तकारस्य नकारः ऋकारस्य उदोष्ठ्यपूर्वस्येति सूत्रेण उकारः ।

३ नास्त्यकृतः कृतेनेतिश्रुतेः ।

४ अशूव्याप्तौ संघातेच इत्यस्माद्धातोर्लिटि । अश्नोतेश्चेतिसूत्रेण नुडागमः

५ विशप्रवेशने इति धातोर्लट् ।

**अर्थ**—[ परमात्म्याची प्राप्ति होणें हा मोक्ष, कर्मं इत्यादि केल्यानें प्राप्त होत नाहीं, तर सर्व कर्में परमात्म्याला अर्पण केल्यानें प्राप्त होतो, असें सांगतो. ] मोक्ष हा काम्यकर्म केल्यानें, अथवा पुत्रादिकांनीं, अथवा पैक्यानें प्राप्त होत नाहीं, तर सर्व कर्में परमात्म्याला अर्पण केल्यानें ज्ञान्यांना मोक्ष मिळतो. [ सर्व कर्में परमात्म्याला अर्पण केल्यानें जो मोक्ष मिळतो त्याचें स्वरूप सांगतों. ] हृदयगुहेंत स्वर्गापेक्षां उत्कृष्ट असून जवळ असलेला व प्रकाशमान असा परमेश्वर संन्याशांना प्राप्त होतो.

**वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्वाः। ते ब्रम्हलोके तु परांतकाले परामृतात्परिमुच्यंतिसर्वे ।**

**टीका**—केवलसर्वसंगपरित्यागमात्रेण तत्प्रवेशोन किंतु वेदांतश्रवणादिजनितापरोक्षज्ञानेनेत्याह ॥ वेदांतेति ॥ **वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाः** वेदानामंतो निर्णयोयस्मात्तस्मान्मीमांसाशास्त्राज्जातेन विज्ञानेन सुनिश्चितार्थाः परापरतत्वनिश्चयशालिनः **संन्यासयोगात्** भगवति सर्वकर्मणां समर्पणाख्ययोगात् उपायात् **शुद्धसत्वाः** शुद्धांतःकरणाः ये **यतयः** यत्नशीलाः अपरोक्षज्ञानिनः **ते सर्वे** अपि अपरोक्षज्ञानिनः **ब्रम्हलोके**[1] सत्यलोके स्थित्वा तदुपदेशानंतरं आब्रम्हकल्पं तत्र स्थित्वा **परांतकाले** पराख्यब्रम्हायुषोंतकाले **परामृतात्** परमात्मनः प्रसादात् पूर्णसाधनाः संतः **परिमुच्यंति** मुक्ताः भवंति ।

**अर्थ**—[ नुसता सर्वसंग परित्याग करूनच परमात्मा प्राप्त होतो असें नाहीं, तर वेदांतशास्त्राचें श्रवण, मनन, व निदिध्यासन करून त्यापासून परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावर मोक्ष मिळतो असें सांगतो. ] वेदांचा निर्णय करणारें असें जें मीमांसाशास्त्र आहे, त्या शास्त्राच्या

---

१ तथाच गीतायां आब्रम्हभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन मामुपेत्यतु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते इति ।

ज्ञानानें ज्यांनीं श्रेष्ठ तत्व कोणतें व कनिष्ठ तत्व कोणतें ह्याचा पूर्ण निश्चय केला आहे व सर्व कर्मे परमात्म्याला अर्पण केल्याच्या योगानें ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे, असे जे ( मोक्षासाठीं ) यत्न करणारे त्यांना भगवंताचा साक्षात्कार होऊन नंतर ते ब्रम्हदेवाच्या सत्यलोकीं जातात. तेथें ब्रम्हदेवाचें आयुष्य आहे तोंपर्यंत ( म्हणजे दोन परार्द्ध वर्षेपर्यंत ) राहून मग भगवंताच्या कृपेनें साधनें पूर्ण मिळवून मुक्त होतात.

**दह्रंविपापंपरवेश्मभूतं यत्पुंडरीकं पुरमध्यसंस्थं। तत्रापिदह्रंगगनंविशोकस्तस्मिन्यदंतस्तदुपासितव्यं ।**

**टीका**—मुक्तिसाधनीभूतांदहरोपास्तिमाह ॥ दहरामिति ॥ **यत् एतत् पुंडरीकं** अष्टदलहृत्कमलमस्ति तत् **दह्रं** अल्पं **परवेश्मभूतं** परस्य श्रेष्ठस्य परमात्मनः वेश्मभूतं ग्रहरूपं **तत्रापि** भगवदधिष्ठानादेव **विपापं** पापरहितं **पुरमध्यसंस्थं** पुरस्य शरीरस्य मध्ये मध्यभागे विद्यमानं अस्ति । **तत्र अपि दह्रं** अल्पं **गगनं** आकाशः वर्त्तते **विशोकः** शोकादिदोषरहितं **तस्मिन् अंतः यत्** ब्रह्मरूपं अस्ति **तत् उपासितव्यं** उपासनीयं ।

**अर्थ**--[ मुक्ति होण्यास साधन अशी आपल्या हृदयांतील परमात्म्याची उपासना सांगतो. ] जें आपले हृदयामध्यें आठ पानांचें कमल आहे त्याचा मध्यभाग हा परमात्म्याच्या रहाण्याचें घर आहे. तेथें परमात्मा रहात असल्यामुळें तें घर पापरहित आहे. तें घर शरीराच्या मध्यभागीं आहे. त्या हृदयकमलामध्यें जे सूक्ष्म आकाश आहे त्यामध्यें शोकादिदोषरहित परमात्मा आहे. त्याची आपण उपासना करावी.

**योवेदादौस्वरःप्रोक्तोवेदांतेचप्रतिष्ठितः । तस्यप्रकृति-**

---

१ तथाच सूत्रं गुहां प्रविष्टावात्मानौहितद्दर्शनात् । आत्मांतरात्मेतिहहरिरेकएवद्विधास्थित इतिभाष्योक्तेः । तथाच श्रुतिः तस्यैव बिंबत्वान्मोचकत्वाच्च समोऽपि गवन् स्वबिंबदर्शनएवैनंमोचयति इति ।

**लीनस्ययःपरःसमहेश्वरः ॥ ३ ॥ अजोऽन्यआविवेशसर्वे-चत्वारिच ॥ १२ ॥**

**टीका**—केनमंत्रेणोपासितव्यइत्यतआह ॥ यो वेदादाविति ॥ **यः वेदादौ** वेदाध्ययनादौ **स्वरः** ॐकारः **प्रोक्तः** आदावुच्चार्यत्वेनोक्तः **वेदांते च** वेदाध्ययनेऽउपरितनकाले च उच्चार्यत्वेन **प्रतिष्ठितः तस्य** ॐकारस्य **प्रकृतिलीनस्य** प्रकृतौ अकारोकारमकारेषु लीनस्य प्रविष्टस्य **यः परः** वाच्यः **सः महेश्वरः** महश्चासौईश्वरश्च परमात्मा उपासितव्यः ॥३॥१२॥

**अर्थ**—[ कोणत्या मंत्रानें उपासना करावी हें सांगतो. ] वेदाध्ययन करण्यापूर्वीं प्रथम ज्याचा उच्चार करावा लागतो व वेद समाप्तीच्या वेळींही ज्याचा उच्चार करणें अवश्य आहे, असा जो ॐकार तो अकार, उकार व मकार या तीन वर्णांनीं युक्त आहे. त्या ओंकारानें वाच्य सर्वांत श्रेष्ठ परमात्मा आहे अशी उपासना करावी ॥ ३ ॥ १२ ॥

**सहस्रशीर्षंदेवंविश्वाक्षंविश्वशंभुवं । विश्वंनारायणंदेवमक्षरंपरमंपदं ॥**

**टीका**—पूर्वानुवाकांते हृत्पुंडरीकस्थमुपास्यमुक्तं तद्रूपगुणानाह ॥ सहस्रशीर्षमिति ॥ **सहस्रशीर्षं** सहस्राणि अपरिमितानि शीर्षाणि यस्य तं **देवं** क्रीडादिगुणयुक्तं **विश्वाक्षं** अनंताक्षं **विश्वशंभुवं** पूर्णसुखरूपं विश्वस्य शं सुखं भवति यस्मादिति **विश्वं** पूर्णं **नारायणं** गुणपूर्णत्वादिप्रवृत्तिनिमित्तत्वेन तच्छब्दवाच्यं **देवं** प्रकाशमानं **परमं** सर्वस्मात् परं **अक्षरं** सर्वथानाशरहितं **पदं** उत्तमप्राप्यं ध्यायेत् ॥

**अर्थ**—[ पूर्वीच्या अनुवाकाच्या शेवटीं हृदयकमलांत असलेला परमात्मा उपासनेस योग्य आहे असें सांगितलें. आतां त्याचे गुण व रूप सांगतो. ] ज्याला अनंत मस्तकें आहेत, जो क्रीडादि गुणांनीं युक्त आहे, ज्याला अनंत डोळे आहेत, ज्याच्यापासून जगाला पूर्ण सुख होतें, जो

पूर्ण आहे, सर्वगुणपूर्ण सर्वदोषरहित इत्यादि गुण असल्यामुळें ज्यास नारायण म्हणतात, जो प्रकाशमान आहे, जो सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे, जो अगदीं नाशरहित आहे, जो प्राप्त करून घेण्यास उत्तम आहे, त्याचें ध्यान करावें.

**विश्वतःपरमान्नित्यंविश्वंनारायणꣳहरिम्। विश्वमेवेदं पुरुषस्तद्विश्वमुपजीवति ॥**

**टीका**—पुनः कथंभूतमित्यतोद्वितीयांऋचमाह ॥ विश्वतः परमामिति ॥ **विश्वतः** जगतः **परमां**[1] परमं श्रेष्ठं **नित्यं विश्वं** पूर्णं **नारायणं** गुणपूर्णत्वादिविशिष्टं **हरिं** ब्रह्मादिसर्वनिग्रहपूर्वकं कर्तारं **इदं** परिदृश्यमानं **विश्वं एव** जगत् जडं **पुरुषः** चेतनः **तत् विश्वं** नारायणाख्यं पूर्णं ब्रम्ह **उपजीवति** तदधीनतया वर्तते ॥

**अर्थ**—[ आणखी ज्या परमात्म्याला वंदन करावयाचें तो कसा आहे ह्याविषयीं दुसरी ऋचा सांगतो. ] जगापेक्षां श्रेष्ठ, नेहेमीं असणारा, पूर्ण, गुणपूर्ण असणें दोष नसणें इत्यादि गुणांनीं युक्त, ब्रम्हदेव इत्यादिकांचा उत्पन्न करणारा व त्यांना आज्ञेंत ठेवणारा, (अशा प्रकारच्या परमात्म्याला वंदन करितों ). हें दिसणारें जडजग परमात्मा आहे. तें जग नारायणाच्या योगानें जीवंत राहतें.

**पतिं विश्वस्यात्मेश्वरꣳ शाश्वतꣳ शिवमच्युतं। नारायणं महाज्ञेयं विश्वात्मानं परायणं ॥**

**टीका**—तृतीयामृचमाह ॥ पतिमिति ॥ **विश्वस्य** जडात्मकप्रपंचस्य **पतिं** रक्षकं **आत्मेश्वरं** जीवानां स्वामिनं **शाश्वतं** शश्वत् एकप्रकारं **शिवं** सुखात्मकं **अच्युतं** सर्वदैवैश्वरभावच्युतिरहितं अनश्वरसुखरूपं वा

---

१ दीर्घश्छांदसः ।

**नारायणं** सर्वगुणपूर्णत्वादियुक्तं **महाज्ञेयं**[1] महद्भिर्ज्ञेयः तं **विश्वात्मानं**[2] विश्वस्य जगतः आत्मानं नियामकं **परायणं** परं उत्कृष्टं अयनं आश्रयरूपः तं ध्यायेत्‌ ॥

**अर्थ**—[ तिसरी ऋचा सांगतो. ] सर्व जगाचा रक्षण करणारा, सर्व जीवांचा नियामक, नेहेमीं एक प्रकारचाच राहाणारा, सुखात्मक, कधींही ऐश्वर्यांनीं रहित न होणारा, सर्व गुणांनीं पूर्ण, विद्वान लोकांनीं जाणण्यास योग्य, सर्व जगामध्यें अंतर्यामीरूपानें राहाणारा, सर्वांस उत्तम आश्रय देणारा, अशा परमात्म्याचें ध्यान करावें.

**नारायणपरोज्योतिरात्मानारायणः परः । नारायणपरंब्रम्ह तत्वंनारायणः परः ॥**

**टीका**—चतुर्थीमृचमाह ॥ नारायणेति ॥ **नारायणपरोज्योतिः**[3] परज्योतीरूपः मुख्यज्योतिरितियावत्‌ **आत्मा**[4] आदानादिकर्त्ता **परः** मुख्यः **नारायणः** नारायणसंज्ञकपरमात्मा **नारायणपरंब्रम्ह** नारायणएव श्रेष्ठब्रम्ह यद्वा ब्रम्हवेदः नारायणपरं नारायणशक्तितात्पर्यकमित्यर्थः **परः** परं **तत्त्वं नारायणः**[5] एव अस्ति ॥

**अर्थ**—[चवथी ऋचा सांगतो.] नारायण मुख्य ज्योति म्हणजे सर्वांचा प्रकाशक आहे, तोच परमात्मा सर्व जगतांचें ग्रहण, नाशन इत्यादि करणारा आहे, तोच नारायण सर्वांत मुख्य आहे. नारायणच मुख्य

---

१ तमेवैकंजानथआत्मानमन्या वाचो विमुंचथ इति श्रुतेः । नारायणोसौ परमोविचिंत्य इत्यादि श्रुत्यंतरात्‌ ।

२ एषतआत्मांतरयाम्यमृत इति श्रुतिः । अंतर्याम्यधिदैवादिषुतद्धर्मव्यपदेशादिति सूत्राच्च ।

३ तथाचसूत्रं ज्योतिश्चरणाभिधानादिति ।

४ तथाच भाष्ये आ ।नादनकर्तृत्वादात्मातेषामगोचर इति उक्तेः ।

५ नारायण इत्यत्र सर्वत्र सुपांसुलुगितिसूत्रेण छांदसो लुक्‌ ।

ब्रम्ह आहे ( अथवा सर्व वेद नारायणाचेंच प्रतिपादन करणारा आहे ). मुख्य जाणण्याजोगें तत्व नारायणच आहे.

**नारायणपरोध्याताध्यानंनारायणः परः ॥**

**टीका**—पंचमीमृचमाह ॥ नारायणेति ॥ **ध्याता** ध्यानकर्त्ता **नारायणपरः** नारायणतात्पर्यकः नारायणमेवध्यायतीत्यर्थः **ध्यानं** ध्यानरूपोऽपि **परः नारायणः** एव ध्यातृध्यानविरुद्धधर्मयोस्तस्मिन्समावेशात्[1] ॥

**अर्थ**—[ पाचवी ऋचा सांगतो. ] ध्यान करणाऱ्याचे ध्यानाचा मुख्य विषय परमात्माच आहे. ध्यानरूपीही परमात्माच आहे. कारण ध्यान व ध्यानकरणारा, अशा परस्पर विरुद्ध धर्मांचा समावेश परमात्म्यामध्यें होऊं शकतो.

**यच्चकिंचिज्जगत्सर्वंदृश्यतेश्रूयतेऽपिवा ॥ १ ॥**

**अंतर्बहिश्चतत्सर्वं व्याप्यनारायणःस्थितः ।**

**टीका**—**च यत् किंचित्** दर्शनविषयीभूतं अतीतानागतं च **सर्वं जगत्** जडाजडात्मकं **दृश्यते** प्राणिभिः **वा श्रूयते अपि तत् सर्वं जगत् अंतः बहिः च व्याप्य** एकः **नारायणः स्थितः** सार्वत्रिकसंबंधेन स्थितः ।

**अर्थ**—जेवढें कांहीं जड व चेतनरूपी जगत आतां दिसतें, पूर्वी दिसलें व पुढें दिसेल, आणि जें प्राण्यांना ऐकूं येतें त्या सर्व जगताला आंत व बाहेर व्यापून नारायण सर्वत्र राहिला आहे.

**अनंतमव्ययंकविं समुद्रेंऽतंविश्वशंभुवं ।**

**टीका**—अंतस्थितःवेपरिच्छेदाज्ञानादिकंस्यादित्यत आह ॥ अनंतमिति ॥ **अनंतं** देशतः कालतः गुणतः अपरिच्छिन्नं **अव्ययं** सर्वथानाश-

---

१ तथाच अभिध्योपदेशाच्चेति सूत्रोपरितनभाष्ये ध्यायातिध्यानरूपोऽसौसुखी-सुखमतीव च। विरुद्धधर्मरूपोसावैश्वर्यात्पुरुषोत्तमइतिच ।

२ तथाच सूत्रं अन्यत्रभावाच्च न तृणादिवत् इति ।

रहितं **कविं** सर्वज्ञं **समुद्रे अंतः** क्षीरसमुद्रांतः स्थितं **विश्वशंभुवं** विश्वस्य प्रपंचस्य शं सुखं भवति यस्मात्तं परमात्मानं ध्यायेत् ॥

**अर्थ**—[ नारायण सर्व जगताच्या बाहेर व आंत व्यापून राहिला आहे असें सांगितलें, ह्यावरून प्रत्येक पदार्थांच्या आकृतींत राहिला म्हणजे त्या पदार्थापेक्षां लहान झाला पाहिजे. असें झालें असतां परमात्मा मोजक्या परिमाणाचा व अज्ञानी होईल अशी शंका घेऊन तिचें उत्तर सांगतो. ] तो परमात्मा जाग्याच्यासंबंधानें, कालाच्यासंबंधानें व **गुणां**च्यासंबंधानें मोजका नाहीं, म्हणजे अमुक जागीं आहे व अमुक जागीं नाहीं किंवा तो इतका लांब किंवा रुंद आहे असा मोजला जात नाहीं. तो अमुक वर्षेपर्यंत आहे व पुढें नाहींसा होणार किंवा पूर्वी नव्हता अशा रीतीनें कालाच्यासंबंधानें तो मोजला जात नाहीं. तसेंच परमात्म्याला अमुकच गुण आहेत व अमुक गुण नाहींत अशा प्रकारानें गुणांच्यासंबंधानेंही तो मोजला जात नाहीं. त्याचा नाश कधींही होत नाहीं, तो सर्वज्ञ आहे, तो क्षीरसमुद्रामध्यें शेषावर निजणारा आहे, त्या परमात्म्यापासूनच ह्या जगाचें कल्याण होत आहे. त्या परमात्म्याचें ध्यान करावें.

**पद्मकोशप्रतीकाशꣳहृदयंचाप्यधोमुखं । अधोनिष्ट्यावितस्त्यांतेनाभ्यामुपरितिष्ठति । ज्वालमालाकुलंभातिविश्वस्यायतनंमहत् ॥**

**टीका**—अंतरूपासनार्थं उपासनास्थानं तत्र परमात्मास्थितिप्रकारं चाह॥ पद्मकोशेति ॥ **पद्मकोशप्रतीकाशं** कमलकुड्मलसन्निभं **हृदयं** हृदयनात् हृद्गतमित्यर्थः **अधोमुखं** आकुंचिताग्रं । तत्पद्मं कुत्र तिष्ठतीत्यत आह ॥ अधोनिष्ट्येति ॥ **निष्ट्याः** ग्रीवासंधेः **अधः** अधोभागे वर्तते तत्रापि **नाभ्यां उपरि** नाभिदेशस्य ऊर्ध्वभागे **वितस्त्यांते**[2] द्वादशांगुलिपरिमितभागे

---

१ एतस्यैवानंदस्यान्यानिभूतानिमात्रामुपजीवंति इति श्रुतेः ।

२ वितस्तिर्द्वादशांगुलमित्यमरः ।

**तिष्ठति** वर्त्तते तत् **ज्वालमालाकुलं** वन्हिज्वालामालाभिः आकुलंसंबद्धं **विश्वस्य** पूर्णस्य परमात्मनः सर्वस्य प्रपंचस्य वा महत् **आयतनं**[1] महदाश्रयं अस्ति।

**अर्थ**--[ हृदयांत परमात्म्याची उपासना करण्याकरितां तें स्थान व तेथें परमात्म्याची स्थिति कशी आहे तें सांगतों. ] कमलाचा कोश जसा असतो त्याप्रमाणें हृदयामध्यें परमात्म्याचें स्थान आहे. त्याचें तोंड खालीं आहे. तें कमल मानेच्या संधीचे खालील बाजूकडे व नाभीच्या वरचे बाजूस आहे. तें कमल बारा अंगुलीचे परिमाणाचें आहे. त्याचे चोहींकडे अग्नीच्या ज्वालाप्रमाणें दैदीप्यमान तेज आहे. असें हें स्थान सर्वव्यापक परमात्म्याचें आहे. तेथें असलेला परमात्माच सर्व प्रपंचास आधार आहे.

**संततꣳ शिलाभिस्तुलंबत्याकोशसन्निभं। तस्यांतेसुषिरꣳसूक्ष्मंतस्मिन्त्सर्वंप्रतिष्ठितं। तस्यमध्येमहानाग्निर्विश्वार्चिर्विश्वतोमुखः। सोग्रभुग्विभजंतिष्ठन्नाहारमजरः कविः।**

**टीका**--अष्टमनवम्यौऋचावाह ॥ संततमिति ॥ **शिलाभिः** शिराभिः नाडीभिः **संततं** सर्वत्रव्याप्तं **तु आकोशसंन्निभं** आकोशः पद्ममुकुलंतत्सदृशंहृदयकमलं **लंबति** शरीरमध्येऽधोमुखतयाऽवस्थितं। **तस्य** हृदयपद्मस्य **अंते** मध्ये सूक्ष्मं **सुषिरं** रंध्रं वर्त्तते। **तस्मिन्** सुषिरे **सर्वं** इदं जगत् **प्रतिष्ठितं** आश्रितं। **तस्य** सुषिरस्य **मध्ये महान् अग्निः विश्वार्चिः** बहुज्वालोपेतः अतएव **विश्वतोमुखः** सर्वत्रप्रसृतज्वालः वर्त्तते। **सः** अग्निः **अग्रभुक्** प्रथमभोक्ता **कविः** ज्ञानी **आहारं** पुरुषभुक्ताहारमन्नादिकं

---

१ उभेअस्मिन्द्यावापृथिवीअंतरेवसमाहितेउभावग्निश्चवायुश्चसूर्याचंद्रमसावुभौविद्युन्नक्षत्राणीत्यादिश्रुतेः।

२ रलयोरभेदात्।

३ तद्यद्भक्तंप्रथममागच्छेत्तद्धोमीयमितिश्रुतेः।

**विभजन्** सर्वावयवेषु प्रसारयन् **अजरः** जराराहितः स्वयं अन्यैर्जरयितुमशक्यो वा **तिष्ठन्** अवस्थितः ।

**अर्थ**—[ आठवी व नववी ऋचा सांगतो. ] नाड्यांनीं सर्व ठिकाणीं व्यापिलेलें व कमळाच्या कळीसारखें असें हृदयकमळ शरीरामध्यें खालीं तोंड करून आहे. त्या हृदयकमलामध्यें बारीक भोंक आहे. त्या भोंकांत सर्व जग आहे. त्या भोंकांत मोठा बहुत ज्वालांनीं युक्त व सर्व ठिकाणीं पसरलेला असा अग्नि आहे. तो अग्नि अन्नाचा उपभोग प्रथम घेणारा, ज्ञानी, मनुष्यांनीं खाल्लेलें अन्न इत्यादि सर्व अवयवांत पसरविणारा, स्वतः जराराहित असून त्यास दुसरा कोणी जरायुक्त करूं शकत नाहीं असा आहे.

**तिर्यगूर्ध्वमधःशायीरश्मयस्तस्यसंतता । संतापयतिस्वंदेहमापादतलमस्तकः ।**

**टीका**—दशमीमृचमाह ॥ तिर्यगिति ॥ **तस्य** अग्नेः **तिर्यक्** विष्वक् **ऊर्ध्वं** ऊर्ध्वभागे **अधः** अधोभागेऽपि **शायी रश्मयः** ज्वाला **संतता** व्याप्तासती **आपादतलमस्तकः** पादतलमारभ्यमस्तकपर्यंतं **स्वं** स्वकीयं **देहं संतापयति** औष्ण्ययुक्तं करोति । स्वदेहसंतापएवाग्निसद्भावेलिंगं ।

**अर्थ**—[ दहावी ऋचा सांगतो. ] अग्नीच्या सभोंवतीं वरच्या बाजूला व खालच्याही बाजूला त्याची ज्वाला व्यापून पायापासून डोक्यापर्यंत आपल्या शरीराला तापविते. आपलें शरीर ऊन असतें ही अग्नि असल्याची खूण आहे.

**तस्यमध्येवन्हिशिखाअणीयोर्ध्वाव्यवस्थितः । नीलतोयदमध्यस्थाद्विद्युल्लेखेवभास्वरा । नीवारशूकवत्तन्वीपीताभास्वत्यणूपमा । तस्याःशिखायामध्येपरमात्माव्यवस्थितः ।**

**टीका**—एकादशीमृचमाह ॥ तस्येति ॥ **तस्य** अग्नेः **मध्ये वन्हिशि-**

**ला** वन्हेः काचिज्ज्वाला **अणीया** अणीयसी अत्यंतसूक्ष्मेति यावत् **ऊर्ध्वा** सुषुम्नानाडीमारभ्यब्रह्मरंध्रपर्यंतं प्रसृत्य **व्यवस्थितः** विशेषाकारेणव्यवस्थिता । कथंभूतावन्हिशिखेत्यतआह ॥ नीलतोयदेति ॥ **नीलतोयदमध्यस्था** नीलस्य नीलवर्णोपेतस्य तोयदस्य जलदस्य मध्यस्थ्या मध्यस्थिता **विद्युल्लेखा इव** तडिल्लेखेव **भास्वरा** प्रभावती । **नीवारशूकवत्** नीवारस्य ऋषिधान्यस्य शूकवत् तद्दीर्घपुच्छवत् **तन्वी** मृद्वी अण्वी वा **पीता** पीतवर्णयुक्ता **भास्वती** दीप्तिमती **अणूपमा** अणुभ्यः अणुवस्तुसदृशी व्यवस्थिता । **तस्याः शिखायाः** अणीयस्याः अग्निज्वालायाः मध्ये **परमात्मा** परमश्चासावात्मा च **व्यवस्थितः** विविधरूपेण अवस्थितः ।

**अर्थ**—[ अकरावी ऋचा सांगतो. ] अग्नीच्यामध्यें त्याची अति सूक्ष्म ज्वाला सुषुम्ना नाडीपासून ब्रम्हरंध्रापर्यंत पसरलेली आहे. [ ती ज्वाला कशी आहे हें सांगतो. ] ती ज्वाला पाण्याच्या ढगांत असलेल्या विजेप्रमाणें प्रकाशणारी; सावा, राळा, इत्यादि तृण धान्याच्या कणसाच्या लांब शेंड्याप्रमाणें मऊ ( अथवा लहान ); पिंवळ्या रंगाची; चकचकणारी; व अति सूक्ष्म पदार्थासारखी आहे. त्या अग्नीच्या अति सूक्ष्म ज्वालेमध्यें परमात्मा अनेक रूपांनीं राहिला आहे.

**सब्रम्ह सशिवः सहरिः सेंद्रः सोक्षरः परमः स्वराट् ॥ २ ॥ अपिवासंततापट्ट ॥ १३ ॥**

**टीका**—द्वादशीमृचमाह ॥ सइति ॥ **सः** परमात्मा **ब्रम्ह** गुणपूर्णं[१] गुणबृंहणादितिवचनात् । **सः शिवः** सुखात्मकः मंगलप्रदोवा । **सः हरिः** यज्ञभागहरणात् हरिद्वर्णत्वाद्वा हरिशब्दवाच्यः । **सः इंद्रः** परमैश्वर्यशालित्वादिंद्रशब्दवाच्यः । **सः अक्षरः** अविनाशी **परमः** श्रेष्ठः **स्वराट्** स्वतंत्रः । एतादृशः परमात्मा हृदयकमले वर्तते सउपास्यः ॥ २ ॥ ॥ १३ ॥

---

१ अथ कस्मादुच्यते ब्रम्हेति बृहंतो ह्यस्मिन् गुणा इति श्रुतेः ।

**अर्थ**—[ बारावी ऋचा सांगतो. ] पूर्वी सांगितलेला परमात्मा गुणपूर्ण असल्यामुळें ब्रम्ह आहे. तो सुखरूप ( अथवा मंगल देणारा ) असल्यामुळें शिव आहे. तो यज्ञांतला भाग घेतो म्हणून हरि आहे. तो परमैश्वर्ययुक्त असल्यामुळें इंद्र आहे. तो अविनाशी, श्रेष्ठ व स्वतंत्र आहे. अशा प्रकारचा परमात्मा हृदयकमलांत आहे, त्याची उपासना करावी ॥ २ ॥ १३ ॥

**आदित्योवाएष एतन्मंडलं तपातितत्रताऋचस्तदृचा मंडलꣳ सऋचां लोकोथयएष एतस्मिन्मंडलेऽर्चिर्दीप्यते तानिसामानि ससाम्नां लोकोथयएष एतस्मिन्मंडलेऽर्चिषि पुरुषस्तानियजूꣳषिसयजुषामंडलꣳ सयजुषां लोकः सैषात्रय्येव विद्यातपातिय एषोंतरादित्ये हिरण्मयः पुरुषः॥१४॥**

**टीका**—इयत्पर्यंतमंतरोपास्तिमभिधाय आदित्यप्रतीकेभगवदुपास्तिमाह॥ आदित्यइति ॥ **सः** पुर्वोक्तनारायणः **एतत् मंडलं** परिदृश्यमानसूर्यमंडलमधिष्ठाय **यः तपति एषः आदित्यः**[1] अदितिपुत्रत्वादादित्यशब्दवाच्यः **वै** प्रसिद्धं **तत्र** मंडले **ताः** प्रसिद्धाः **ऋचः** अग्निमीळइत्यादिऋग्वेदास्तदभिमानिदेवाश्चवर्त्तंते **तत् मंडलं** तु **ऋचा** व्याप्तं । **सः** तत्र विद्यमान आदित्यशब्दवाच्योहरिः **ऋचां** ऋगभिमानिनां देवानां **लोकः** आश्रयः । एवं ऋगात्मकं मंडलं तदंतर्गतहरिं च ध्यात्वा **अथ एतस्मिन् मंडले यः एषः अर्चिः** भास्वरं तेजः **दीप्यते** प्रकाशते **तानि** अर्चींषि **सामानि** शन्नोदेवीरभिष्टयइत्यादिसामवेदाः बृहद्रथंतरादिसामानि तदभिमानिदेवताः इत्यादीनां **साम्नां सः** अर्चिः हरिः लोकः आश्रयभूतः । **अथ** सामध्यानानंतरं **एतस्मिन् मंडले अर्चिषि यः एषः पुरुषः** चेतनः सूर्यः **तानि यजूंषि** इषेत्वेत्यादिरूपाणियजुरभिमानिदेवतानि । **सः** परमात्मा **यजुषां**

---

१ आदित्यस्त्वदितेः सुत इति वचनात् । असावादित्योरस इति छंदोगश्रुतौ । ध्येयः सदासवितृमंडलमध्यवर्त्तीति स्मृतौच ।

**मंडलं** मंडलस्य इति ध्यायेत् । **सः** परमात्मा **यजुषां** यजुरभिमानिदेवतानां **लोकः** आश्रयभूतः । **सा एषा** परिदृश्यमानं मंडलं अर्चिः पुरुषः **त्रयी एव** ऋग्यजुःसामात्मिकाविद्यैव **तपति** प्रकाशते । **सः एषः** पूर्वोक्तादित्याख्योहरिः प्रसिद्धः **अंतरादित्यः** आदित्येऽतः **हिरण्मयः** सुवर्णात्मकः **पुरुषः** वर्त्तते ॥ १४ ॥

**अर्थ**—[ येथपर्यंत हृदयांतील परमात्म्याची उपासना करण्याविषयीं सांगून सूर्यामधील भगवंताची उपासना करण्याविषयीं सांगतो. ] पूर्वीं सांगितलेला नारायण, हें जें सूर्यमंडल दिसतें तेथें राहून जो प्रकाशतो तो आदित्य नांवाचा परमात्मा आहे. त्या मंडलांत अग्निमीळइत्यादि ऋग्वेद व त्यांच्या अभिमानीदेवता आहेत. तें मंडल ऋचांनीं व्यापिलेलें आहे. त्या मंडलांत असलेला आदित्य नांवाचा हरि ऋग्वेदांचा व त्यांच्या अभिमानीदेवांचा आधार आहे. ह्याप्रमाणें ऋग्वेदरूपमंडल व त्याचे आंत असलेला हरि ह्यांचें ध्यान करून नंतर ह्या मंडलांतनें हें चकचकीत तेज प्रकाशतें तें शन्नोदेवीरभिष्टय इत्यादि सामवेद व बृहद्रथंतर इत्यादि सामें व त्यांच्या अभिमानिदेवता इत्यादिकांचा तो प्रकाशरूप हरि आधार आहे. सामाचें ध्यान केल्यावर ह्या मंडलांतील प्रकाशामध्यें जो चेतनसूर्य आहे तो इषेत्वा इत्यादि यजुर्वेद व त्यांच्या अभिमानिदेवता आहे. तो परमात्मा यजुर्वेदरूप मंडलांत राहाणारा आहे असें ध्यान करावें. तो परमात्मा यजुर्वेदांचा व त्यांच्या अभिमानीदेवतांचा आधार आहे. हें दिसणारें सूर्यमंडल, प्रकाश व चेतन हीं तीनच ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद ह्या रूपांनीं प्रकाशतात. पूर्वीं सांगितलेला आदित्य नांवाचा हरि सूर्याचे आंत सोन्याचा पुरुष आहे ॥ १४ ॥

**आदित्योवैतेजओजोबलंयशश्चक्षुःश्रोत्रमात्मामनोमन्यु**

---

१ अथयएषोंतरादित्येहिरण्मयः पुरुषोदृश्यतेहिरण्यश्मश्रुर्हिरण्यकेशआप्रणखात्सर्वएवसुवर्णइति ।

र्मनुर्मृत्युःसत्योमित्रोवायुराकाशःप्राणोलोकपालःकःकिंकंत-त्सत्यमन्नममृतोजीवोविश्वःकतमःस्वयंभुब्रम्हैतदमृतएषपु-रुषएषभूतानामधिपतिर्ब्रम्हणःसायुज्य ँ सलोकतामाप्नोत्ये-तासामेवदेवताना ँ सायुज्य ँ सार्ष्टिता ँ समानलोक-तामाप्नोतियएवंवेदेत्युपनिषत् ॥ १५ ॥

**टीका**—यएषपूर्वोक्तआदित्यस्यआदित्यशब्दवाच्योनारायणः सर्वेषांतेज-आदिप्रदत्वेनतच्छब्दवाच्यत्वेनोपास्यइत्याह ॥आदित्य इति॥ य एषःपूर्वो-क्तः **आदित्यः तेजः** प्रकाशरूपः **ओजः** परविष्टंभशक्त्यात्मकः **बलं**[1] बलरूपः च सर्वेषांबलप्रदः **यशः** कीर्तिप्रदः च तदात्मकः भगवद्धर्माणां भगवदभेदात् **चक्षुः** सर्वंचष्ट इति **श्रोत्रं**[2] सर्वश्रोतृत्वात् **आत्मा** आदा-नाददनकर्तृत्वात् **मनः**[3] मंतृत्वान्मनःशब्दवाच्यः **मन्युः** क्रोधाभिमानिमन्यु-नामकतामसमन्युगतः नृसिंहादिरूपः मन्युप्रदश्च **मनुः** स्वायंभुवादिमन्वंतर्ग-तः तच्छब्दाभिधेयश्च **मृत्युः** सर्वमारकः **सत्यः** सद्भावप्रापकः **मित्रः** मि-त्वात्रायतइति भक्तत्वेन ज्ञात्वा रक्षणकर्तेति यावत् **वायुः**[4] वातिजानातीति **आ-काशः** आसमंतात्काशतइति **प्राणः** प्रकृष्टचेष्टकः **लोकपालः** लोकान्पा-लयतीति **कः**[5] सुखात्मकः ब्रम्हवायुसूर्यांतर्गतश्च **किं** साकल्येनवाचाऽनिर्देश्य-रूपः **कं** सुखात्मकः **तत्** ततत्वात् **सत्यं** यथार्थज्ञानरूपं **अन्नं**[6] सर्वो-पजीव्यं **अमृतः** नित्यमुक्तः **जीवः** सर्वप्राणधारकः **विश्वः** पूर्णः **कतमः** अतिशयसुखरूपः **स्वयंभूः** स्वयमेवाभिव्यक्तः उत्पत्तिकारणशून्यइति यावत् **ब्रह्म एतत् अमृतः**[7] **एषः** सूर्यांतस्थः **पुरुषः** पुरुधासूतइति **एषः**

---

१ सर्वंबलंबलिनांचापरेषामितिभागवतोक्तेः ।

२ श्रोत्रंश्रोतृत्वतोविभुरितिभाष्ये ।

३ मनोमंतृत्वतोविभुरित्युक्तेः ।

४ वागतिगंधनयोरितिधातोः कृवापाजीत्यादिनायुण् ।

५ मारुतेवेधसिब्रध्नेपुंसिकइतिकोशात् ।

६ सोऽन्नंसर्वोपजीव्यतइतिवचनात् ।

७ एतदमृतमभयमेतद्ब्रम्हेतिश्रुतेः ।

**भूतानां अधिपतिः** सर्वेषां प्राणिनामधीश्वरः। **यः एवं** पूर्वोक्ततेजोरूपत्वा-दिनासहस्त्रशीर्षत्वादिना **वेद** सः सूर्यऋक्सामयजुरादिदेवतानां समानलो-कतां आप्य **ब्रह्मणः सायुज्यं सार्ष्टितां समानलोकतां आप्नोति** । तत्र सालोक्ययोग्यानां सालोक्यप्राप्तिः अंगदेवतानां तत्तदंगसायुज्यप्राप्तिः ब्रम्हवायुतत्पत्नीनांसार्ष्टिशब्दितसर्वांगसायुज्यप्राप्तिरितिविवेकः । **इति उपनिषत्** रहस्यं ॥ १९ ॥

**अर्थ**—[ पूर्वी सांगितलेला सूर्यांत असणारा आदित्य नांवाचा जो नारा-यण तो सर्वांना तेज इत्यादि देतो म्हणून त्याची तेज ह्या नांवानें उपासना करावी असें सांगतो. ] पूर्वी सांगितलेला जो आदित्य हा प्रकाशरूप, दुसऱ्याची शक्ति कुंठित करणारा, बलरूप व सर्वांना बळ देणारा, कीर्ति-रूप व कीर्ति देणारा ( कारण भगवंताचे धर्म व भगवान ह्यांत भेद नाहीं ), सर्व पाहणारा, सर्व ऐकणारा, घेणें व खाणें हे व्यापार करीत असल्यामुळें आत्मा नांवाचा, मनन करितो म्हणून मन नांवाचा, क्रोधाचा अभिमानी जो मन्यु त्यांत असणारा, नृसिंह इत्यादि रूपाचा व क्रोध देणारा, स्वायंभु इत्यादि मनूंमध्यें असणारा व मनु नांवाचा, सर्वांचा नाश करणारा, मनांत चांगला भाव उत्पन्न करणारा, भक्ताची भक्ति जाणून त्याचें रक्षण करणारा, जाणतो म्हणून वायु नांवाचा, सभोंवतीं प्रकाशतो म्हणून आकाश नांवाचा, सर्व व्यापार करणारा, लोकांचें संरक्षण करितो म्हणून लोकपाल नांवाचा, सुखरूप व ब्रम्हदेव वायु आणि सूर्य ह्यांचे आंत राहणारा, ज्याचें पूर्णपणे वर्णन करितां येत नाहीं असा, सुखस्वरूप, व्याप्त असल्यामुळें तत् नांवाचा, यथार्थ ज्ञानरूप असलेला, सर्व खा-ण्याजोगा असलेला, नेहेमीं जन्ममरणांपासून सुटलेला, सर्वांचे प्राण धारण करणारा, पूर्ण, अतिशय सुखरूप, आपले आपणच प्रगट झाले-ला, ज्याच्यामध्यें पुष्कळ गुण आहेत असा, आहे. हा अविनाशी आहे. हा सूर्यांत राहणारा परमात्मा बहुत प्रकारें उत्पन्न होणारा आहे. हा सर्व प्राण्यांचा धनी आहे. परमात्मा पूर्वी सांगितल्याप्रमाणें तेजोरूप

इत्यादि गुणांचा व हजारो मस्तकें इत्यादि असलेला आहे असें जो जाणतो तो सूर्य ऋग्वेद सामवेद यजुर्वेद इत्यादि देवतांच्या लोकाला जाऊन ब्रम्हदेवाच्या लोकीं जाऊन त्याच्यासारखा होऊन त्याच्याजवळ रहातो. त्यामध्यें त्याच्या लोकीं जाण्यास जे योग्य आहेत त्यांना तो लोक प्राप्त होतो; अंगदेवतांना त्यांच्या त्यांच्या अंगाची सायुज्यप्राप्ति होते; ब्रम्हदेव, वायु व त्यांच्या बायका ह्यांना सर्वांग सायुज्यप्राप्ति होते. ह्याप्रमाणें वेदरहस्य आहे ॥ १५ ॥

**निधनपतयेनमः। निधनपतांतिकायनमः। ऊर्ध्वायनमः। ऊर्ध्वलिंगायनमः। हिरण्यायनमः। हिरण्यलिंगायनमः। सुवर्णायनमः। सुवर्णलिंगायनमः। दिव्यायनमः। दिव्यलिंगायनमः। भवायनमः। भवलिंगायनमः। शर्वायनमः। शर्वलिंगायनमः। शिवायनमः। शिवलिंगायनमः। ज्वलायनमः। ज्वललिंगायनमः। आत्मायनमः। आत्मलिंगायनमः। परमायनमः। परमलिंगायनमः। एतत्सोमस्यसूर्यस्यसर्वलिंग ँ स्थापयतिपाणिमंत्रंपवित्रं ॥ १६ ॥**

**टीका**—इतःपरंपाणिमंत्रशब्दितमंत्रविशेषप्रतिपाद्यत्वंहरेराह ॥ निधनपतयइत्यादिमंत्रपवित्रमित्यंतेन ॥ **निधनपतये**[1] कुलपतये नाशकाय वा **नमः**। **निधनपतांतिकाय** निधनपताः निधनपतयः तेषामंतिकाय समीपवर्त्तिने हरये **नमः**। **ऊर्ध्वाय**[2] सर्वोत्तमाय **नमः**। **ऊर्ध्वलिंगाय** सर्वोत्तमत्वचिन्हाय **नमः**। **हिरण्याय**[3] विलक्षणसुखाय **नमः**। **हिरण्यलिंगाय**[4] प्रवर्त्तकत्वोचितलिंगवते **नमः**। **सुवर्णाय**[4] शोभनशुक्लादिद्विजादिवर्णाय

---

१ निधनंकुलनाशयोरितिकोशात् ।

२ ऊर्ध्वमूलमित्यादौऊर्ध्वशब्दस्यसर्वोत्तमत्वोक्तेः ।

३ सुखंलब्ध्वाहिकुरुतइतिसुखादेवभगवतःसृष्ट्यादिश्रुतेः ।

४ वर्णोद्विजादौशुक्लादौस्तुतौवर्णंतुवाक्षरइतिकोशात् । तस्यहवाएतस्यनारायणस्य चत्वारिरूपाणिशुक्लंरक्तंरौग्मंकृष्णमितिश्रुतेः ।

स्तुत्याय वा **नमः । सुवर्णलिंगाय** ब्राम्हणवर्णोचितयजनयाजनादिलक्षणवते स्तुत्यसर्वोत्तमत्वसर्वाभीष्टदातृत्वादिलिंगाय वा **नमः । दिव्यार्य** अलौकिकाय **नमः । दिव्यलिंगाय** अलौकिकयुगपदणुत्वमहत्वादिलोकविलक्षणधर्मवते **नमः । भवाये** भवशब्दितरुद्रांतर्गताय रामकृष्णादिरूपेण अभिव्यक्तिलक्षणोत्पत्तिमते वा **नमः । भवलिंगाय** तच्चिन्हाय **नमः । शर्वार्य** अभक्तसुखरोपकाय **नमः । शर्वलिंगाय** त्रिनेत्रत्वादितच्चिन्हाय **नमः । शिवाय** मंगलरूपाय सुखात्मकाय वा **नमः । शिवलिंगाय** सुखात्मकत्वचिन्हादिमते **नमः । ज्वलाय** ज्वलिताय **नमः । ज्वललिंगाय** प्रकाशनलिंगाय **नमः । आत्माय** अंतर्यामिणे **नमः । आत्मलिंगाय** अंतर्नियमनाद्यात्मकलिंगवते **नमः । परमाय** उत्तमाय **नमः । परमलिंगाय** उत्तमचिन्हवते **नमः । एतत् पाणिमंत्रं सोमस्य सूर्यस्य पवित्रं सर्वलिंगं** भगवति **स्थापयति** प्रतिपादयतीत्यर्थः । इदं पाणिमंत्रंभगवतिसोमादिसर्वदेवताचिन्हानिस्थापयतीति यावत् ॥ १६ ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें ‘ निधनपतये ’ येथपासून ‘ मंत्रं पवित्रं ’ येथपर्यंत पाणिमंत्र नांवाच्या मंत्रानें परमात्म्याचें प्रतिपादन केलें आहे असें सांगतो. ] कुलांचा धनी ( अथवा नाश करणारा ) ह्यास नमस्कार. निधनपतींच्या जवळ असणाऱ्या हरीला नमस्कार. सर्वोत्तमाला नमस्कार. सर्वोत्तमपणा हें चिन्ह ज्यांत आहे त्यास नमस्कार. विलक्षण सुख ज्यास आहे त्यास नमस्कार. प्रवृत्त करणें हें योग्य चिन्ह ज्यास आहे त्यास नमस्कार. शोभिवंत असे पांढरा इत्यादि वर्ण व ब्राम्हण इत्यादि वर्ण ज्यास आहेत त्यास (अथवा स्तुतीस जो योग्य आहे त्यास) नमस्कार. ब्राम्हण जातीला उचित अशीं जीं यज्ञयागादि लक्षणें ज्यास आहेत त्यास ( अथवा स्तुतीस योग्य असणें, सर्वोत्तम असणें व सर्वांना पाहिजे असेल तें देणें इत्यादि

---

१ दिव्योह्यमूर्त्तःपुरुषइतिश्रुत्यंतरात् ।

२ अजायमानोबहुधाविजायतेइतिश्रुतेः । प्रत्यक्षत्वंहरेर्जन्मेतिस्मृतेश्च ।

३ शंरोधनात्शरिः इतिभाष्योदाहृतवचनात् ।

चिन्हें ज्यास आहेत त्यास ) नमस्कार. जो अलौकिक आहे त्यास नमस्कार. फार लहान असणें व अतिशय मोठा असणें असे विरुद्ध गुण एकाच वेळीं असणें हें चिन्ह ज्यास आहे त्यास नमस्कार. भवनामक रुद्रामध्यें असणाऱ्यास (अथवा रामकृष्ण इत्यादि रूपानें प्रगट होणाऱ्यास) नमस्कार. हें चिन्ह ज्यांत आहे त्यास नमस्कार. अभक्ताच्या सुखाला प्रतिबंध करणाऱ्यास नमस्कार. तीन डोळे इत्यादि चिन्हें ज्यास आहेत त्यास नमस्कार. जो मंगलरूप आहे (किंवा सुखरूप आहे) त्यास नमस्कार. सुखरूप असणें हें चिन्ह ज्यास आहे त्यास नमस्कार. जो प्रदीप्त आहे त्यास नमस्कार. प्रकाश करणें हें चिन्ह ज्यास आहे त्यास नमस्कार. जो अंतर्यामी आहे त्यास नमस्कार. आंत राहून नियमन करणें इत्यादि चिन्हें ज्यास आहेत त्यास नमस्कार. जो उत्तम आहे त्यास नमस्कार. उत्तम असणें हें चिन्ह ज्यास आहे त्यास नमस्कार. हा पाणिमंत्र भगवंताच्या ठिकाणीं सूर्य चंद्र इत्यादि सर्व देवतांचीं चिन्हें आहेत असें वर्णन करितो ॥ १६ ॥

**सद्योजातंप्रपद्यामिसद्योजातायवैनमोनमः ।भवेभवेनातिभवेभवस्वमां । भवोद्भवायनमः ॥ १७ ॥**

**टीका**--ब्रम्होपासनार्थं पंचमंत्रानाह ॥ सद्योजातमित्यादिना ॥ तत्र प्रथममंत्रमाह ॥ सद्योजातमिति ॥ **सद्यः** ध्यानसमये **जातं** अभिव्यक्तं परमात्मानं सद्योजातादिशब्दितरुद्रांतर्गतं **प्रपद्यामि**[1] शरणं प्रपद्ये । **सद्योजाताय** ध्यानकाले अभिव्यक्ताय प्रल्हादादि भक्तानिष्टनिवर्तने सद्यः स्तंभादाविर्भूताय च **नमः नमः**[2] **वै** । **भवे भवे** प्रतिसृष्टौ **अतिभवे** अत्यंतं संसारे **मां न भवस्व** नोत्पादय । **भवोद्भवाय** भवस्य संसारस्य उद्भवः उत्पत्तिः यस्मात्तस्मै **नमः** ॥ १७ ॥

---

१ परस्मैपदव्यत्ययश्छांदसः ।

२ पुनः पुनर्वंदनमादरार्थं ।

अर्थ—[ ब्रम्हाची उपासना करण्यासाठीं पांच मंत्र सांगतो. त्यांपैकीं पहिला मंत्र सांगतो. ] ध्यान करते वेळेस प्रगट झालेल्या व सद्योजात इत्यादि नांवांच्या रुद्रांत असलेल्या परमात्म्याला मी शरण जातों. ध्यान करते वेळेस प्रगट झालेल्यास आणि प्रल्हाद इत्यादि भक्तांचें दुःख दूर करण्याकरितां लागलेंच खांबापासून प्रगट झालेल्यास नमस्कार नमस्कार. प्रत्येक सृष्टींत अत्यंत संसारांत मला उत्पन्न करूं नकोस. ज्याच्यापासून संसार उत्पन्न होतो त्याला नमस्कार ॥ १७ ॥

**वामदेवायनमोज्येष्ठायनमःश्रेष्ठायनमोरुद्रायनमःकालायनमःकलविकरणायनमोबलविकरणायनमोबलायनमोबलप्रमथनायनमःसर्वभूतदमनायनमोमनोन्मनायनमः॥१८॥**

**टीका**—द्वितीयमंत्रमाह ॥ वामदेवायेति ॥ **वामदेवाय** वामः[1] सुंदरः अभक्तमतीनोवासचासौदेवः क्रीडादिगुणविशिष्टः तस्मै **नमः** । **ज्येष्ठाय**[2] शिवपक्षे अग्रजाय भगवत्पक्षे ज्येष्ठाय आद्याय **नमः** । **श्रेष्ठाय** सर्वोत्तमाय **नमः** । **रुद्राय**[3] अंतकालेसर्वरोदयित्रे रुग्द्रावकाय रुद्रांतर्गताय वा तच्छब्दवाच्याय हरये **नमः** । **कालाय** बंधकाय सर्वसंहर्त्रे वा **नमः** । **कलविकरणाय** कलं वर्त्यं विकरोति नाशयति तस्मै **नमः** । **बलविकरणाय** बलं शारीरं विशेषेणकरोतीति यद्वा बलं शत्रुसैन्यं नाशयतीति तस्मै **नमः** । **बलाय** सर्वेषां बलप्रदात्रे **नमः** । **बलप्रमथनाय** बलस्य सर्वसैन्यस्य प्रकर्षेण मथनकर्त्रे **नमः** । **सर्वभूतदमनाय** सर्वप्राणिनिग्रहकर्त्रे **नमः** । **मनोन्मनाय** मनसाउत्कृष्टतया मननीयाय **नमः नमः** अस्मिन्मंत्रे भगवतः सुंदरत्वज्येष्ठत्वबंधमोचकत्वादयोमहामाहिमानोवर्णिताः ॥ १८ ॥

---

१ वामौवल्गुप्रतीपौद्वाविति कोशात् । तथाचसूत्रंब्रम्हद्दष्टिरुत्कर्षादिति ।

२ ब्रम्हणः प्रथमेकल्पेशिवः प्रथमजः स्मृत इति वचनात् ।

३ रुद्व्यक्तशब्द इति धातोः ।

**अर्थ**—[ दुसरा मंत्र सांगतो. ] सुंदर ( अथवा अभक्ताला प्रतिकूळ असून क्रीडा इत्यादि गुण असलेला ) अशा परमात्म्याला नमस्कार. ( शिवाच्यासंबंधानें अर्थ असा होतो कीं, जो प्रथम उत्पन्न झाला त्यास नमस्कार ). ( अथवा भगवंताच्यासंबंधानें अर्थ केला असतां असा होतो कीं, जो पहिल्यापासून आहे त्यास नस्कार ). जो सर्वोत्तम आहे त्यास नमस्कार. अंतकाळीं सर्वांना रडविणारा अथवा रोग दूर करणारा अथवा शंकराच्या आंत असलेला अशा शंकर नांवाच्या परमात्म्याला नमस्कार. बंधन करणारा अथवा सर्वांचा नाश करणारा अशा परमात्म्याला नमस्कार. संसारबंधनाचा नाश करणारा अशा परमात्म्याला नमस्कार. शरीरांतील बळ वाढविणारा ( अथवा शत्रूच्या सैन्याचा नाश करणारा अशा परमात्म्याला नमस्कार). सर्वांना बल देणारा अशा परमात्म्याला नमस्कार. शत्रूच्या सैन्याचा विशेषेंकरून नाश करणारा अशा परमात्म्याला नमस्कार. सर्व प्राण्यांना आपल्या आज्ञेंत ठेवणारा अशा परमात्म्याला नमस्कार. जो मनानें उत्कृष्ट रीतीनें विचार करण्यास योग्य आहे अशा परमात्याला नमस्कार, नमस्कार. ह्या मंत्रांत सुंदर असणें, सर्वांच्या अगोदर असणें, संसारबंधनांतून सोडविणें इत्यादि भगवंताचे मोठमोठाले महिमे वर्णिले आहेत ॥ १८ ॥

**अघोरेभ्योऽथघोरेभ्योघोरघोरतरेभ्यः । सर्वेभ्यःसर्वशर्वेभ्योनमस्तेअस्तुरुद्ररूपेभ्यः ॥ १९ ॥**

**टीका**—तृतीयमंत्रमाह ॥ अघोरेभ्यइति ॥ **अघोरेभ्यः** अभयंकरेभ्यः सोमस्कंदादिरूपेभ्यः **अथ घोरेभ्यः** भयंकरेभ्यः वीरभद्रादिरूपेभ्यः **घोरघोरतरेभ्यः** अत्यंतभयप्रदेभ्यः **सर्वेभ्यः** समस्तेभ्यः **सर्वशर्वेभ्यः** सर्वाभक्तसुखसंरोधकेभ्यः **रुद्ररूपेभ्यः** परमेश्वररूपेभ्यः नृसिंहादिरूपेभ्यः **ते नमः अस्तु** ॥ १९ ॥

**अर्थ**--[ तिसरा मंत्र सांगतो. ] चंद्र, कार्तिकस्वामी, इत्यादि भय न करणाऱ्या; वीरभद्र इत्यादि भय करणाऱ्या; अतिशय भय करणाऱ्या; अभक्ताच्या सुखाचा नाश करणाऱ्या; अशा नृसिंह इत्यादि परमेश्वराच्या रूपांना नमस्कार असो ॥ १९ ॥

**तत्पुरुषायविद्महेमहादेवायधीमहि । तन्नोरुद्रःप्रचोदयात् ॥ २० ॥ ईशानःसर्वविद्यानामीश्वरःसर्वभूतानांब्रम्हाधिपतिर्ब्रम्हणोऽधिपतिर्ब्रम्हाशिवोमेअस्तुसदाशिवोम् ॥२१॥**

**टीका**--चतुर्थमंत्रमाह ॥ तत्पुरुषायेति ॥ **तत्पुरुषाय**[1] तस्य पुरुषः[2] तत्पुरुषः तस्मै **विद्महे** जानीमः । **महादेवाय** महांश्चासौदेवश्च तस्मै **धीमहि** ध्यायेम । **तत्** तस्मिन् ध्याने **रुद्रः** रुद्रांतर्गतोहरिः **नः** अस्माकं मनः **प्रचोदयात्** प्रेरयतु ॥ २० ॥ पंचममंत्रमाह ॥ ईशानइति ॥ **सर्वविद्यानां** समस्तविद्यानां **ईशानः** स्वामी **सर्वभूतानां** सर्वप्रमथगणानां समस्तप्राणिनां च **ईश्वरः** अधिपतिः **ब्रम्हाधिपतिः** ब्रम्हा चतुर्मुखः अधिपतिः स्वामी यस्यसः **ब्रम्हणः** वेदस्य तपसो वा **अधिपतिः ब्रम्हा** स्वोचितज्ञानादिगुणपूर्णः परमेश्वरः **शिवः** मंगलप्रदः **मे अस्तु** हे **सदाशिव ॐ** मया प्रार्थितमंगीकुरु । यद्वा परमात्मपक्षे **ब्रम्हाधिपतिः** ब्रम्हाचासौ अधिपतिश्च पूर्णस्वामी **ब्रम्हणः** चतुर्मुखस्य **अधिपतिः** स्वामी **ब्रम्हा** देशकालगुणापरिछिन्नः **शिवः** सुखात्मकः **सदाशिवः** सदामंगलप्रदः मे अस्तु ॥ २१ ॥

**अर्थ**--[ चवथा मंत्र सांगतो. ] त्या परमात्म्याला आम्ही जाणतों. मोठ्या देवाचें आम्ही ध्यान करितों. असें ध्यान केलें असतां शंकराच्या आंत असलेला हरी आमच्या मनाला प्रेरणा करो ॥ २० ॥ [ पांचवा मंत्र सांगतो. ] सर्व विद्यांचा स्वामी, सर्व प्रमथगणांचा व सर्व प्राण्यांचा

---

१ द्वितीयार्थेचतुर्थी ।

२ पुरुंधासूतइतिपुरुषः ।

धनी, ज्याचा धनी ब्रम्हदेव आहे, वेदांचा अथवा तपाचा धनी, आपणास योग्य अशा ज्ञान इत्यादि गुणांनीं पूर्ण, असा परमेश्वर मला मंगलकारक होवो. हे परमेश्वरा, माझ्या प्रार्थनेचा अंगिकार कर. ( अथवा परमात्म्याच्यासंबंधानें असा अर्थ होतो कीं, गुणपूर्ण असा धनी, ब्रम्हदेवाचा धनी, देश, काल व गुण ह्यांनीं अमर्यादित, सुखरूप असा परमेश्वर मला नेहेमीं मंगलकारक होवो ) ॥ २१ ॥

**नमोहिरण्यबाहवेहिरण्यवर्णायहिरण्यरूपाय हिरण्यपतयेंऽबिकापतय उमापतये पशुपतये नमोनमः ॥ २२ ॥**

**टीका**—नमोहिरण्यबाहव इति पंचमंत्राः रुद्रांतर्गतभगवत्पराः तत्राद्यो-मंत्रः ॥ नम इति ॥ **हिरण्यबाहवे** हिरण्यालंकृतबाहवे द्रविणप्रदाय वा **हिरण्यवर्णाय** सुवर्णवर्णाय **हिरण्यरूपाय**[1] सुवर्णाकृतये **हिरण्यपतये** वित्तस्वामिने **अंबिकापतये**[2] पार्वतीपतये जगन्मातृलक्ष्मीपतये च **उमापतये** उत्कृष्टज्ञानिपतये **पशुपतये**[3] द्विपाच्चतुष्पात्स्वामिने तदंतर्गताय परमात्मने **नमः नमः** अस्तु ॥ २२ ॥

**अर्थ**—सोन्याच्या डागिन्यांनीं ज्याचे बाहू सुशोभित आहेत ( अथवा सोनें देणारा ), सोन्याप्रमाणें ज्याचा रंग आहे, सोन्याप्रमाणें ज्याची आकृति उत्तम आहे, द्रव्यांचा स्वामी, जो पार्वतीचा पति ( अथवा जगताची माता जी महालक्ष्मी तिचा पति आहे ), उत्तम ज्ञानिलोकांचा स्वामी, दोन पायांचे व चार पायांचे अशा प्राण्यांचा नियामक, अशा रुद्राला ( अथवा रुद्राच्या अंतर्यामी असलेल्या परमात्म्याला ) माझे नमस्कार असोत ॥ २२ ॥

---

१ तथाच श्रुतिः आप्रणखात्सर्वएवसुवर्णइति । रूपमाकारेप्याकृतिस्त्रियामितिशब्दानुशासनं ।

२ मृडानीचंडिकांबिकेतिशब्दानुशासनं ।

३ एतावंतोवैपशवोद्विपाच्चतुष्पादश्चेति पशुपतिः पशूनांचतुष्पदामुतचाद्विपदामितिच श्रुतिः ।

**ऋतꣳ सत्यंपरंब्रह्मपुरुषंकृष्णपिंगलं । ऊर्ध्वरेतंविरूपाक्षं विश्वरूपायवैनमोनमः ॥ २३ ॥**

**टीका—ऋतं** यथार्थज्ञानरूपं **सत्यं** सद्भावप्रापकं **परं** सर्वोत्तमं **ब्रम्ह** गुणपूर्णं **पुरुषं** पुरुषगतं **कृष्णपिंगलं** उभयरूपं मिश्ररूपं वा **ऊर्ध्वरेतसं** कपिलव्यासादिरूपेषु ऊर्ध्वरेतस्त्वात् **विरूपाक्षं**[1] नृसिंहादिरूपेषु विषमनेत्रत्वात्तथा भूतं पूर्वोक्तगुणविशिष्टाय **विश्वरूपाय**[2] अनेकरूपाय एतादृशाय परमात्मने **नमः नमः वै**[3] खलु ॥ २३ ॥

**अर्थ—**यथार्थज्ञानरूपी, सत्यपदार्थांना सत्यपणा देणारा, सर्वांमध्यें उत्तम, गुणपूर्ण, प्रत्येक पुरुषामध्यें अंतर्यामीरूपानें नियमन करणारा, काळा व पिंगट अशा दोन वर्णांचा ( अथवा मिश्र रंगाचा ), कपिल, व्यास इत्यादि रूपानें ब्रम्हचर्य व्रत धारण करणारा, नृसिंहादि अवतारांमध्यें तीन डोळे इत्यादि विलक्षणरूपें धारण करणारा, अशा गुणांच्या अनेक रूपें ग्रहण करणाऱ्या परमात्म्याला आमचे नमस्कार असोत ॥२३॥

**सर्वोवैरुद्रस्तस्मैरुद्रायनमोअस्तु । पुरुषोवैरुद्रः सन्महोनमोनमः ।**

**टीका—सर्वः** सर्वशब्दवाच्यः परमात्मा **रुद्रः वै** रुक्द्रावणात् रुद्रशब्दवाच्यः **तस्मै** अथवा रुद्रांतर्यामी तस्मै **रुद्राय** रुद्रांतर्गताय परमात्मने **नमः** नमस्कारः **अस्तु** । **पुरुषः** पुरुषसूक्तप्रतिपाद्यः **रुद्रः** रुक्द्रावणात् रुद्रशब्दवाच्यः परमात्मा **वै सन्महः** समीचीनोत्सवतेजोरूपः तस्मै **नमः नमः** ।

---

१ व्यायेनृसिंहमुरुवक्त्रावित्रिनेत्रमित्युक्तेः ।

२ विश्वरूपंकरिणंजातवेदसंइतिश्रुत्यंतरात् ।

३ शिवरूपीशिवेस्थितइतिप्रसिद्धिंद्योतयतिवैशब्देन ।

**अर्थ**—सर्व शब्दांनीं वर्णन करण्याजोगा परमात्मा रोगास दूर करतो म्हणून तो रुद्र शब्दानें वाच्य आहे, त्याला ( अथवा प्रसिद्ध रुद्राच्या अंतर्यामी असलेल्या परमात्म्याला ) आमचा नमस्कार असो. पुरुषसूक्तानें सांगितलेला परमात्मा रुद्र शब्दानें वाच्य आहे, कारण तो रोग दूर करतो. परमात्मा मोठा उत्सव तेजोरूपी आहे, त्याला नमस्कार असोत.

**विश्वंभूतंभुवनंचित्रंबहुधाजातंजायमानंचयत्। सर्वोह्येषरुद्रस्तस्मैरुद्रायनमोअस्तु ॥ २४ ॥**

**टीका**—सर्वइतिसामान्योक्तिंविशदयति ॥ विश्वमिति ॥ **भूतं** पूर्वकालेजातं **विश्वं** सर्वं **भुवनं** जगत् **चित्रं** अनेकविधं **बहुधा जातं** इदानीं बहुप्रकारेणोत्पन्नं सुरनरतिर्यगादिलक्षणं **जायमानं** जनिष्यमाणं च **एषः** प्रसिद्धः **रुद्रः सर्वः** सर्वांतर्यामी **तस्मै रुद्राय** अथवा रुद्रांतर्यामिणे परमात्मने **नमः अस्तु** । अनेन भूतभविष्यद्वर्त्तमानजगतिस्थित्वाप्रेरकत्वंहरस्योक्तं ॥ २४ ॥

**अर्थ**—[ पूर्वीं सर्व असें जें साधारणपणें सांगितलें तें स्पष्ट करून सांगतो. ] पूर्वीं झालेलें सर्व जगत् नानाप्रकारचें आहे. हल्लीं उत्पन्न होत असलेलें देव, मनुष्य, पक्षी इत्यादि विचित्र प्रकारांनीं होत असलेलें व या. पुढें नानाप्रकारचें उत्पन्न होणारें जगत हा प्रसिद्ध शंकर आहे. अशा शंकराला ( अथवा त्याच्या अंतर्यामी असलेल्या परमात्म्याला ) नमस्कार असो. ह्यावरून भूत भविष्य व वर्त्तमान जगांत राहून परमेश्वर प्रेरणा करितो असें सांगितलें ॥ २४ ॥

**कद्रुद्रायप्रचेतसेमीढुष्टमायतव्यसे। वोचेमशंतमꣳहृदे। सर्वोह्येषरुद्रस्तस्मैरुद्रायनमोअस्तु ॥ २५ ॥**

**टीका**—**कद्रुद्राय**[१] प्रशस्ताय रुद्राय तदंतर्यामिणे परमात्मने वा **प्रचेतसे**

१ कत्थश्लाघायामितिधातोरुत्पन्नःकत्शब्दः प्रशस्तवाची।

प्रकृष्टंज्ञानयुक्ताय **मीढुष्टमाय** भक्ताभीष्टसेककृत्तमाय **तव्यसे**[1] अभिवृद्धाय **हृदे** हृदयवासिने **शंतमं** अतिशयेन सुखकरं स्तुत्यादिरूपं वचनं **वोचेम** वदाम । **सर्वः** विश्वप्रपंचः **एषः रुद्रः हि तस्मै रुद्राय नमः अस्तु**॥२५॥

**अर्थ**—अतिशय ज्ञान असलेला, भक्ताची इच्छा पूर्ण करणारा, आसमंतात् व्यापक, हृदयांत राहणारा, अशा विशाळ रुद्राला ( अथवा त्यांत असलेल्या परमात्म्याला ) अतिशय सुखकारक स्तुतिपर वचन आम्ही बोलतों. हें सर्व जगत रुद्रच आहे. त्या रुद्राला नमस्कार असो ॥ २५ ॥

**यस्यवैकंकत्यग्निहोत्रहवणीभवतिप्रत्येवास्याहुतयस्ति-ष्ठंत्यथोप्रतिष्ठित्यै ॥ २६ ॥**

**टीका—यस्य** रुद्रांतर्गतपरमात्मोपासकस्य **अग्निहोत्रहवणी** अग्निहोत्रहोमपात्रविशेषरूपा **वैकंकती** विकंकताख्यवृक्षविशेषनिर्मिता **भवति** । **अस्य प्रति च आहुतयः तिष्ठंति** यजमानसंगताः भवंति । **अथो** अनंतरं **अस्य प्रतिष्ठित्यै** प्रतिष्ठार्थं आहुतयः **तिष्ठंति** भवंति ॥ २६ ॥

**अर्थ**—रुद्राच्या अंतर्यामी असलेल्या परमात्म्याची उपासना करणाऱ्याचें अग्निहोत्रामध्यें आहुति टाकण्याचें पात्र विकंकत नांवाच्या झाडाच्या लांकडाचें केलेलें असतें. त्या पात्रांत आहुति घालून हवन केलें असतां त्यापासून होणारें सर्व फल यजमानास मिळतें. नंतर त्या आहुतींच्या योगानें यजमानाची प्रतिष्ठा होते ॥ २६ ॥

**कृणुष्वपाज इति पंच ॥ २७ ॥**

**टीका—कृणुष्वपाजः इति** कृणुष्वपाजइत्याद्याः **पंच** ऋचः[2] यजमानेन जप्याः ॥ २७॥

**अर्थ**—कृणुष्वपाज इत्यादि पांच ऋचा उपासना करणाऱ्यानें जपाव्यात. त्या पांच ऋचांपैकीं कृणुष्वपाज ही पहिली ऋचा आहे ॥ २७ ॥

---

१ तुइतिसौत्रोधातुर्वृध्यर्थइतिभट्टभास्करोक्तेः ।

२ तत्रकृणुष्वपाजइतिप्रथमऋक् ।

**कृणुष्वपाजःप्रसितिंनपृथ्वींयाहिराजेवामवाँइभेन । तृष्वीमनु-प्रसितिंद्रूणानोस्तासिविध्यरक्षसस्तपिष्ठैः ॥ १ ॥**

**टीका**—हे आद्य परमात्मन् प्रसितिं बंधिनीं पृथ्वीं न इव पाजः बलं मह्यं **कृणुष्व** कुरुष्व । **इभेन** हस्तिना उपलक्षितः **आमवान्** आयुधवान् **राजा इव** त्वं **तृष्वीं** शीघ्रमागच्छंती **प्रसितिं** शत्रुसेनां **अनु द्रूणानः** क्रमेण हिंसन् त्वं **याहि** । **तपिष्ठैः** तपनशीलैः आयुधैः **रक्षसः** राक्षसान् **विध्य** ताडय । हि यस्मात् **अस्तासि** शत्रूणां निरसनशीलः असि । अतः कारणात् ज्ञानप्रतिबंधकीभूतान् राक्षसान् ताडय ॥ १ ॥

**अर्थ**—हे देवा, घट्ट बांधून ठेवलेल्या पृथ्वीप्रमाणें मला बळ दे. ज्याच्याबरोबर हत्ती आहे अशा हत्यारबंद राजाप्रमाणें शत्रूच्या लवकर येणाऱ्या फौजेचा क्रमानें नाश करीत करीत तूं ये. त्रास देणाऱ्या हत्यारांनीं राक्षसांना मार. कारण तूं शत्रूंचा नाश करणारा आहेस. म्हणून ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या राक्षसांना तूं मार ॥ १ ॥

**तवभ्रमासआशुयापतंत्यनुस्पृशधृषताशोशुचानः । तपूंष्यग्नेजुह्वापतंगानसंदितोविसृजविष्वगुल्काः ॥ २ ॥**

**टीका**—हे **अग्ने** अग्न्यंतर्गतपरमात्मन् **तव भ्रमासः** भ्रमणशीलाः विस्फुलिंगाइति **आशुया** आशु **पतंति** निष्पतंति । **धृषता** धृष्टतया **शोशुचानः** भृशं दीप्यमानाः त्वं तैः विस्फुलिंगैः **अनुस्पृश** अनुदह । हे अग्ने भगवन् **असंदितः** अखंडितः त्वं **तपूंषि** औष्ण्योपलक्षणतापान् पतंगान् पतनशीलान् उल्काः स्फुलिंगान् जुह्वा हूयंते अस्यामाहुतयइति जुहूर्ज्वाला तया **विष्वक्** इतस्ततः **विसृज** विसारय ॥ २ ॥

**अर्थ**—हे अग्नीच्या आंत असलेल्या देवा, तुझ्या उडणाऱ्या ठिणग्या लवकर पडतात. ठिणग्यांच्या घर्षणानें अतिशय प्रकाशमान होऊन त्या ठिणग्यांनीं तूं मला तप्त ठेव. हे भगवंता, अखंडित असा तूं उष्णतेनें तापलेल्या व हलणाऱ्या अशा ठिणग्या ज्वालेनें चोहोंकडे पसर ॥ २ ॥

**प्रतिस्पृशोविसृजतूर्णितमोभवापायुर्विशोअस्याअदब्धः । योनोदूरेअघशंसोयोअंत्यग्नेमाकिष्टेव्यथिरादधर्षीत् ॥ ३ ॥**

**टीका**—हे **अग्ने** अग्निशब्दितभगवन् **नः** अस्माकं **यः दूरे अंति** अंतिके च **अघशंसः** पापकीर्तनः **तं प्रतिस्पृशः** पाशैर्बधान । **तूर्णितमः** त्वरिततमः सन् तं **अघशंसं** प्रति आयुधानि **विसृज** । किंच **अस्य** अस्मदीयाः **विशः** प्रजाः **पायुः** पालकः **अदब्धः** केनाप्यप्रतिहतो भव । किंच **मा** मां **किः** कश्चिदपि **ते** त्वां **आदधर्षीत्** आधर्षयितुं **व्यथिः** व्यथयिताच माभूत् इति ॥ ३ ॥

**अर्थ**—हे अग्निनामक परमात्म्या, आमचे जवळ व दूर असून जो आमचे दोषाचें वर्णन करितो त्याला तूं पाशांनीं बांध. जलदी करून त्याच्यावर शस्त्रें टाक. आणखी तूं आमच्या प्रजांचें निर्विघ्नपणानें रक्षण करणारा हो. आणखी मला व तुला मारण्याकरितां कोणीही व्यथा करणारा न होवो ॥ ३ ॥

**उदग्नेतिष्ठप्रत्यातनुष्वन्य १ मित्रांओषतात्तिग्महेते । योनोअरातिंसमिधानचक्रेनीचातंधक्ष्यतसन्नशुष्कं ॥ ४ ॥**

**टीका**—हे **अग्ने** अग्न्यंतर्यामिपरमात्मन् **उत्तिष्ठ**[1] । उत्थानानंतरं **प्रत्यातनुष्व** शत्रून् प्रत्यात्तेजा भव । हे **तिग्महेते** तीक्ष्णायुध **अमित्रान्** अस्मच्छत्रून् त्वज्ञानप्रतिबंधकीभूतान् **न्योषतात्**[2] नितरां दह । हे **समिधान** सम्यक् दीप्यमान **यः नः** अस्माकं **अरातिं** अदानं न किंचिदपि ददाति । **तं नीचा** नीचं न्यग्भूतं **शुष्कं अतसन्** काष्ठमिव **धक्षि** दह ॥ ४ ॥

**अर्थ**—हे अग्नीच्या आंत असलेल्या देवा, ऊठ. उठून शत्रूचें तेज हरण करणारा हो. ज्याचीं शस्त्रें तीक्ष्ण आहेत अशा परमात्म्या, आमच्या ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या शत्रूंना अगदीं जाळून टाक. हे उत्तम प्रकारें प्रकाशणाऱ्या परमात्म्या, जो आम्हाला कांहीं देत नाहीं अशा नीच प्राण्याला वाळलेल्या लांकडाप्रमाणें जाळून टाक ॥ ४ ॥

**ऊर्ध्वोभवप्रतिविध्याध्यस्मदाविष्कृणुष्वदैव्यान्यग्ने । अवस्थिरातनुहियातुजूनांजामिमजामिंप्रमृणीहिशत्रून् ॥ ५ ॥**

**टीका**—हे **अग्ने** भगवन् त्वं **ऊर्ध्वः** सर्वोत्तमः **अध्यस्मत्** अस्मन्निमित्तं **प्रतिविध्य** प्रतियोद्धा भव । तदर्थं **दैव्यानि** देवसंबंधीनिवीर्याणि **आविष्कृणुष्व** हे अग्ने **यातुजूनां** यातुधानानां **स्थिरा** स्थिराणि वीर्याणि **अवतनुहि** शिथिलीकुरु । ततः शिथिलीकृत्य **जामिं** पुनरुक्तं **अजामिं** अपुनरुक्तं च **शत्रून् प्रमृणीहि** मारय अथवा **जामिं** स्वसंबंधिनं **अजामिं** असंबंधिनं च शत्रुं हत्वा मां रक्ष ॥ ५ ॥

**अर्थ**—हे भगवंता, सर्वोत्तम असा तूं आमच्याकरितां ( आमच्या शत्रूंबरोबर ) युद्ध कर. त्याकरितां तुझें दैविकबळ प्रकट कर. आणखी राक्षसांचें बळ कमी कर. त्यांचें बळ कमी करून मीं सांगितलेले व न सांगितलेले अशा सर्व शत्रूंना मार ( अथवा माझ्याशीं संबंध असलेला व संबंध नसलेला अशा शत्रूस मारून माझें रक्षण कर ) ॥ ५ ॥

---

१ उदित्यस्यतिष्ठेत्यनेनसंबंधः ।

२ नीत्यस्यओषतादित्यनेनसंबंधः ।

सर्वदर्शनसंग्रह( चार्वाकदर्शनम् ).... .... ....०८ ०१

योगसूत्र ( समाधिपाद, साधनपाद, विभूतिपाद, व कैवल्यपाद ) } प्रत्येकास.. ०१२ ०१

ब्रह्मसूत्र ( अध्याय १ ला ) .... .... ..१ ०८ ०२

ब्रह्मसूत्र ( अध्याय २ ) .... .... ....तयार होत आहे.

ब्रह्मसूत्र ( अध्याय ४ ) .... .... .... छापत आहे.

गीता .... .... .... .... .... तरजुमा चालला आहे.

वेदान्तसार. .... .... .... .... .१ ०८ ०२

अपरोक्षानुभूति .... .... .... .... तरजुमा होत आहे.

## वैद्यशास्त्र.

रा० रा० व्यंकटराव रामचंद्र ह्यांनीं केलेले ग्रंथ.

**नाडीप्रकरण.**—भाग १. हृदय-रक्त-रक्त शरीरांत फिरणें-नाडी .... .... .... ....तयार होत आहे.

भाग २ नाडीप्रबोध ( संस्कृत टीका व मराठींत अर्थ ) तयार .....होत आहे.

भाग ३ नाडीप्रकाश( संस्कृत टीका व मराठींत अर्थ ) छापत ...... आहे.

भाग ४ नाडीविज्ञान ( संस्कृत टीका व मराठींत अर्थ ) तयार ......होत आहे.

**प्रसूतिविद्या.**—इंग्लिश व संस्कृत ग्रंथांच्या आधारांवरून ..तयार होत आहे.

## कायद्यासंबंधी ग्रंथ,

## मराठी भाषेंत.

**मुसलमानी कायदा.**—ह्मणजे, दायभाग व करार, ह्यांत सुनी व शिया ह्या दोन्ही पंथांचीं मतें सांगितलीं आहेत, व हिंदुस्थानांतील वरिष्ठ कोर्टांनीं व प्रिव्हिकाउन्सिलानें ह्या कायद्यासंबंधी केलेल्या,

निवाड्यांच्या सारांशाची जंत्री, व्यंकटराव रामचंद्र ह्यांनीं केलेला, आवृत्ति ३ री, किंमत ६ रुपये शिवाय टपालखर्च ०८.

**हिंदुधर्मशास्त्र**—ह्मणजे, ब्रिटिश सरकारच्या कोर्टांत न्याय करण्यास उपयोगी पडणारी धर्मशास्त्रासंबंधी माहिती, वरिष्ठ कोर्टांच्या निवाड्यांबाबद टिपा व हवाले ह्यांसुद्धां, व्यंकटराव रामचंद्र ह्यांनीं केलें आहे; त्यापैकीं,

दत्तकप्रकरण.... .... .... .... .... ..छापत आहे.

**कायद्यासंबंधी नियम.**—खंड १. हा ग्रंथ ब्रूम साहेबानें इंग्रजींत केलेल्या ग्रंथाच्या आधारावरून व्यंकटराव रामचंद्र यांणीं मराठींत तयार केलेला, पूर्वीची किंमत रुपये ४ होती, ती हल्लीं रुपये २ केली आहे.

**मुंबई हायकोर्टाचे वटहुकूम.**—फौजदारी, इंग्लिश सरकारचे कामाकरितां घेतल्यास किंमत रुपये १०१४, इतरांस किंमत रुपये २०६, शिवाय टपालखर्च ०२.

**मुंबई हायकोर्टाचे वटहुकूम.**—दिवाणी, इंग्लिश सरकारचे कामाकरितां घेतल्यास किंमत रुपये४०२, इतरांस किंमत रुपये ४०११. शिवाय टपालखर्च वगैरे खर्च ०७.

**नोंदण्याचा कायदा.**—ह्मणजे, सन १८७७ चा आक्ट ३ ह्याजवर समजुतीच्या व वरिष्ट कोर्टांच्या निवाड्यांच्या टिपां सुद्धां, सन १८७७ रांत छापिलेली आवृत्ति, किंमत १॥ रुपया होती ती हल्लीं ०१२ आणे केली आहे. ट० ख० ०८.

## सर्वोत्तम औषधें.

### व्यंकटराव रामचंद्र ह्यांनीं तयार केलेलीं.

| | |
|---|---|
| सूतशेखर ( पित्त वगैरेवर ) तोळा.... .... .... | रुपये १९. |
| प्रवाळ ( प्रमेह, शक्ति वगैरे ) तोळा .... .... .... | २ |
| आनंदभैरव ( ज्वर वगैरे ) तोळा .. .... .... .... | २ |
| अग्निकुमार ( अग्निमांद्य, शैत्य वगैरे ) तोळा .... .... | २ |

खदिरसाराच्या गोळ्या ( खोकल्यावर ) तोळा .... .... १
नारायणतेल ( सर्व वायूंवर ) पांच तोळ्यास........ .... १
लाक्षातेल ( कित्ता ) नऊ तोळ्यांस........ .... .... १
बदामपाक ( पौष्टिक ) एक शेरास........ .... .... ५
कोहोळ्याचा पाक ( सदर ) एक शेरास... .... .... ४
हिंगाष्टक ( पाचक ) तोळा .... .... .... .... ०४
रक्तपितीवर औषध ( रोगी समक्ष भेटला पाहिजे ) रुपये २५०
इच्छाभेदीरस ( इच्छेप्रमाणें जुलाब होण्यास ) १२ गोळ्यांस १
सुवर्णमालिनीवसंत ( जीर्णज्वर, क्षय, इ. ) दर तोळ्यास... १५
अश्विनीकुमार ( सर्व रोगांवर ) दर तोळ्यास.. .... .... ४
केस निवण्याचें औषध दर तोळा.... .... .... .... ०४
परम्याचें व चट्टयाचें औषध ( रोगी समक्ष भेटला पाहिजे )
अर्धशिशीचें औषध... ( कित्ता. ).... .... .... ....
विंचवाचें औषध.... ( कित्ता. ).... .... .... ....
दिनेशभैरव ( अतिसारावर ) .... .... ....दर तोळ्यास ३.
वातारी ( वायूवर ) .... .... .... ....दर तोळ्यास ३.

## ☞ सावधगिरीच्या सूचना.

१. सदरीं लिहिलेल्या हरएक बुकाच्या टैटल पेजवर ग्रंथकर्त्याच्या नांवाचा शिक्का मारून विकण्याची वहिवाट आहे. सबब शिक्का नसल्यास पिनलकोडचें कलम ४११ अन्वयें बुक चोरीचें आहे, असें समजलें जाईल.

२. ज्यांस सदरीं लिहिल्या पैकीं बुक किंवा औषध पाहिजे असेल त्यांनीं ग्रंथकर्त्याच्या नांवानें " पुणें, पेंठ शुक्रवार घर नंबर ६९६ येथें देणें " असा पत्ता लिहून पाठवावें. उत्तर मागविणें असल्यास ट. ख. पाठवावा.

सोमवार तारीख १ माहे जुलाई सन १८९५.

(PLEASE CIRCULATE THIS AMONG YOUR FRIENDS AND OTHERS.

*BY THE SAME AUTHOR*

## COMMENTARIES

ON THE

# SPECIFIC RELIEF ACT, 1877.

Containing ample Annotations founded on eminent English and American works on Equity Jurisprudence and on the English Law Reports; together with notes from the Indian Decisions, and with Table of Cases and copious Index by Venkatrao Ramchandra. Covers a little soiled. Price (reduced) Rs. 5, postage 8 As.

"Mr. Venkatrao Ramchandra in his "Commentaries on the Specific Relief Act" has brought out a most useful book, and one to which we are glad to accord considerable praise. He has taken each section of the Act separately, and after an exhaustive note upon each, in which he refers to the various English cases in support of his text, he collects the decisions of the Courts in India which refer to the subject-matter with which he is dealing under a separate heading. This arrangement is clear and of the greatest assistance to those who most refer to his work. We would refer specially to the author's notes upon the sections which deal with the subject of *mandamus* and injunctions. With regard to each of these matters, we are happy to observe that he has not omitted to refer to the corresponding section of the Judicature Act in England. Similarly, he introduces into his work the sections of the Civil Procedure Code which relate to temporary injunctions. And to render the book as complete as possible, we find in it the rules which have been published by the Judges of Calcutta and Bombay under the Act (section 51). A complete table of the cases referred to, as also a complete and trustworthy index to the contents at the end of the book, make the volume as useful a publication as possible to every legal practitioner."—*The Times of India.*

---

## THE INDIAN STAMP ACT, 1879.

With Explanatory and Critical Notes, and notes from the Decisions of the Superior Courts in England and India. Price Rs. 3, now reduced to Rs. 1-8, postage 4 As.

---

## THE PENSIONS' ACT, 1871.

With Explanatory and Critical Notes, and notes from the decisions of the Superior Courts in India and England. Price Rupee 1, now reduced to 8 As. and postage 2 As.

---

## ELEMENTARY MECHANICS.

For the use of students preparing for the Matriculation Examination of the Bombay University, with numerous examples

and their solutions, and with the past examination papers and hints for their solution. Seventh Edition. Price Rupee 1, now reduced to 8 Annas and postage 1 Anna.

---

## THE BOMBAY HEREDITARY OFFICES ACT,

BEING

### BOMBAY ACT III OF 1874.

Together with the Amending Act (Bombay Act V of 1886) and the Matadars Act (Bombay Act VI of 1887), with copious explanatory and critical notes and notes from the decisions of the High Court of Bombay, and with full Index. Price Rs. 3 and postage As. 4.

---

## THE MAMLATDARS' COURTS ACT.

Being Bombay Act No. III of 1876, with explanatory and critical notes, and notes from the decisions of the High Court of Bombay, 3rd. Ed. (1894.) Price 1½ Rupee and postage 2 As.

---

☞ For copies of the above-mentioned books apply to Mr. Venkatrao Ramchandra at Poona, Peth Shukrawar, House No. 596. Books can be sent only by value payable post. A postags stamp should be sent if any answer is required.

1*st July*, 1895.

---

# उपनिषत्संग्रह.



## नारायणोपनिषत्.

भाग २ रा.

किंमत १॥ रुपया.



# उपनिषत्संग्रहः

---

## नारायणोपनिषत्

---

टीका प्राकृतार्थ सहिता

अस्य ग्रंथस्य द्वितीयभागः

शमदमादिसंपत्तिमतामधिकारिणां परब्रम्हज्ञानावाप्त्यर्थं

रामचंद्रसूनुव्यंकटेशशर्मणा संस्कृतः

पुण्याख्यपत्तनें

शुक्रवारवीथ्यायां ज्ञानप्रकाशमुद्रणालये मुद्रितः

शकाब्दाः १८२१

---



---

मौल्यं सार्धरूपकं

# उपनिषत्संग्रह.

## नारायणोपनिषत्.

संस्कृत टीका व मराठी अर्थ व समजुतीच्या

टिपा ह्यांसहित.

ह्या ग्रंथाचा दुसरा भाग

शांति, इंद्रियनिग्रह, वैराग्य इत्यादिगुणांनीं संपन्न अशा अधिकारी

जनांस परमेश्वराचें ज्ञान मिळण्याकरितां

**व्यंकटराव रामचंद्र**




ह्यांनीं तयार केला तो

पुणें, शुक्रवार पेठ येथें

'ज्ञानप्रकाश' छापखान्यांत छापिला.

शके १८२१



किंमत १॥ रुपया.

# उपोद्घात.

( मागील उपोद्घात पुढें चालू. )

मागील उपोद्घातांत असें सिद्ध केलें आहे कीं, वेदाला प्रामाण्य आहे, म्हणजे कांहीं एक गोष्ट सिद्ध करण्याला वेदाचें प्रमाण मिळालें असतां पुरें आहे. स्मृति व पुराणें हीं वेदाला अनुसरून आहेत. ह्मणून कांहीं एक गोष्ट सिद्ध करण्याला स्मृति व पुराण ह्यांचेंही प्रमाण मिळालें असतां पुरें आहे. मनुष्य, जग व ईश्वर ह्यांच्या संबंधानें वेदावरून ज्या गोष्टी सिद्ध होतात त्यांपैकीं कांहीं महत्वाच्या गोष्टी खालीं दिल्या आहेत.

**१. विद्या दोन प्रकारची आहे, ( १ ) परमेश्वराला जाणण्याची विद्या, व ( २ ) दुसऱ्या विषयांची विद्या.** ह्याविषयीं प्रमाण.

तस्मै सहोवाच । द्वेविद्ये वेदितव्य इति हस्म यद्ब्रह्मविदो वदंति पराचैवापराच ॥ ४ ॥ तत्रापराऋग्वेदोयजुर्वेदसामवेदोऽथर्ववेदः शिक्षाकल्पो व्याकरणं निरुक्तं छंदो ज्योतिषमिति अथ परायया तदक्षरमधिगम्यते[1] ॥ ५ ॥

( म्हणजे शौनक ऋषीला अंगिराऋषि असें बोलले कीं, ब्रह्मज्ञानी असें म्हणतात कीं, विद्या दोन प्रकारची आहे. १ श्रेष्ठ व २ कनिष्ठ ॥४॥ त्यांमध्यें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, वर्णांचें स्थान व प्रयत्न सांगणारें शास्त्र, कर्म सांगणारे ग्रंथ, व्याकरण, शब्दांचा कोश, कवितांचें वृत्त सांगणारे ग्रंथ, आणि ज्योतिःशास्त्र, ही कनिष्ठ विद्या आहे. ज्या विद्येनें परमेश्वराचें ज्ञान होतें ती श्रेष्ठ विद्या आहे ॥ ५ ॥ )

---

१ मुंडकोपनिषत् मुंड० १.

**२. ब्रह्मज्ञान मिळविण्याला मनुष्यांमध्यें शांति, इंद्रियनिग्रह, वैराग्य, इत्यादि गुण असले पाहिजेत.** ह्याविषयीं प्रमाण.

शांतो दांतो उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वा
ऽऽत्मन्येवात्मानं पश्येत् ।

( ह्मणजे शांत, इंद्रियनिग्रह करणारा, वैराग्यसंपन्न, सुखदुःख सहन करणारा, स्थिर चित्ताचा असा होऊन आपल्या शरीरांत असलेल्या परमात्म्याला पहावें. )

परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायात् ।
नास्त्यकृतः कृतेन । तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्
समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं[1] ॥ १२ ॥

( म्हणजे कर्मानें प्राप्त होणारें लोक पाहून ब्राह्मणानें विरक्त व्हावें. कर्मानें मोक्ष मिळत नाहीं, म्हणून त्यानें ज्ञान मिळविण्यास हातांत समिधा घेऊन, छंदाचें अध्ययन केलेला व भगवद्भक्त अशा गुरूकडे जावें. )

तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशांतचित्ताय
शमान्विताय । येनाक्षरं पुरुषं वेदसत्यं प्रोवाच
तां तत्वतो ब्रह्मविद्यां[1] ॥ १३ ॥

( म्हणजे जवळ आलेला, विरक्त झालेला, व भगवंताचे ठिकाणीं निष्ठा असलेला अशा शौनक ऋषीला, त्या विद्वान् अंगिराऋषीनें ज्या विद्येच्या योगानें सकलगुणपूर्ण व नाशरहित व स्वतंत्र अशा परमेश्वराला जाणिलें ती ब्रह्मविद्या योग्य प्रकारें सांगितली. )

तेन त्यक्तेन भुंजीथामा गृधः कस्यस्विद्धनं
कुर्वन्ने वेह कर्माणि जिजीविषेच्छतꣳ समाः

---

१ मुंडकोपनिषत् मुं० १. २. ईशोपनिषत्.

( म्हणजे परमेश्वरानें दिलेल्या द्रव्यानें उपभोग घे. कोणापासून द्रव्याची इच्छा करूं नको. ह्या मनुष्यजन्मांत भगवंताची पूजा इत्यादि कर्मे करून शंभर वर्षे वांचण्याची इच्छा करावी. )

पराञ्चि खानि व्यतृणात् स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नांतरात्मन् ।
कश्चिद्धीरः प्रत्यगात्मान मैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन्[१] ॥

( म्हणजे इंद्रियें ब्रह्माला पराङ्मुख आहेत, म्हणून भगवान् [ किंवा ब्रह्मदेव ] त्यांना तुच्छित करतो. ह्यास्तव जीव बाहेरील विषय पाहतो आणि आपल्या अंतर्यामीं पाहत नाहीं. ज्ञानी मनुष्य मुक्तीची इच्छा करून विषयापासून डोळे इत्यादि इंद्रियें आंवरून आपल्या अंतर्यामीं असलेल्या परमेश्वरास पाहतो. )

यदा पंचावतिष्ठंते ज्ञानानि मनसा सह ।
बुद्धिश्च न विचेष्टते तामाहुः परमां गतिं[२] ॥ १० ॥

( ह्मणजे चक्षुरादिक पांच इंद्रियें मनाशीं सहवर्तमान ज्यावेळीं विषयभोग न स्वीकारतां रहातात, आणि बुद्धिही विषयाकडे जात नाहीं, असें होणें हें ज्ञानप्राप्तीचें उत्कृष्ठ साधन आहे असें म्हणतात. )

तां योग मिति मन्यंते स्थिरामिंद्रियधारणां ।
अप्रमत्तस्तदाभवति योगोहि प्रभवाप्ययौ[३] ॥ ११ ॥

( म्हणजे इंद्रियांना विषयाकडून काढून भगवंताकडे स्थिरपणानें लक्ष लावणें ह्याला समाधियोग असें ज्ञानी म्हणतात. त्या वेळीं मनुष्य सावध होतो ह्मणजे भगवंताचा ज्ञानी होतो. भगवंताच्या ध्यानरूप योगाचा विषय म्हटला तर भगवंतापासून उत्पत्ति व नाश होतात हाच आहे. )

---

१. काठकोपनिषत् ( अ० २ व० १. ) २. काठकोपनिषत् । अ० २.
३. काठकोपनिषत् । ( अ० २ व० ६ )

तदेतदृचाऽभ्युक्तं क्रियावंतः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः । स्वयं

जुव्हते एकर्षिं श्रद्धयंत स्तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत

शिरोव्रतं विधिवद्यैस्तुचीर्णम्[1] ॥ १० ॥

( म्हणजे ब्रह्मविद्येचा अभ्यास करण्याला कोणास अधिकार आहे ह्याविषयीं पुढें सांगितलेला श्लोक आहे. वेदांचें अध्ययन केलेले, आपला वर्ण व आश्रम ह्यांस योग्य अशीं कर्में करणारे, परमेश्वराचे ठिकाणीं भक्ति बाळगणारे, स्वतः अग्निहोत्रादिक करणारे, मुख्य ऋषींचीं श्रद्धेनें पूजा करणारे, ज्यांनीं शिरोव्रत विधिप्रकारें केलें आहे, त्यांना ब्रम्हविद्या सांगावी. )

यदा वै करोत्यथ निस्तिष्ठति नाकृत्वा निस्तिष्ठति कृत्वैव

निस्तिष्ठति कृतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति कृतिं भगवो

विजिज्ञास इति[2] ॥ १ ॥ २१ ॥

( म्हणजे जेव्हां कोणी इंद्रियनिग्रह करितो तेव्हां मग तो गुरुसेवा करितो, जो इंद्रियनिग्रह करित नाहीं तो गुरुसेवा करीत नाहीं. इंद्रियनिग्रह करणाराच गुरुसेवा करतो म्हणून इंद्रियनिग्रहच करण्याची इच्छा कर. नारद म्हणाला, हे भगवन्, इंद्रियनिग्रह करण्याची मी इच्छा करितों. )

**३. परमेश्वराचें ज्ञान होण्यासाठीं गुरु केला पाहिजे.** ह्याविषयीं प्रमाण.

नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।

अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते[3] ॥ १२ ॥

---

१. मुंडकोपनिषत् मुं० २ खं० २.

२. छांदोग्योपनिषत् प्र० ७ खं० २१.

३. काठकोपनिषत् ( अ० २ व० ६ )

( म्हणजे परमेश्वर हा वाणीनें प्राप्त होणें शक्य नाहीं, मनानें नाहीं आणि डोळ्यानें नाहीं. स्वतंत्र, सर्वोत्तम, व अप्राकृत असा परमेश्वर आहे, असें सांगणाऱ्या गुरूशिवाय दुसरीकडे परमेश्वराचें रूप कसें प्राप्त होईल ? )

परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राम्हणोनिर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ।
तद्विज्ञानार्थं स गुरूमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं[१] ॥ १२ ॥

( म्हणजे कर्मानें प्राप्त होणारे लोक पाहून ब्राम्हणानें विरक्त व्हावें. कर्मानें मोक्ष मिळत नाहीं, म्हणून त्यानें ज्ञान मिळविण्यास हातांत समिधा घेऊन, छंदाचें अध्ययन केलेला व भगवद्भक्त अशा गुरूकडे जावें. )

तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशांतचित्ताय शमान्विताय ।
येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्वतो ब्रह्मविद्याम्[२] ॥ १३ ॥

( म्हणजे जवळ आलेला, विरक्त झालेला, व भगवंताचे ठिकाणीं निष्ठा असलेला अशा शौनक ऋषीला, त्या विद्वान् अंगिराऋषीनें, ज्या विद्येच्या योगानें सकलगुणपूर्ण व नाशरहित व स्वतंत्र अशा परमेश्वराला जाणिलें ती ब्रह्मविद्या योग्य प्रकारें सांगितली. )

यदा वै निस्तिष्ठति अथश्रद्दधाति अनिस्तिष्ठन् नश्रद्द-
धाति निस्तिष्ठन्नेवश्रद्दधाति निष्ठात्वेव विजिज्ञासितव्येति
निष्ठां भगवो विजिज्ञासइति[३] ॥ १ ॥ २० ॥

( म्हणजे जेव्हां गुरूची सेवा करितो तेव्हां त्यास श्रद्धा उत्पन्न होते, गुरूची सेवा केली नाहीं तर श्रद्धा उत्पन्न होत नाहीं, गुरूची सेवा करितो त्यालाच श्रद्धा उत्पन्न होते. म्हणून गुरूची सेवा करण्या-

---

१. मुंडकोपनिषत् मुं. १ खं. २.

२. मुंडकोपनिषत्, मुं. १.

३. छांदोग्योपनिषत् प्र० ७ खं० २०.

ची इच्छा कर. नारद म्हणाला, हे भगवन्, मी गुरूची सेवा करण्या-ची इच्छा करितो. )

४. परमेश्वर आहे. ह्याविषयीं प्रमाण.

आत्मावारे द्रष्टव्यो श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः ।

( म्हणजे, अगे मैत्रेयि, परमात्मा पाहाण्यास योग्य आहे, ऐकण्यास योग्य आहे, मनन करण्यास योग्य आहे, नेहमीं ध्यान करण्यास योग्य आहे. )

आत्मा वा इदमग्र आसीत् ।

( म्हणजे सृष्टीचे अगोदर हा परमेश्वरच होता. )

आत्मन्येवात्मानं पश्येत् ।

( म्हणजे आपल्या ठिकाणींच परमेश्वराला पहावें. )

द्वासुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्योऽभिचाकशीति[१] ॥ १ ॥

( म्हणजे नेहमीं मिळून असणारे व मित्र असणारे असे दोन पक्ष्यां-च्या रूपानें ईश्वर व जीव हे देहरूप एकाच झाडाला चिकटून आहेत. त्यापैकीं एक [ जीव हा ] कर्माचें फल गोड म्हणून खातो, आणि दुसरा म्हणजे [ परमेश्वर हा ] जीवाच्या कर्मफलाचा उपभोग न घेतां आस-मंतात् प्रकाशतो. )

अंभस्यपारे भुवनस्य मध्ये नाकस्य पृष्ठे महतोमहीयानित्यादि[२] ।

( म्हणजे अनंत उदकामध्यें, चवदा भुवनांमध्यें, स्वर्गादिकापेक्षां मोठा असलेल्या ब्रह्मलोकांमध्यें जो [ परमेश्वर ] मोठ्याहून मोठा आहे. )

---

१. मुंडकोपनिषत् मुं० ३.

२. नारायणोपनिषत् पृष्ठ २.

यो देवानां प्रथमं पुरस्ता द्विश्वाधियोरुद्रो महार्षिः[1] ।

( म्हणजे जो जगाचा मालक, सर्वज्ञ, व रुद्र नांवाचा परमेश्वर. )

यशोजनेऽसानि स्वाहा । श्रेयान् वस्यसोऽसानि स्वाहा ।
तंत्वा भग प्रविशानि स्वाहा । समाभग प्रविश स्वाहा ।
तस्मिन् सहस्रशाखे । निभगाऽहंत्वयि मृजेस्वाहेत्यादि ।

( म्हणजे ज्यानें हजारों रूपें घेतलीं आहेत अशा तुझ्या [ म्ह० परमात्म्याच्या ] ठिकाणीं मी आपलें पाप धुऊन टाकितों. )

सहवै देवानां प्रथमः संबभूव ।

( म्हणजे तो [ परमेश्वर ] देवांच्यापूर्वीं होता. )

यश्छंदसामृषभो विश्वरूपः । छंदोभ्योऽध्यमृतात्संबभूव ।
समेंद्रो मेधयास्पृणोतु । अमृतस्य देवधारणोभूयासं ।

( म्हणजे सर्व वेदांचा नियंता, सर्व पूर्ण मूर्त्तिमान्, नित्य वेदापासून स्पष्टपणें लोकांस माहीत झालेला असा जो इंद्र नांवाचा परमेश्वर तो इंद्र मला उत्तम बुद्धि देवो, हे देवा, मी उत्तम प्रकारचा तत्वज्ञानी होऊन तुमच्या कृपेनें फारच लवकर मुक्त होतो. )

श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो यद्वाचोहवाचं सउ प्राणस्य प्राणः
चक्षुषश्चक्षुरतिमुच्यधीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवंति[2] ।

( म्हणजे जो श्रोत्रेंद्रियाला श्रवण शक्ति देतो, मनाला मनन करण्याची शक्ति देतो, वाणीला उच्चार करण्याची शक्ति देतो, तोच मुख्य प्राणाला प्रेरणा करणारा व चक्षुरिंद्रियाला दर्शनशक्ति देणारा आहे. [ तो परमेश्वर आहे. ] हें जाणणारा भौतिक देह सोडून व लिंग देह सोडून मुक्त होतो. )

---

१. नारायणोपनिषत्, पृष्ठ ७१.

२. केनोपनिषत्.

येन रूपं रसं गंधं शब्दान् स्पर्शांश्चमैथुनान्

एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते । एतद्वैतत् ॥ ३ ॥

( म्हणजे [ नचिकेतानें यमास असें विचारिलें कीं ] ज्यानें प्रेरणा केली असतां रंग, रुचि, वास, नाद, स्पर्श आणि मैथुनें हीं जीव जाणतो तो जीवाला प्रेरणा करणारा म्हणजे परमेश्वर हा मोक्षकाळीं असतो किंवा नाहीं ? [ यमानें असें उत्तर दिलें कीं, ] तो अशा गुणाचा परमेश्वर असतो. )

स्वप्नांतं जागरितांतं चोभौ येनानुपश्यति ।

महांतं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥ ४ ॥

( म्हणजे ज्ञानी मनुष्य सुषुप्ति व स्वप्न हीं दोन्हीं ज्यानें प्रेरणा केल्यावरून पाहतो तो मोठा व सर्वव्यापी परमात्मा आहे असें जाणून शोक करीत नाहीं. )

यइमं मध्वदंवेदआत्मानं जीवमंतिकात् ।

ईशानं भूतभव्यस्य न ततोविजुगुप्सते । एतद्वैतत् ॥ ५ ॥

( म्हणजे शरीरांत राहून उत्कृष्ट खाणें खाणारा व जीवाचे नियमन करण्याकरितां त्याजवळ राहणारा असा परमेश्वर हा भूत व भविष्य ह्यांच्यावर अंमल चालविणारा मालक आहे. असें जो जाणतो तो आपलें रक्षण करण्यास इच्छित नाहीं. )

यः पूर्वंतपसोजातमद्भ्यः पूर्वमजायत ।

गुहां प्रविश्यतिष्ठंतंयोभूतेभिर्व्यपश्यत । एतद्वैतत् ॥ ६ ॥

( म्हणजे जो प्रथम ब्रह्मदेवास तप नामक शिवापेक्षां अगोदर व पंच महाभूतांपेक्षां अगोदर उत्पन्न करितां झाला; जो ऱ्हदय गुहेमध्यें प्रवेश करून राहणाऱ्या आपणास पंचमहाभूतासहवर्तमान पाहतो, असा तूं विचारिलेला परमात्मा आहे. )

---

१. काठकोपनिषत् ( अ० २ व० ४ )

या प्राणेन संभवत्यदितिर्देवतामयी ।

गुहांप्रविश्यतिष्ठंती या भूतेभिर्व्यजायत । एतद्वैतत् ॥७ ॥

( म्हणजे सर्व जगताचें रक्षण करणारी अदिति नांवाची व सर्व देवतांमध्यें उत्तम अशी जी भगवंताची तनु मुख्यप्राणासहवर्तमान राहते, ती भगवंताची तनु ऱ्हदयगुहेमध्यें प्रवेश करून असलेल्या आपल्या तनूला प्राण्यांशींसहवर्तमान अनेक अवतार धारण करविते, अशा गुणांचा तूं विचारिलेला परमात्मा आहे. )

अरण्योर्निहितो जात वेदा गर्भ इव सुभृतो गर्भिणीभिः ।

दिवे दिवईड्योजागृवद्भिर्हविष्मद्भिर्मनुष्येभिरग्निः । एतद्वैतत् ॥ ८ ॥

( म्हणजे गुरु व शिष्य ह्यांच्या ठिकाणीं सर्वज्ञ परमेश्वर गर्भार स्त्रियांनीं चांगल्या प्रकारें धारण केलेल्या गर्भाप्रमाणें असतो, अग्निनामक परमेश्वर हा, भगवंताचें ज्ञान असणारे व यज्ञ करणारे अशा मनुष्यांनीं रोज रोज स्तुति करण्यास योग्य आहे. तूं जो परमात्मा विचारिलास तो अशा गुणांचा आहे. )

यतश्चोदेति सूर्योऽस्तंयत्रगच्छति ।

तं देवाः सर्वेऽपितास्तदुनात्येतिकश्चन । एतद्वैतत् ॥ ९ ॥

( म्हणजे सृष्टि होते वेळीं ज्यापासून सूर्य उत्पन्न होतो व प्रळय-काळीं तो ज्यामध्यें नाहींसा होतो त्याला आश्रय करून सर्व देव राहतात. ते सर्व देवांच्या आश्रयांचें ठिकाण कोणीही वलांडून जाऊं शकत नाहीं. तूं विचारिलेला परमात्मा अशा गुणांचा आहे. )

अंगुष्ठमात्रः पुरुषो मध्यआत्मनितिष्ठति ।

ईशानोभूतभव्यस्यनततो विजुगुप्सते । एतद्वैतत् ॥१२॥

---

१. काठकोपनिषत् अ० २ व० ४.

( म्हणजे आंगठ्या येवढा परमात्मा शरीरामध्यें ऱ्हदयांत आहे. तो भूत व भविष्य ह्यांजवर अंमल चालविणारा धनी आहे. म्हणून ज्ञानी मनुष्य आपण आपलें रक्षण करण्यास इच्छित नाहीं. तूं विचारिलेला परमात्मा अशा गुणांचा आहे. )

अंगुष्ठमात्रः पुरुषोज्योतिरिवाधूमकः ।
ईशानोभूतभव्यस्य स एवाद्यसउश्वः । एतद्वैतत्[1] ॥ १३॥

( म्हणजे अंगठ्या येवढा असलेला परमात्मा तेजाप्रमाणें स्वच्छ, आणि भूत व भविष्य ह्यांचा नियमन करणारा आहे. तोच अनादि व अनंत असा आहे. तूं विचारिलेला परमात्मा अशा गुणांचा आहे. )

अस्य विस्रंसमानस्य शरीरस्थस्य देहिनः ।
देहाद्विमुच्यमानस्य किमत्र परिशिष्यते । एतद्वैतत्[1] ॥४ ॥

( म्हणजे शरीरांत असलेला जीव देह टाकून लिंग देहांतून निघून मुक्त झाल्यावर बाकी काय राहते ? असें नचिकेतानें विचारल्यावर यमानें असें उत्तर दिलें कीं, जें बाकी उरतें तें तूं विचारलेला परमेश्वर आहे.)

पुरमेकादशद्वार मजस्यावक्रचेतसः ।
अनुष्ठाय न शोचति विमुक्तश्चविमुच्यते । एतद्वैतत्[1] ॥१॥

( म्हणजे अकरा द्वारें असलेला देह हा, ज्यांचें तेज गुप्त आहे अशा भगवानाच्या स्वाधीन आहे, असें मनांत आणून ममता टाकणारा मनुष्य शोक करीत नाहीं, आणि मुक्त झालेल्या जीवाप्रमाणें त्यास कर्मापासून दुःख होत नाहीं, व प्रारब्धकर्म संपलें म्हणजे तो पूर्णपणें मुक्तीस जातो. तूं विचारिलेला परमेश्वर हा आहे. )

न प्राणेन नापानेन मर्त्यो जीवतिकश्चन ।
इतरेणतु जीवति यस्मिन्नेतावुपाश्रितौ[2] ॥ ५ ॥

---

१. काठकोपनिषत् अ० २ व० ४.

२. काठकोपनिषत् ( अ० २ व० ५ )

( म्हणजे कोणीही मरणारा प्राणी प्राणवायूच्या योगानें जिवंत राहतो असें नाहीं अथवा अपानवायूच्या योगानेंही जिवंत राहतो असें नाहीं, तर ज्या परमेश्वराच्या ठिकाणीं प्राण व अपान हे दोघे आश्रय करून राहतात, त्या तिन्हाईत परमेश्वराच्या योगानें जिवंत राहतो. )

य एष सुप्तेषुजागर्त्ति कामं कामं पुरुषो निर्ममाणः ।
तदेव शुक्रंतद्ब्रह्मतदेवामृतमुच्यते ।
तस्मिल्लोकाः श्रिताः सर्वे तदुनात्येतिकश्चन । एतद्वैतत् ॥८ ॥

( म्हणजे जो हा भगवान जीव निजलेला असतां त्यास आपल्या इच्छेप्रमाणें स्वप्नांतले पदार्थ उत्पन्न करून जागत राहतो, तोच शोक रहित आहे, तें ब्रह्म आहे, तेंच नाश रहित आहे असें वेदादिकांमध्यें सांगितलें आहे. त्याच्या ठिकाणीं सर्व लोक आश्रित आहेत. त्याला वलांडून कोणीही जात नाहीं. तूं विचारिलेला परमेश्वर अशा गुणांचा आहे. )

ऊर्ध्व मूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।
तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृत मुच्यते ।
तस्मिल्लोकाः श्रिताः सर्वेतदुनात्येतिकश्चन । एतद्वैतत् ॥ १ ॥

( म्हणजे जगद्रूप झाडाचें मूळ सर्वोत्तम भगवान आहे. ह्या झाडाच्या फांद्या कनिष्ठ देव आहेत. हें झाड अश्वत्थाच्या झाडाप्रमाणें असून प्रवाहरूपानें अनादि आहे. तेंच जगद्रूप झाडाचें सर्वोत्कृष्ट मूळ शोक रहित ब्रह्म आहे. तेंच मोक्ष आहे असें ज्ञानी म्हणतात. त्या ब्रह्माच्या ठिकाणीं सर्व लोक आश्रय करून राहिले आहेत. कोणीही त्या ब्रह्माला वलांडून जाऊं शकत नाहीं. तूं विचारिलेला परमेश्वर अशा गुणांचा आहे.)

१. काठकोपनिषत् अ० २ व० ५

सदेवसोम्येदमग्र आसीदेकमेवाऽद्वितीयम् ।
तद्धैक आहुरसदेवेदमग्रऽआसीदेक मेवाद्वितीयं
तस्मादसतः सज्जायते ॥ १ ॥ कुतस्तुखलुसोम्यैव
स्यादिति होवाचकथमसतः सज्जायेतेति
सत्त्वेव सोम्येदमग्र आसीत् । एकमेवाद्वितीयम्[1] ॥ २ ॥

( म्हणजे, हे सोम्य, सर्वोत्तम असल्यामुळें " सत् " नांवाचा परमेश्वर एकटाच व आपल्या बरोबरीचा दुसरा कोणी नाहीं, असा ह्या जगाच्या आरंभी होता. शून्यवादी असें म्हणतात कीं, जगाच्यापूर्वी " असत् " म्हणजे शून्य हें एकटेंच व अद्वितीय असें होतें. त्यापासून जग उत्पन्न झालें ॥ १ ॥ हे सोम्य, शून्यापासून जग उत्पन्न झालें असें कसें होईल? म्हणून हे सोम्य, जगाच्यापूर्वी परमेश्वर हाच एकटा व अद्वितीय असा होता ॥ २ ॥ )

सब्रूयान्नास्य जरयैतज्जीर्यति नवधेनास्य हन्यत
एतत्सत्यं ब्रह्मपुर मस्मिन् कामाः समाहिताएषआत्माऽ
पहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोकोविजिघत्सोऽपिपासः
सत्यकामः सत्यसंकल्पो यथा ह्येवेहप्रजा अन्वाविशंति
यथाऽनुशासनं यं यमंतमभिकामाभवंति यंजन-
पदं यं क्षेत्रं भोगंतंतमेवोपजीवंति[2] ॥ ५ ॥

( म्हणजे त्या गुरूनें असें सांगावें कीं, ह्या शरीराच्या म्हातारपणानें परमात्मा म्हातारा होत नाहीं, शरीराचा नाश झाल्यानें परमात्म्याचा नाश होत नाहीं, तो पूर्ण व नेहमीं असणारा आहे. परमात्मा हा ज्याचें सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत असा आहे. हा ऱ्हदयाकाशांत असलेला

---

१. छांदोग्योपनिषत् प्र० ६ खं० २.

२. छांदोग्योपनिषत् प्र० ८ खं० १.

परमात्मा पापापासून दूर आहे. परमात्म्याला म्हातारपण, मृत्यु, शोक, भूक व तहान हीं नाहींत. परमात्म्याला जें पाहिजे तें आपोआप मिळतें, कारण, तो जें मनांत आणितो तें व्यर्थ होत नाहीं. लोक आपल्या योग्यतेप्रमाणें मुक्ति मिळवून परमात्म्याबरोबर त्याच्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यापार करितात. मुक्त लोक ज्या ज्या देशाची, राष्ट्राची, क्षेत्राची व उपभोगाची इच्छा करितात, ते ते देश, राष्ट्रें इत्यादि त्यांना परमात्म्याच्या आज्ञेनें मिळतात.)

आप एवेदमग्र आसुस्ता आपः सत्यमसृजंत सत्यंब्रह्मब्रह्म
प्रजापतिं प्रजापतिर्देवाꣳ स्तेदेवाः सत्यमेवोपासतेतदेतत्
त्र्यक्षरꣳ सत्यमिति स इत्येकमक्षरंतीत्येकमक्षरं यमित्येकम-
क्षरं प्रथमोत्तमे अक्षरे सत्यं मध्यतोऽनृतं तदेतदनृतमुभ-
यतः सत्येन परिगृहीतं सत्यं भूयमेवभवतिनैनं विद्वाꣳ सम
नृतꣳ हिनस्ति ॥ १ ॥

( म्हणजे ह्या प्रपंच्याच्यापूर्वीं आप नामक परमेश्वर होता. त्यानें वासुदेवाला उत्पन्न केलें. सत्यनामक वासुदेवानें ब्रह्मदेवास उत्पन्न केलें. ब्रह्मदेवानें सर्व देवांना उत्पन्न केलें. म्हणून सर्व देव सत्यनामक परमात्म्याची उपासना करितात. सत्य ह्या शब्दामध्यें तीन अक्षरें आहेत. पहिलें " स " मधलें " त " व शेवटलें " य " अशीं तीन अक्षरें आहेत. ह्यांपैकीं पहिलें स व शेवटलें य अशीं दोन सत्य आहेत, व मधलें असत्य आहे. तथापि ' स ' व ' य ' अशा दोन सत्य अक्षरांनीं आपल्यामध्यें " त " हें अक्षर घेतल्यामुळें फारच सत्यरूप झालें आहे. ही विद्या जाणणाऱ्यांस मिथ्या ज्ञान कधीं बाधक होत नाहीं. )

आणखी परमेश्वराच्या गुणांचें वर्णन करणाऱ्या ज्या कांहीं श्रुति खालीं दिल्या आहेत त्याही परमेश्वर असल्याविषयीं प्रमाण आहेत.

---

१. बृहदारण्यकोपनिषत् अ० ५ ब्रा० ५.

ह्याशिवाय वेदामध्यें ब्रम्ह, विष्णु इत्यादि शब्द जेथें जेथें आढळ-तात तीं सर्व वाक्यें परमेश्वर असल्याविषयीं प्रमाणभूत आहेत. ह्याशिवाय प्रत्येक वैदिक शब्दाचा समन्वय परमेश्वरावर होत असल्यामुळें परमेश्वर असल्याविषयीं सर्व वेद व प्रत्येक वैदिक शब्द प्रमाण आहेत.

**५. परमेश्वर कसा आहे ?** ह्याविषयीं श्रुतीचें प्रमाण.

सत्यं ज्ञानमनंतं ब्रम्हँ[1] ।

( म्हणजे सत्य म्हणजे उत्पत्ति स्थिति प्रवर्तन व नाश हीं करणारें, ज्ञान म्हणजे सर्व पदार्थाविषयीं जें ज्ञान तद्रूप, अनंत म्हणजे देश काल व गुण ह्यांनीं अपरिमित, अशा तीन लक्षणांनीं युक्त असें परब्रम्ह आहे. )

अस्थूलोऽनणुर मध्यमो मध्यमो
ऽव्यापको व्यापको योऽसौहरिरादिरनादिर विश्वो विश्वः
सगुणो निर्गुण इति ।

( म्हणजे जो हा परमात्मा मोठा नाहीं, लहान नाहीं, मध्यम नाहीं, मध्यम आहे, सर्व व्यापी आहे, सर्व व्यापी नाहीं, अनादि आहे, अनादि नाहीं, पूर्ण आहे, पूर्ण नाहीं, सगुण आहे व निर्गुण आहे. )

य आत्मापहतपाप्माविजरोविमृत्युर्विशोकोऽविजिघत्सोऽ
पिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः सवि
जिज्ञासितव्यः ।

( म्हणजे परमात्मा पापरहित, जरारहित, मरणरहित, शोक-रहित, क्षुधारहित, तृषारहित, ज्याचा काम सत्य आहे असा, ज्याचा संकल्प सत्य आहे, असा आहे. तो शोध करण्यास व जाणण्यास योग्य आहे. )

---

१. ब्रम्हवल्ली.

नारायण परोज्योतिरात्मा नारायणः परः । नारायण
परंब्रह्म तत्वं नारायणः परः । नारायण परोध्याता-
ध्यानं नारायणः परः[1] ।

( म्हणजे नारायण हा सर्वांचा प्रकाशक आहे. नारायण हा ग्रहण इत्यादि करणारा आहे. नारायण हा सर्वांत श्रेष्ठ आहे. नारायणच मुख्य जाणण्याजोगें तत्व आहे. ध्यान करणाऱ्याचा मुख्य विषय नारायणच आहे.. ध्यानरूपीही नारायणच आहे. )

अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्षत् इति[2] ।

( म्हणजे परमेश्वर हा निर्भय, मुख्य, मनापेक्षां फार वेगवान् असा आहे. त्यास देवांनीं पूर्णपणें जाणिलें नाहीं. )

यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुः श्रोत्रं तदपाणिपादं
नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययंयद्भूतयोनिं परि-
पश्यंति धीराः[3] ॥ ६ ॥

( म्हणजे जें ब्रम्ह आहे तें अदृश्य, मनानें ज्ञान न होण्या जोगें, ज्यास गोत्र नाहीं, जात नाहीं, डोळे नाहींत, हात व पाय नाहींत, खात असणारे, समर्थ, सर्वव्यापी, अति सूक्ष्म, नाशरहित, व प्राण्यांच्या उत्पत्तीचें कारण, असें आहे असें ज्ञानी समजतात. )

दिव्योह्यमूर्तः पुरुषः सभाह्यभ्यंतरोह्यजः ।
अप्राणोह्य मनाः शुभ्रोह्यक्षरातपरतःपरः[4] ॥ २ ॥

---

१. नारायणोपनिषत् भाग० १ पृ० ७७.

२. ईशोपनिषत्.

३. मुंडकोपनिषत्, मुं. १.

४. मुंडकोपनिषत्, मुं० २ खं० १.

( ह्मणजे तो परमेश्वर अतिअद्भुत, आकाररहित, आंत व बाहेर असणारा, उत्पत्तिरहित, प्राणरहित, मनरहित, शुद्ध, व प्रकृतीपेक्षां उत्तम असा आहे. )

एषसर्वेश्वर एषसर्वज्ञ एषोंतर्याम्येषयोनिः ।
सर्वस्य प्रभवाप्ययौहिभूतानाम्[१] ॥ ६ ॥

( ह्मणजे हा चतुरूप परमात्मा सर्वांचा धनी आहे. हा सर्व जाणणारा आहे. हा सर्वांचे आंत राहून नियमन करणारा आहे. हा सर्वांचें कारण आहे. कारण त्यापासून सर्व प्राण्यांची उत्पत्ति व नाश होतात. )

योवै भूमातत् सुखंनाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं-
भूमात्वेव विजिज्ञासितव्य इति भूमानं भगवो विजिज्ञास-
इति ॥ १ ॥ २३ ॥ यत्रनान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्य-
द्विजानाति सभूमा अथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्य-
द्विजानाति तदल्पं योवै भूमातदमृतमथ यदल्पंतन्मर्त्यं
सभगवः कस्मिन् प्रतिष्ठित इति स्वेमहिम्नि यदिवा-
न महिम्नीति[२] ॥ १ ॥

(म्हणजे जो पूर्ण परमेश्वर तोच सुख आहे. ईश्वर प्रसादाशिवाय मुक्तांना सुख नाहीं. परमात्माच सुख आहे, परमात्म्यालाच जाणण्याची इच्छा कर. [ असें सनत्कुमार बोलला असतां नारद म्हणाला कीं, ] हे भगवन्, मी नारायणास जाणण्याची इच्छा करितों ॥ १ ॥ २३ ॥ ज्याच्या अधीन सर्व आहे ह्याशिवाय कोणी अधिकारी दुसरें कांहीं पाहत नाहीं, किंवा ऐकत नाहीं, किंवा जाणत नाहीं, म्हणजे ज्याच्या अधीन सर्व आहे असेंच पाहतो किंवा ऐकतो किंवा जाणतो, तो भूमा ह्मणजे परमात्मा आहे. आणखी ज्याच्या अधीन नाहीं असें कांहीं

---

१. मांडुक्योपनिषत्.

२. छांदोग्योपनिषत् प्र० ७ खं० २३ व २४.

पाहतो, किंवा ऐकतो, किंवा जाणतो, तें अल्प [ म्हणजे परमात्मा नव्हे असे ] आहे. जो भूमा [ म्हणजे परमात्मा ] तो अमर आहे. जें अल्प [ म्हणजे परमात्मा नव्हे ] तें मरणारें आहे. हे भगवन्, तो [ भूमा ] कोठें राहिला आहे ? तेव्हां सनत्कुमारानें असें उत्तर दिलें कीं, तो आपल्या महिम्याचे ठिकाणीं राहिला आहे, अथवा महिमा हाही त्याचा आश्रय नाहीं ॥ १ ॥ )

**६. परमेश्वरास रूप आहे. ह्याविषयी प्रमाण.**

यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिं ।
तदा विद्वान् पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति[1] ॥ २ ॥

( म्हणजे जेव्हां जीव सोन्यासारखा देह असलेला, व ब्रम्हदेवाला उत्पन्न करणारा, व जगाचा कर्ता, अशा परमेश्वरास पाहतो तेव्हां तो ज्ञानी मुक्तीस प्रतिबंध करणारें असें पुण्य व पाप टाकून देऊन व अज्ञानरहित होऊन परमेश्वरासारखा होतो. )

**७. परमेश्वर हा आनंदरूप आहे. ह्याविषयीं प्रमाण.**

आनंदो ब्रह्मेति व्यजानात् । आनंदाद्ध्येवखल्वि-
मानि भूतानि जायंत इति[2] ।

( म्हणजे आनंदनामक नारायण हा ब्रह्म आहे असें प्रत्यक्ष पाहिलें. आनंदनामक नारायणापासून हे प्राणी उत्पन्न होतात. )

कोह्येवान्यात्कः प्राण्याद्यदेष आकाश आनंदोनस्यादिति[3] ।

( म्हणजे जर आकाश म्हणजे आसमंतात प्रकाशणारा आकाश नांवाचा हा भगवान वासुदेव पूर्णानंद न होईल तर कोणता पुरुष प्रेरणा

---

१. मुंडकोपनिषत् मुं० ३.

२. भृगुवल्ली.

३. ब्रम्हवल्ली.

करील व कोणता पुरुष यज्ञदान इत्यादि प्रसंगीं जोरानें प्रेरणा करील?)

**८. परमेश्वर हा पूर्ण आहे.** ह्यास प्रमाण.

पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते
पूर्णस्यपूर्ण मादाय पूर्णमेवावशिष्यते[१]।

(म्हणजे भगवंताचें मूलरूप पूर्ण आहे. ह्यापासून मत्स्य, कूर्म इत्यादि अवतार घेतलेलीं रूपें प्रगटलीं आहेत. मूलरूपापासून बाहेर पडलेलें अवताररूप जेव्हां मूलरूपाशीं मिळतें तेव्हां मूलरूपच राहतें.)

**९. परमेश्वर हा सर्व व्यापी आहे.** ह्यास प्रमाण.

यच्चकिंचिज्जगत्सर्वं दृश्यतेश्रूयतेऽपिवा अंतर्बहिश्च
तत्सर्वं व्याप्यनारायणस्थितः[२]।

(म्हणजे जेवढें कांहीं जड व चेतनरूपी जगत आतां दिसतें, पूर्वीं दिसलें, व पुढें दिसेल, आणि जें प्राण्यांना ऐकूं येतें त्या सर्व जगताला आंत व बाहेर व्यापून नारायण सर्वत्र राहिला आहे.)

एकोदेवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांत·
रात्मा कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षीचेता
केवलो निर्गुणश्चेति।

(म्हणजे एक परमात्मा सर्व प्राण्यांत आहे, सर्वव्यापी आहे, सर्वांचे आंत राहून नियमन करणारा आहे, सर्व कर्मांचा मुख्य आहे, सर्व प्राण्यांत राहणारा, पाहणारा, ज्ञानवान्, व निर्गुण असा आहे.)

ईशावास्यमिदꣳ सर्वं यत्किंच जगत्यां जगत्[३]।

---

१. बृहदारण्यकोपनिषत् अ० ५.

२. नारायणोपनिषत् भा० १ पृ० ७८.

३. ईशोपनिषत्.

( म्हणजे, जें कांहीं जगत तें सर्व परमेश्वराचें राहण्याचें ठिकाण आहे. )

तदेजाति तन्नैजाति तद्दूरे तद्वंतिके ।

तदंतरस्य सर्वस्य तदुसर्वस्यास्य बाह्यतः ।

( म्हणजे, परमेश्वरापासून जग भय पावतें. परमेश्वर भीत नाहीं, परमेश्वर जवळ आहे, व तो लांबही आहे, तो सर्व पदार्थांच्या आंत आहे, व बाहेरही आहे. )

ब्रम्हैवेदममृतं पुरस्ताद्ब्रम्ह पश्चादब्रम्हं दक्षिणतश्चोत्तरेण ।

अधश्चोर्ध्वंच प्रसृतं ब्रम्हैवेदं विश्वमिदं वरिष्ठं[1] ॥ ११ ॥

( म्हणजे हा नाशरहित असलेला परमेश्वर पुढें, परमेश्वर पश्चिम-दिशेला, परमेश्वर दक्षिण दिशेला, परमेश्वर उत्तर दिशेला, खालीं व वर पसरलेला आहे. परमेश्वर पूर्ण आहे. तो सर्वांहून श्रेष्ठ आहे. )

स एवाधस्तात् स उपरिष्ठात् स पश्चात् स पुरस्तात्

स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदꣳसर्वमित्यथातो

ऽहंकारादेश एवाहमेवाधस्तादहमुपरिष्टादहं पश्चादहं

पुरस्तादहं दक्षिणतोऽहमुत्तरतोऽहमेवेदꣳसर्वमिति ॥ १ ॥

( म्हणजे तो [ परमात्मा ] खालीं आहे; तो वर आहे, तो मागें आहे. तो पुढें आहे, तो दक्षिणेकडे आहे, तो उत्तरेकडे आहे, तोच हें सर्व आहे. आतां भूमाचें निरूपण केल्यानंतर " अहं " म्हणजे अनिरुद्ध-नामक परमात्मा ह्याजविषयीं सांगतो. " अहं " हाच खालीं आहे, अहं वर आहे, अहं पाठीमागें आहे, अहं पुढें आहे, अहं दक्षिणेस आहे, अहं उत्तरेस आहे, अहं हाच सर्व आहे, असें सनत्कुमार बोलला. )

---

१ मुंडकोपनिषत् मुं० २.

**१० परमेश्वर हा सर्वज्ञ आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः । तस्मादेतद्ब्रम्हना

मरूपमन्नंच जायते[1] ॥ ९ ॥

( म्हणजे जो सामान्येंकरून व विशेषेंकरून सर्व जाणतो, ज्याचें तप ज्ञानरूप आहे, अशा परमेश्वरापासून हा ब्रम्हदेव नाम रूप व अन्न हीं उत्पन्न झालीं. )

**११. परमेश्वर हा सर्वांहून मोठा व अनंत आहे.**
ह्याविषयीं प्रमाण.

स एष परोवरीयान् स एषोऽनंत इति ।

( म्हणजे तो हा परमेश्वर सर्वांपेक्षां श्रेष्ठ व तो अनंत असा आहे. )

अनंतमव्ययं कविꣳ समुद्रेऽतं विश्वशंभुवं ।

( म्हणजे परमेश्वर हा अनंत, अविनाशी, ज्ञानी, समुद्रांत राहणारा, व जगताचें कल्याण करणारा असा आहे. )

अंगुष्ठमात्रः पुरुषोज्योतिरिवाधूमकः ।

ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उश्वः । एतद्वैतत् १२

( म्हणजे अंगठ्या येवढा असलेला परमात्मा तेजाप्रमाणें स्वच्छ, आणि भूत व भविष्य ह्यांचा नियमन करणारा आहे. तोच अनादि व अनंत असा आहे. तूं विचारिलेला परमात्मा अशा गुणाचा आहे. )

**१२. परमेश्वर हा स्वतंत्र आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

सब्रह्म सशिवः सहरिः सेंद्रः सोक्षरः परमः स्वराट्[2] ।

( म्हणजे तो [ परमेश्वर ] ब्रह्म आहे, तो शिव आहे, तो हरि आहे, तो नाशरहित आहे, श्रेष्ठ आहे व स्वतंत्र आहे. )

---

१. मुंडकोपनिषत्, मुं० १ खं० १.

२. नारायणोपनिषत्.

**१३. परमेश्वर हा नित्य आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

वायुरनिलममृतमथेदं भस्मांतꣳ शरीरं[1] ।

( म्हणजे जरी वायु परमेश्वराश्रित आहे तरी तोही नित्य आहे. मग परमेश्वर नित्य आहे हें काय सांगावें ! )

**१४. परमेश्वरामध्यें विरुद्ध गुण राहूं शकतात.**

ह्याविषयीं प्रमाण.

अणोरणीयान्महतोमहीयानात्मागुहायांनिहितोऽस्यजंतोः[2] ।

( म्हणजे ह्या जीवाच्या हृदयांत प्रेरणा करण्याकरितां असलेला परमेश्वर सूक्ष्म अणूपेक्षांही सूक्ष्म असून मोठ्या पदार्थांपेक्षांही मोठा आहे. त्या परमेश्वराचें माहात्म्य अकारनामक विष्णूविषयीं निश्चयवान् असें जाण-णारा परमेश्वराचा प्रसाद झाल्यामुळें पाहतो, त्यानंतर शोकरहित होतो. )

नांतःप्रज्ञं नबहिःप्रज्ञं नोभयतःप्रज्ञं नप्रज्ञानघनं नप्रज्ञं नाप्रज्ञं
अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिंत्यमव्यपदेश्यमे-
कात्म्यप्रत्ययसारं प्रपंचोपशमं शांतं शिवमद्वैतं
चतुर्थंमन्यंते स आत्मा सविज्ञेयः[3] ॥ ७ ॥

( म्हणजे तें चवथें रूप अंतःप्रज्ञ म्हणजे स्वप्नांतील पदार्थ दाख-विणारें नव्हे, बहिःप्रज्ञ म्हणजे जागृत अवस्थेंतील पदार्थ दाखविणारें नव्हे, उभयतःप्रज्ञ म्हणजे बाहेरील पदार्थ दाखवून स्वप्नांतील पदार्थ दाखविणारें असें नव्हे, प्रज्ञानघन म्हणजे अज्ञानानें झांकलेल्या म्हणजे निजलेल्या जीवास आपलें स्वरूप व अज्ञान दाखविणारें असें नव्हे, प्रज्ञ म्हणजे ध्यानाचे वेळीं वासनामय पदार्थ दाखविणारें असें नव्हे, अप्रज्ञ

१. ईशोपनिषत्.

२. नारायणोपनिषत् भा० १.

३. मांडुक्योपनिषत् पृ० ११.

म्हणजे कांहीं एक न जाणविणारें असेंही नव्हे. म्हणजे मुक्तांस आपआपल्या योग्यतेप्रमाणें ज्ञान देण्याचा व्यापार करणारें असें आहे, अदृष्ट म्हणजे जसें विश्वादि तीन रूपें बाहेरील व आंतील पदार्थ जाणविण्यावरून अनुमित केलीं जातात तसें नव्हे, अव्यवहार्य म्हणजे मुक्तीवांचून व्यवहार न होण्याजोगें, अग्राह्य म्हणजे मुक्तीवांचून ज्ञान न होण्याजोगें, अलक्षण म्हणजे जागृतादिक अवस्थेंत जीवांना प्रवृत्ति करणें हें विश्वादिक रूपांचें अनुमान करण्यास जसें कारण आहे तसें ज्याचें अनुमान करण्यास कारण नाहीं असें, म्हणून अचिंत्य म्हणजे स्वतः चिंतन करण्यास अशक्य, अव्यपदेश्य म्हणजे दुसऱ्याला सांगण्यास अशक्य, ऐकात्म्यप्रत्ययसार म्हणजे मुख्य पूर्ण ज्ञानरूप व आनंदरूप असें, प्रपंचोपशम म्हणजे व्याप्त असून सुखरूप असें, शांत, कल्याणकारक, अहंकार व ममता इत्यादिक खोट्या समजुती नाहींसें करणारें, अशा प्रकारचें परमात्म्याचें चवथें रूप आहे, असें ब्रह्मादिक विद्वान मानितात.)

तद्दूरे तद्वंतिके । तदंतरस्य सर्वस्य तद्दु सर्वस्यास्यबाह्यतः ।[1]

(म्हणजे परमात्मा लांब आहे व जवळही आहे तो सर्व पदार्थांच्या आंत आहे. व बाहेरही आहे.)

**१५. परमेश्वराच्या ठिकाणीं धर्म व धर्मी हा भेद नाहीं.**

ह्यांविषयीं प्रमाण.

पुरुषएवेदं विश्वंकर्म तपोब्रम्हपरामृतम् ।
एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रंथिं
विकिरतीह सोम्यें ॥ १० ॥[2]

(म्हणजे सृष्टि उत्पन्न करण्याचें कर्म व ज्ञान हें जगत् म्हणजे एकंदर धर्म समुदाय हा मोक्षाख्य व ब्रह्मशब्दानें दर्शविलेला परमेश्वरच

---

१. ईशोपनिषत्.

२. कठोपनिषत् अ०

आहे. हें सोमयज्ञांतील रस पिण्यास योग्य शौनकऋषि, प्राण्यांच्या ह्या ऱ्हदयगुहेंत असलेला परमेश्वर जो जाणतो तो ह्या लोकीं अज्ञानाची गांठ तोडून मुक्त होतो. )

**१६. परमेश्वरापासून सर्व जग उत्पन्न झालें व तो सर्वांचें पोषण व नाश करितो.** ह्याविषयीं प्रमाण.

यतोवा इमानिभूतानिजायंते । येनजातानि जीवंति ।
यत्प्रयंत्यभिसंविशंतीति[1] ।

( म्हणजे ज्यापासून हे ब्रह्मदेव इत्यादिक प्राणी निःसंशय उत्पन्न होतात, आणि उत्पन्न झालेले प्राणी ज्याच्या योगानें वाढतात, व प्रळय-कालीं नाश पावतात, व मुक्तीकालीं ज्यांत आपल्या इच्छेनें प्रवेश करितात, इ०. )

यउत्रिधातुःपृथिवीमुतद्यामेको दाधार भुवनानि विश्वा इति ।

( म्हणजे जो परमेश्वर तीन प्रकारचा होऊन पृथ्वी, स्वर्ग आणि सर्व भुवनें ह्यांना धारण करितो. )

आत्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः ।
अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधी
भ्योऽन्नं । अन्नात्पुरुष इति[2] ।

( म्हणजे परमात्म्यापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु उत्पन्न झाला, वायूपासून अग्नि उत्पन्न झाला, अग्नीपासून उदक उत्पन्न झालें, उदकापासून पृथ्वी उत्पन्न झाली, पृथ्वीपासून वनस्पती उत्पन्न झाल्या, वनस्पतीपासून अन्न उत्पन्न झालें, अन्नापासून मनुष्य उत्पन्न झाला. )

अन्नाद्वै प्रजाः प्रजायंते । याः काश्च पृथिवीं श्रिताः ।
अथो अन्नेनैव जीवंति । अथैनदपियंत्यंततः ।

---

१. भृगुवल्ली.
२. ब्रम्हवल्ली.

( म्हणजे ज्या कांहीं प्रजा पृथ्वीवर आहेत त्या प्रजा अन्नापासून बनलेल्या देहांत राहणाऱ्या परमात्म्यापासून उत्पन्न होतात हें उघड आहे. आणखी उत्पन्न झाल्यावर ह्या प्रजा परमात्म्याच्या योगानेंच जीवंत राहतात. नंतर प्रलयकालीं परमात्म्यामध्यें लय पावतात. )

अन्नाद्भूतानि जायंते । जातान्यन्नेनवर्द्धंते ।
अद्यतेऽत्तिचभूतानि[१] ।

( म्हणजे परमात्म्यापासून प्राणी देह धारण करून उत्पन्न होतात, आणि उत्पन्न होऊन परमात्म्याच्या योगानें वाढतात. प्राणी परमात्म्यास खातात म्हणजे त्याच्या योगानें उपजीवन करितात, आणि परमात्मा प्राण्यांना खातो म्हणजे त्यांचा संहार करितो. )

कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्या
याथातथ्यतोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः[१] ।

( म्हणजे सर्वज्ञ, मनानें सर्वांचा नियमन करणारा, सर्वांहून श्रेष्ठ, दुसऱ्याच्या आश्रयावांचून असणारा असा हरी अनादिकालापासून योग्य प्रकारें पदार्थ निर्माण करिता झाला. )

तस्मै स होवाच प्रजाकामोवै प्रजापतिः सतोऽतप्यत
सतपस्तप्त्वा समिथुनमुत्पादयते रयिंच प्राणंचेत्येतौ
मेबहुधा प्रजाः करिष्यत इति[२] ॥ ४ ॥

( म्हणजे पिप्पलादऋषि हा कात्यायन ह्यास असें म्हणाला कीं, ब्रम्हदेव इत्यादि प्रजेच्या पालन करणाऱ्या परमेश्वरानें प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा केली, व काय करावें ह्याविषयीं त्यानें विचार केला. मग त्यानें विचार करून रयि व प्राण हे दोघे माझी अनेक प्रकारची प्रजा उत्पन्न करतील असें समजून तें स्त्रीपुरुषांचें जोडपें उत्पन्न केलें.)

---

१. ईशोपनिषत्.

२. प्रश्नोपनिषत् ( प्र० १ ).

अन्नंवै प्रजापतिस्ततोहवै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः

प्रजायंत इति[1] ॥ १४ ॥

( म्हणजे अन्न हें प्रजापति आहे. त्यापासून रेत उत्पन्न होतें, त्या रेतापासून ही प्रजा उत्पन्न होते. )

आत्मनएषप्राणोजायते । यथैषापुरुषेछायैतस्मिन्नेत-

दाततंमनोकृतेनायात्यस्मिन् शरीर[1] ॥ ३ ॥

( म्हणजे मुख्य प्राण हा परमात्म्यापासून उत्पन्न होतो. जशी मनुष्याची सावली त्याजवर अवलंबून असते, तसें परमात्म्यावर हे सर्व अवलंबून आहेत. परमात्म्याच्या इच्छेनें मुख्यप्राण हा शरीरामध्यें येतो. )

ब्रह्मादेवानां प्रथमः संबभूव विश्वस्यकर्ता

भुवनस्यगोप्ता ।

( म्हणजे देवांमध्यें जगताचा कर्ता व भुवनाचा संरक्षण करणारा असा ब्रह्मदेव हा परमात्म्यापासून उत्पन्न झाला. )

यथोर्णनाभिः सृजते गृण्हतेच यथा पृथिव्यामोषधयः

संभवंति । यथासतः पुरुषात् केशलोमानितथाऽक्ष-

रात् संभवतीह विश्वं[2] ॥ ७ ॥

( म्हणजे जसा कोष्टी आपले पोटांतून जाळें बाहेर काढितो व पुनः आंत घेतो, जशा वनस्पति पृथ्वीवर उत्पन्न होतात; जसें जिवंत मनुष्याच्या शरिरांतून केंस उत्पन्न होतात, तसें ब्रह्मापासून विश्व उत्पन्न होतें. )

---

१. प्रश्नोपनिषत् प्र० ३.

२. मुंडकोपनिषत्, मुं० १.

तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात् पावकाद्विस्फुलिंगाः
सहस्रशः प्रभवंते सरूपाः । तथाऽक्षराद्विविधाः
सोम्यभावाः प्रजायंते तत्र चैवापियंति ॥ १ ॥
एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ।
खंवायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ ३ ॥
तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात् पर्जन्य
ओषधयः पृथिव्यां । पुमान् रेतः सिंचति योषितायां
बव्हीः प्रजाः पुरुषात् संप्रसूताः ॥ ५ ॥
तस्मादृचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वेक्रत-
वो दक्षिणाश्च । संवत्सरंच यजमानश्च लोकाः
सोमोयत्र पवते यत्र सूर्यः ॥ ६ ॥
तस्माच्चदेवा बहुधा संप्रसूताः साध्यामनुष्याः
पशवो वयांसि । प्राणापानौ व्रीहियवौ तपश्चश्रद्धा
सत्यंब्रह्मचर्यं विधिश्च ॥ ७ ॥ सप्तप्राणाः प्रभवंति-
तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्तहोमाः । सप्त इमेलोका
येषुचरंति प्राणा गुहाशया निहिताः सप्तसप्त ॥ ८ ॥
अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मान् स्यंदंते सिंध-
वः सर्वरूपाः । अतश्च सर्वा ओषधयो रसाश्चये
नैषभूतैस्तिष्ठतेह्यंतरात्मा ॥ ९ ॥

( म्हणजे पुढें सांगतों हें खरें आहे. हे सोमयज्ञ करणाऱ्या; जशा चांगल्या पेटलेल्या अग्नीपासून सारख्या प्रकारच्या ठिणग्या निघतात, तसें परमेश्वरापासून अनेक प्रकारचे पदार्थ उत्पन्न होतात. ते त्याच्या-मध्येंच लय पावतात ॥ १ ॥ परमेश्वरापासून प्राण, मन, व सर्व इंद्रियें,

१. मुंडकोपनिषत्, मुं० २ खं० १.

आकाश, वायु, तेज, आप, विश्वाला धारण करणारी पृथ्वी, हीं [ व ह्यांच्या अभिमानी देवता ] उत्पन्न होतात ॥ ३ ॥ ज्या अग्नीला पोषण करणाऱ्या समिधा सूर्य आहे तो अग्नि परमेश्वरापासून उत्पन्न झाला. चंद्रापासून पाऊस उत्पन्न झाला. पृथ्वीवर वनस्पती उत्पन्न झाल्या. परमेश्वर आपल्या बायकोच्या ठिकाणीं रेत टाकितो. नंतर परमेश्वरापासून बहुत प्रजा उत्पन्न होते ॥ ५ ॥ परमेश्वरापासून ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, मौंजी इत्यादिक संस्कार, यज्ञ, सोमयाग, दक्षिणा, वर्ष, यज्ञ करणारा, व जेथें सूर्यचंद्र फिरतात असे लोक, हे उत्पन्न झाले॥६॥ त्या भगवंतापासून [ बायकांच्या साधनानें ] अनेक प्रकारचे देव उत्पन्न झाले. तसेंच साध्यनामक देव, मनुष्यें, जनावरें, पांखरें, प्राण व अपान, तांदूळ व सातू, तप, श्रद्धा, सत्य, ब्रह्मचर्याचीं कर्में व विधि हीं उत्पन्न झालीं ॥ ७ ॥ त्या भगवंतापासून [ बायकोच्या द्वारानें ] सात इंद्रियें उत्पन्न होतात. सात इंद्रियांच्या वृत्तिरूप ज्या ज्योती त्यांचे विषय हे समिधा होत. विषयांचे इंद्रियांशीं जे संबंध ते होम होत. ज्या ठिकाणीं प्राण राहून संचार करितो तीं ठिकाणें सात लोक होत. जिचें स्थान ऱ्हदयगुहा आहे, त्या बुद्धीचे ठिकाणीं ज्ञान उत्पन्न करण्यासाठीं प्रत्येक शरीरांत सात सात प्राण ठेविले आहेत ॥ ८ ॥ ज्या भगवंतानें [ बायकोच्या द्वारानें ] उत्पन्न केलेल्या भूतासहवर्तमान हें अंतर्यामीचें भगवंताचें रूप राहतें त्या भगवंतापासून समुद्र व पर्वत उत्पन्न होतात. ह्यापासून सर्व प्रकारच्या नद्या वाहतात; आणि त्यांच्यापासून सर्व वार्षिक वनस्पती व मधुर इत्यादिक रस उत्पन्न होतात ॥ ९ ॥ )

तदैक्षत बहुस्यांप्रजायेयेति तत्तेजोऽसृजततत्तेज
ऐक्षत बहुस्यां प्रजायेयेति तदपोऽसृजत । तस्माद्यत्र-
क्वचशोचाति स्वेदतेवा पुरुषस्तेजस एव तदध्यापो
जायंते ॥ ३ ॥ ता आपऐक्षंतबव्ह्यःस्याम प्रजाये-

महीति ता अन्नमसृजंत तस्माद्यत्रक्कचवर्षति तदेव-

भूयिष्ठमन्नं भवत्यद्भ्य एव तदध्यन्नाद्यं जायते ॥ ४ ॥ २ ॥

तेषां खल्वेषां भूतानांत्रीण्येव बीजानिभवं-

त्यंडजं जीवजमुद्भिज्जमितिं ॥ १ ॥

( म्हणजे परमेश्वरानें असा विचार केला कीं, जगाचें नियमन करणारा अशा प्रकारें आपण बहुत रूपें घ्यावींत आणि त्यास्तव सृष्टि उत्पन्न करावी, असा विचार करून परमेश्वरानें तेजाची अभिमानी देवता व तेज हीं उत्पन्न केलीं. त्या तेजाभिमानी देवतेनें असा विचार केला कीं, मी ही बहुत रूपानें उत्पन्न व्हावें, आणि त्यास्तव जग उत्पन्न करावें. असा विचार करून त्या तेजाभिमानी देवतेनें उदकाची अभिमानी जी देवता व उदक हीं उत्पन्न केलीं. तेजापासून पाणी उत्पन्न झालें, म्हणून जेव्हां कोणी मनुष्य रडतो किंवा त्यास घाम येतो तेव्हां तेजापासून तें पाणी उत्पन्न होतें ॥ ३ ॥ त्या उदकाभिमानी देवतेनें असा विचार केला कीं, जगाचा नियमन करणारा अशा प्रकारें आपण बहुत रूपें घ्यावींत, आणि त्यास्तव जग उत्पन्न करावें. असा विचार करून त्या उदकाभिमानी देवतेनें पृथ्वीची अभिमानी देवता अन्ननामक रुद्र व पृथ्वी ह्यांस उत्पन्न केलें. ह्मणून जेथें जेथें व जेव्हां जेव्हां पाऊस पडतो तेथें तेथें व तेव्हां तेव्हां पुष्कळ अन्न उत्पन्न होतें. अन्नासुद्धां सर्व पार्थिव पदार्थ पाण्यापासूनच उत्पन्न होतात ॥ ४ ॥ २ ॥ अंडज ह्मणजे पक्षी इत्यादि, जीवज म्हणजे मनुष्य इत्यादि आणि उद्भिज्ज ह्मणजे वृक्ष इत्यादि, ह्या भूतांचीं कारणें पूर्वीं सांगितलेलें तेज, उदक व अन्न हींच आहेत ॥ १ ॥ )

---

१. छांदोग्योपनिषत् प्र० ६ खं० २, ३.

### १७. मुख्यप्राण हा परमात्म्यापासून उत्पन्न झाला.

ह्याविषयीं प्रमाण.

आत्मन एषप्राणोजायते । यथैषा पुरुषेछायैतस्मिन्ने-
तदाततं मनोकृते नायात्यस्मिन् शरीरे[1] ॥ ३ ॥

( म्हणजे मुख्यप्राण हा परमात्म्यापासून उत्पन्न होतो. जशी मनुष्याची सावली त्याजवर अवलंबून असते, तसें परमात्म्यावर हे सर्व अवलंबून आहेत. परमात्म्याच्या इच्छेनें मुख्यप्राण हा शरीरामध्यें येतो. )

सप्राणमसृजतप्राणाच्छ्रद्धां खंवायुर्ज्योतिरापः
पृथिवींद्रियं । मनोऽन्नमन्नाद्वीर्यंतपोमंत्रः
कर्मलोका लोकेषुच नामचे[2] ॥ ४ ॥

( म्हणजे परमेश्वरानें मुख्यप्राणाला उत्पन्न केलें, मुख्यप्राणाच्या साधनानें श्रद्धेची अभिमानी देवता, नंतर आकाश, वायु, तेज, आप, पृथ्वी, इंद्रियें, मन, अन्नापासून धातू, तप, मंत्र, कर्म करण्यास योग्य असे लोक व त्या लोकांचीं नांवें हीं उत्पन्न केलीं. )

### १८. वायु, अग्नि, उदक, पृथिवी, वाणी व मन ह्यांच्या देवता त्यांना आधार आहेत. चक्षुरादिक इंद्रियांच्या देवता त्यांचे विषयांना प्रकाशित करितात.

ह्याविषयीं प्रमाण.

तस्मैसहोवाचाकाशोहवा एष देवो वायुरग्निरापः
पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रंच । ते प्राकाश्याः
अभिवदंति वयमेतद्बाणमवष्टभ्य विधारयामः[3] ॥ २ ॥

---

१. प्रश्नोपनिषत् प्र० ३.

२. प्रश्नोपनिषत् प्र० ६.

३. प्रश्नोपनिषत् प्र० २.

( म्हणजे त्याला पिप्पलाद ऋषि असें बोलला कीं, तोच आकाशाचा अभिमानी देव आहे. वायु, अग्नि, उदक, पृथिवी, ह्यांच्या देवता त्यांना आधार आहेत. वाणी, मन, चक्षु व श्रोत्र ह्या इंद्रियाच्या देवता आपआपल्या विषयांना प्रकाशित करितात. आम्ही ह्या शरीराला आंवरून धरितों असें त्या देवता म्हणाल्या. )

### १९. परमेश्वराच्या एक देशाएवढें सर्व जग आहे.

ह्याविषयीं प्रमाण.

पादोऽस्य सर्वाभूतानि त्रिपादस्यामृतंदिवि इति[1] ।

( म्हणजे परमेश्वराचा पाद सर्व प्राणी आहेत. त्याचा तिसरा पाद स्वर्गलोकीं अमृत आहे. )

सुवर्णकोशं रजसापरीवृतं । देवानां वसुधानीं विराजं ।
अमृतस्य पूर्णांता मुकलां विचक्षते । पादश्वह्वोतुर्न किला विवित्से[1] ।

### २०. परमात्म्याला जग उत्पन्न करण्यास कांहीं साधनें लागत नाहींत.

ह्याविषयीं प्रमाण.

किंस्विदासीदधिष्ठानमारंभणं कतमत्स्वित् कथमासीदिति ।

( म्हणजे परमेश्वराला जग उत्पन्न करण्यास काय आधार होता? आरंभास साधन काय होतें? कसें होतें? काय होतें? )

ऊसोऽकामयत । बहुस्यां प्रजायेयेति । सतपोऽतप्यत ।
इदश्सर्वमसृजत । यदिदं किंच । तत् सृष्ट्वा । तेदवानु प्राविशादिति[2] ।

( म्हणजे प्रलयकालीं असणाऱ्या नारायणानें म्या जग उत्पन्न करावें, मी अनेक रूपें धारण करावीं, अशी इच्छा केली. ह्यास्तव त्यानें विचार

---

१. चित्युपनिषत्.

२. ब्रह्मवल्ली, पृ० २८.

केला आणि विचार करून जें हें जगत आहे तें सर्व आपल्या पोटांतून बाहेर काढिलें. तें जग उत्पन्न करून त्यांत प्रवेश केला. )

तस्मैसहोवाच प्रजाकामोवैप्रजापतिःसतपो
तप्यतसतपस्तप्त्वासमिथुनमुत्पादयतेरयिंच प्राणं
चेत्येतौमेबहुधाप्रजाः करिष्यत इति ॥ ४ ॥ आदि-
त्यो हवै प्राणो रयिरेवचंद्रमा रयिर्वाएतत्सर्वंयन्मूर्त्तंचा
मूर्त्तंच तस्मान्मूर्त्तिरेवरयिः[1] ॥ ५ ॥

( ह्मणजे पिप्पलादऋषि कात्यायनास असें ह्मणाला कीं, परमेश्वरानें प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा केली. नंतर त्यानें काय करावें ह्याचा विचार केला, मग त्यानें विचार करून रयि व प्राण हे दोघे माझी अनेक प्रकारची प्रजा उत्पन्न करतील असें समजून तें स्त्रीपुरुषांचें जोडपें उत्पन्न केलें ॥ ४ ॥ प्राण सूर्यांत शिरला व रयि चंद्रात शिरली. हें सर्व रयि आहे. तेज, उदक इत्यादि जे मूर्तिमान व प्रकृति इ० जे अमूर्तिमान त्या दोघांचा समुदाय निरनिराळा करून जें मूर्त तें रयि आहे ॥ ५ ॥ )

तपसाचीयतेब्रह्मततोऽन्नमभिजायते । अन्नात्प्राणो
मनः सत्यंलोकाः कर्मसुचामृतं[2] ॥ ८ ॥

( ह्मणजे सृष्टि उत्पन्न करावी असा ब्रह्मानें विचार केला. त्यापासून अन्न उत्पन्न झालें, अन्नापासून प्राण उत्पन्न झाला, प्राणापासून मन, सत्य व कर्मे केल्यापासून होणारें स्वर्गादिक फल हीं उत्पन्न झालीं. )

---

१. प्रश्नोपनिषत्. प्र० १.

२. मुंडकोपनिषत्. मुं० १.

**२१. जीव हा परमेश्वराचें प्रतिबिंब आहे. परमेश्वर स्वतंत्र आहे. जीव हा पराधीन आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपंरूपं प्रतिरूपोबभूव ।
एकस्तथा सर्वभूतांतरात्मा रूपंरूपंप्रतिरूपोबहिश्र्च ॥ ९ ॥

( म्हणजे जसा चेतन अग्नि स्वयंपाक इत्यादि करणारा एकच असतो तथापि त्या चेतन अग्नीचें प्रत्येक रूप प्रतिबिंब आहे. तसा सर्व प्राण्यामध्यें असलेला परमेश्वर एक स्वतंत्र असून त्या भगवंताचें प्रत्येक रूप प्रतिबिंब आहे व तो प्राण्यांचे बाहेरही आहे. )

वायुर्यथैको भुवनं प्रविष्टोरूपंरूपं प्रतिरूपोबभूव ।
एकस्तथासर्वभूतांतरात्मारूपंरूपं प्रतिरूपोबहिश्र्च

( म्हणजे जगतामध्यें प्रवेश केलेला चेतन वायु जसा एक असूनही त्याचें प्रत्येक रूप प्रतिबिंब आहे, तसा सर्व प्राण्यांचे ठिकाणीं असणारा परमेश्वर स्वतंत्र असून त्याचे प्रत्येक रूप प्रतिबिंब आहे व तो प्राण्यांच्या बाहेरही आहे. )

सूर्योयथासर्वलोकस्य चक्षुर्नलिप्यतेचाक्षुषैर्बाह्य-
दोषैः । एकस्तथा सर्वभूतांतरात्मा नलिप्यते लोक
दुःखेनबाह्यः ॥ ११ ॥

( म्हणजे जसा सूर्य सर्व लोकांचा चक्षु म्हणजे दृष्टीचें नियमन करणारा चक्षु नांवाचा देव डोळ्यांत राहणारा आहे, तथापि बाहेरील डोळ्यांचे दोष त्याला लागत नाहींत, तसा सर्व प्राण्यांचे ठिकाणीं असणारा भगवान स्वतंत्र व प्राण्यांचे बाहेर असून तो लोकांच्या दुःखानें लिप्त होत नाहीं. )

---

१. काठकोपनिषत् । ( अ० २ व० ५ ).

## २२. सर्व देवतांमध्यें मुख्यप्राण हा श्रेष्ठ आहे.

ह्याविषयीं प्रमाण.

तान् वरिष्ठः प्राणउवाच । मामोह मापद्यथाऽहमेवैतत्
पंचधात्मानं विभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति[1] ॥ ३ ॥

( म्हणजे त्या देवतांस श्रेष्ठ मुख्यप्राण असें बोलला कीं, तुम्ही अशा वेडेपणांत शिरूं नका, कारण ह्या शरीरामध्यें मी प्राण, अपान, व्यान, उदान व समान अशीं पांच रूपें धारण करून ह्या शरीरास आवरून धारण करितों. )

एषोऽग्निस्तपत्येष सूर्यएषपर्जन्यो मघवानेषवायुरेषपृथिवी-
रयिर्देवः सदसच्चामृतंचयत् ॥ ५ ॥

( म्हणजे हा मुख्यप्राण अग्नीचें नियमन करणारा अशा रूपानें अग्नीचें ठिकाणीं राहून तोच अग्नीच्या रूपानें तापतो. हा सूर्य होऊन प्रकाशतो. हा पर्जन्य होऊन वर्षाव करितो, हा इंद्र होऊन पालन करितो, वायु होऊन वाहतो, हा पृथ्वी होऊन आधार देतो. हा चंद्र होऊन पोषण करितो. हा देव आहे. जें सत् व असत् व मोक्षरूप आहे तें प्राण आहे. )

अराइवरथनाभौ प्राणेसर्वं प्रतिष्ठितं ।
ऋचोयजूꣳषिसामानि यज्ञः क्षत्रंब्रम्हचं ॥ ६ ॥

( म्हणजे जशा गाडीच्या चाकांच्या तुंब्यावर अवलंबून अऱ्या असतात, तसें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यज्ञ, क्षत्र, व ब्रम्ह हे सर्व मुख्यप्राणाचे ठिकाणीं राहतात. )

प्राणस्येदंवशेसर्वंत्रिदिवे यत्प्रतिष्ठितं ।
मातेव पुत्रान् रक्षस्वश्रीश्च प्रज्ञांच विधेहिन इति ॥ १३ ॥

---

1. प्रश्नोपनिषत्. प्र॰ २.

( म्हणजे त्रैलोक्यामध्यें जें काय आहे तें सर्व प्राणाच्या अधीन आहे. तूं आईप्रमाणें पुत्राचें रक्षण कर. आम्हाला संपत्ति व बुद्धि दे. )

योहवैज्येष्ठंचश्रेष्ठंचवेदज्येष्ठश्च हवैश्रेष्ठश्चभवति

प्राणोवावज्येष्ठश्चश्रेष्ठश्च[1] ॥ १ ॥

( म्हणजे जो सर्व देवांमध्यें वयानें अधिक असून गुणांनीं उत्तम आहे त्याला जो जाणतो तो मुक्त होऊन आपल्या बरोबरीच्या लोकांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. मुख्यप्राण हाच सर्व देवांमध्यें वयानें अधिक असून गुणांनीं उत्तम आहे. )

प्राणोवा आशाया भूयान्यथावाअरानाभौसमर्पिता

एवमस्मिन् प्राणेसर्वꣳ समर्पितं प्राणः प्राणेन याति प्राणः

प्राणं ददाति प्राणायददाति प्राणो हपिता प्राणोमाता

प्राणोभ्राता प्राणःस्वसाप्राणआचार्यः प्राणोब्राम्हणः ॥ १ ॥

( म्हणजे प्राण हा आशेपेक्षां श्रेष्ठ आहे. जसें चाकाच्या तुंब्याचे ठिकाणीं अरा मिळालेल्या असतात, तसें मुख्यप्राणाच्या ठिकाणीं सर्व जगत् अर्पण केलें आहे. मुख्यप्राणाचें नियमन परमेश्वर करतो. तो मुख्यप्राणाला पाहिजे तें देतो. मुख्यप्राण हा ज्ञानाच्या योगानें शिष्याला परमात्मा दाखवितो. प्राण हा बाप आहे, प्राण हा आई आहे, प्राण हा भाऊ आहे, प्राण हा बहीण आहे, प्राण हा गुरु आहे, प्राण हा ब्राम्हण आहे. )

योहवै ज्येष्ठंच श्रेष्ठंच वेद ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां

भवति प्राणोवैज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च-

स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥ १ ॥

---

१. छांदोग्योपनिषत्. प्र० ७ खं० १५.

२. बृहदारण्यकोपनिषत्. अ० ६ ब्रा० १.

( म्हणजे जो सर्वांपेक्षां वयानें मोठा व गुणांनीं श्रेष्ठ आहे त्याला जो जाणतो तो आपल्या बरोबरीच्या लोकांमध्यें मोठा व श्रेष्ठ होतो. प्राण हा वयानें मोठा व गुणांनीं श्रेष्ठ आहे, हें जाणणारा ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. आणखी तो ज्या लोकांमध्यें मोठा व श्रेष्ठ होण्याची इच्छा करील त्यांमध्येंही श्रेष्ठ होतो. )

**२३. परमेश्वराच्या अधीन सर्व असून त्याच्या आज्ञेंत व आश्रयानें आहेत.** ह्याविषयीं प्रमाण.

एतस्य वाअक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्या चंद्रमसो
विधृतौ तिष्ठत इति ।

(म्हणजे, हे गार्गि, ह्या परमात्म्याच्या आज्ञेंत सूर्य व चंद्र असतात.)

समार्धगर्भा भुवनस्य रेतोविष्णोस्तिष्ठंति प्रदिशाविधर्मणि
चतुर्थिः साकं नवतिंच नामभिश्चक्रं न वृत्तं व्यतींरवीविपदिति ।
एकः शास्ता न द्वितीयोस्ति शास्ता योहृच्छयस्तमहमिहब्रवी-
मि नकेवलं मे भवतश्च राजन् सर्वैबलं बलिनांचा-
परेषा मित्यादेश्च श्रुतिः ।

( म्हणजे शिक्षा करणारा एक असून शिक्षा करणारा दुसरा नाहीं. जो हृदयांत राहतो त्याविषयीं मी तुला सांगतों. हे राजा, मला केवळ तुझेंच बळ आहे असें नाहीं. तो परमेश्वर सर्व बळवानांचें बळ आहे.)

भीषास्माद्वातः पवते भीषोदेतिसूर्य इत्यादि श्रुतिः ।

( ह्मणजे त्याच्या भयानें वायु वाहतो. त्याच्या भयानें सूर्य उगवतो. )

एतस्य वाअक्षरस्य प्रशासने गार्गि प्राच्योन्या नद्यःस्यं-
दंते या श्वेतेभ्यः पर्वतेभ्यः प्रतीच्यो ऽन्या यां यांच दिशमनु इति।

( म्हणजे हे गार्गि, पूर्वेस वाहणाऱ्या व दुसऱ्या नद्या ह्या परमेश्वराच्या आज्ञेनें वाहतात. ज्या ह्या पर्वतापासून निघालेल्या पश्चिमेकडे वहात जाणाऱ्या व दुसऱ्या निरनिराळ्या दिशांनीं वहात जाणाऱ्या सर्व नद्या परमेश्वराच्या आज्ञेनें वाहतात. )

यस्मिन् द्यौः पृथिवी चांतरिक्ष मोतंमनः सहप्राणैश्च सर्वैः
तमेवैकं जानथात्मानामिति ।

( म्हणजे ज्याच्या ठिकाणीं स्वर्ग, पृथ्वी, अंतरिक्ष, आणि सर्व प्राणासह मन ओविलेलें आहे त्याच एका परमेश्वराला जाणा. )

यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या अंतरोऽयं पृथिवी न वेद यस्य
पृथिवी शरीरं यः पृथिवी मंतरोयमयत्येषत आत्मांतर्याम्यमृत इति ।

( म्हणजे जो पृथ्वीच्या ठिकाणीं राहून पृथ्वीच्या आंत असून ज्याला पृथ्वी जाणत नाहीं, पृथ्वी ही ज्याचें शरीर आहे, जो पृथ्वीच्या आंत राहून तिचें नियमन करितो, तो तुझा अविनाशी आंत राहणारा परमात्मा आहे. )

भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः ।
भयादिंद्रश्चवायुश्च मृत्युर्धावति पंचमः ॥ ३ ॥

( म्हणजे परमेश्वराच्या भयानें अग्नि उष्ण होतो. त्याच्या भयानें सूर्य तापतो. त्याच्या भयानें इंद्र व वायु व पांचवा मृत्यु हे अनुक्रमें पाऊस पाडणें इत्यादि आपआपल्या कामाला धांवतात. )

अरा इव रथनाभौ संहता यत्र नाड्यः स एषोऽतश्चरते
बहुधा जायमानः ॐ मित्येवंध्यायथ आत्मानंस्वस्ति
वः पारायतमसः परस्तात् ॥ ६ ॥

---

१. काठकोपनिषत्, अ० २ व० ६.

( म्हणजे गाडीच्या चाकाच्या तुंब्याचे ठिकाणीं जशा अरा मिळाल्या असतात, तशा शरीरांत असलेल्या नाडी परमेश्वराच्या ठिकाणीं मिळाल्या आहेत तो परमेश्वर अनेक रूपांनीं प्रगट होऊन शरीरांत संचार करितो. अज्ञानाच्या पलीकडे असणारी जी प्रकृति तिच्याहून श्रेष्ठ असलेल्या परमेश्वराचें ज्ञान होण्यास्तव तो सकलगुणपूर्ण आहे असें जाणावें. अशा ज्ञानानें तुमचें कल्याण होईल. )

**२४. मुख्यप्राण हा उदानवायूचे ठिकाणीं राहून सुषुम्ना-नाडीनें बाहेर पडतो.** ह्याविषयीं प्रमाण.

अथैकयोर्ध्वउदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति
पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकं ॥ ७ ॥

( म्हणजे आतां उदाननामक मुख्यवायु एका [ म्हणजे सुषुम्ना ] नाडीनें वर जातो. पुण्य केल्यास उदाननामक मुख्यवायु जीवाला स्वर्गादि पुण्य लोकांस नेतो, व पाप केल्यास पापलोकांस नेतो, व दोन्हीं सारखीं असल्यास मनुष्यलोकांस नेतो. )

**२५. उदाननामक मुख्यवायु शरीरांतून गेल्यास मनुष्य मरण पावतो.** ह्याविषयीं प्रमाण.

तेजो हवै उदानस्तस्मादुपशांततेजाः ।
पुनर्भवमिंद्रियैर्मनसि संपद्यमानैः[1] ॥ ९ ॥

( म्हणजे बाहेरील तेजास धारण करणारा जो उदाननामक मुख्य-वायु आहे तो उदान वायूस धारण करितो. म्हणून जो मनुष्य तेजहीन होतो तो मनांत सर्व इंद्रियांचा लय होऊन मरण पावतो. )

---

१. प्रश्नोपनिषत्. प्र० ३.

**२६. मरणाचे वेळीं जशी इच्छा करावी तसें शरीर प्राप्त होतें.** ह्याविषयीं प्रमाण.

यच्चित्तस्तेनैष प्राण मायाति प्राणस्तेजसायुक्तः ।
सहात्मनायथासंकल्पितं लोकं नयति[1] ॥ १० ॥

( म्हणजे मनुष्य मरणसमयीं जो विषय मनांत आणितो त्यासुद्धां तो मुख्यप्राणाजवळ जातो. मग मुख्यप्राण हा उदानवायूनें युक्त असलेल्या परमेश्वरासहवर्तमान जीवाला त्यानें इच्छिलेल्या शरीरांत नेतो. )

**२७. निद्रावस्थेंत चक्षुरादिक इंद्रियांच्या देवता मनाच्या देवतेंत लय पावतात, म्हणून जीवाला श्रवणादिक व्यापाराचा अनुभव येत नाहीं. ह्या वेळीं मुख्य प्राणाचीं रूपें अग्नीच्या रूपानें जागी राहून आपले व्यापार करितात. सुषुप्तिकालीं मनाचाही लय हृदयांतील परमेश्वराचे ठिकाणीं होतो, तेव्हां जीव स्वप्नेंही पाहत नाहीं आणि तो परमेश्वराजवळ गेल्यानें त्यास सुख वाटतें.** ह्याविषयीं प्रमाण.

तस्मै सहोवा च । यथागार्ग्य मरीचयोऽर्कस्यास्तं
गच्छतःसर्वाएतस्मिन् तेजोमंडलएकीभवंति ।
ताः पुनः पुनरुदयतः प्रचरंत्येवंहवैतत्सर्वंपरे
देवेमनस्येकीभवति । तेनतर्ह्येषपुरुषोनशृणोति
नपश्यति न जिघ्रति नरसयते नस्पृशते नाभिवदते
नादत्ते नानंदयते न विसृजते नेयायते स्वपिती
त्याचक्षते[1] ॥ २ ॥

---

१. प्रश्नोपनिषत्. प्र० ३.

१. प्रश्नोपनिषत्. प्र० ४.

( म्हणजे त्याला पिप्पलादऋषि असें बोलला कीं, हे गार्ग्य, सूर्य मावळला असतां जशी त्याची सर्व किरणें त्याचे तेजमंडलांत एक होऊन राहतात, आणि तो उगवला म्हणजे तीं किरणें पुनः बाहेर पडतात तशा चक्षुरादिक इंद्रियांच्या देवता मनाच्या देवतेच्या ठिकाणीं असणाऱ्या परमेश्वरामध्यें राहतात. तेणेंकरून अशा वेळीं जीव ऐकत नाहीं, पहात नाहीं, वास घेत नाहीं, रुचि घेत नाहीं, स्पर्श करीत नाहीं, बोलत नाहीं, घेत नाहीं, आनंदवीत नाहीं, मलमूत्र वगैरे टाकीत नाहीं, जात नाहीं, म्हणून त्यास " स्वपिति " असें विद्वान म्हणतात. )

### २८. परमेश्वर हा प्राण्यांच्या हृदयांत आहे.

ह्याविषयीं प्रमाण.

योवेद निहितं गुहायांपरमेव्योमन्[१] ।

अणो रणीयान्महतोमहीयानात्मागुहायांनिहितो

ऽस्यजंतोः[२] ।

परेणनाकंनिहितंगुहायांविभ्राजदेतद्यतयोविशंती·

तिश्रुतिः[२] ।

घर्मासमंतात्त्रिवृतंव्यापतुस्तयोर्जुष्टिमा-

तरिश्वाजगामेतिश्रुतिः

सयएषोंऽतर्हृदय आकाशः तस्मिन्नयंपुरुषोमनोमयः[३] ।

यःपूर्वंतपसोजातमद्भ्यः पूर्वमजायत ।

गुहां प्रविश्यतिष्ठंतं योभूतेभिर्व्यपश्यत । एतद्वैतत्[४] ॥६ ॥

या प्राणेनसंभवत्यदितिर्देवतामयी ।

---

१. ब्रम्हवल्ली.

२. नारायणोपनिषत्.

३. शिक्षावल्ली.

४. काठकोपनिषत्. अ० २ व० ४.

गुहां प्रविश्यतिष्ठंतींयाभूतेभिर्व्यजायत । एतद्वैतत् ॥ ७ ॥
अंगुष्ठमात्रः पुरुषोमध्यआत्मनितिष्ठति ।
ईशानोभूतभव्यस्य नततोविजुगुप्सते । एतद्वैतत् ॥ १२ ॥[1]

( म्हणजे अंगठ्या येवढा परमात्मा शरीरामध्यें हृदयांत आहे. तो भूत व भविष्य ह्यांजवर अंमल चालविणारा धनी आहे. म्हणून ज्ञानी मनुष्य आपण आपलें रक्षण करण्यास इच्छित नाहीं. तूं विचारलेला परमात्मा अशा गुणांचा आहे. )

ऊर्ध्वंप्राणमुन्नयत्यपानं प्रत्यगस्यति ।
मध्येवामनमासीनंविश्वेदेवा उपासते[2] ॥ ३ ॥

( म्हणजे [ जो अंगठ्या येवढा आहे म्हणून पूर्वी सांगितलें तो ] प्राणवायूस वर हलण्याला प्रेरणा करितो, आणि अपानवायूस मलमूत्र बाहेर निघण्यास्तव प्रेरणा करितो. हृदयांत असलेल्या वामनाची [म्हणजे परमेश्वराची ] सर्व देव पूजा करितात. )

तस्मैसहोवाच । इहैवांतः शरीरेसोम्यसपुरुषो
यस्मिन्नेताः षोडशकलाः प्रभवंतीति[3] ॥ २ ॥

( म्हणजे पिप्पलाद ऋषि त्यास असें बोलले कीं, हे सोम्य, ज्या परम पुरुषापासून जीवंत शरीराचे प्राणादिक सोळा भाग उत्पन्न होतात तो परमपुरुष ह्या शरीराचें आंत हृदयकमलांत आहे. )

पुरुषएवेदं विश्वंकर्मतपोब्रह्म परामृतं । एतद्योवेद
निहितं गुहायां सोऽविद्याग्रंथिं विकिरतीह सोम्य[4] ॥ १० ॥

---

१. काठकोपनिषत्. ( अ० २ व० ४ ).

२. काठकोपनिषत्. ( अ० २ व० ५ ).

३. प्रश्नोपनिषत्. प्र० ६.

४. मुंडकोपनिषत् मुं० २ खं० १.

( म्हणजे सृष्टि उत्पन्न करण्याचें कर्म व ज्ञान हें जगत् म्हणजे एकंदर धर्मसमुदाय हा मोक्ष नांवाचा व ब्रम्ह शब्दानें दर्शविलेला परमेश्वरच आहे. हे सोमयज्ञांतील रस पिण्यास योग्य शौनकऋषि, हा परमेश्वर प्राण्यांच्या हृदयगुहेंत आहे असें जो जाणतो तो अज्ञानाची गांठ तोडून मुक्तीस जातो. )

आविः सन्निहितं गुहाचरन्नाम महत्पदमत्रैतत् समर्पितं
एजत्प्राणन्निमिषंच यदेतज्जानथ सदसद्वरेण्यं परंविज्ञाना-
द्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥ १ ॥

( म्हणजे ज्याचें स्वरूप नेहमीं प्रगटित आहे, जो सर्वांच्या जवळ आहे, जो हृदयगुहेंत संचार करितो, जो साधूंना प्राप्त होण्यास योग्य आहे, जो प्रसिद्ध आहे, अशा परमेश्वराच्या ठिकाणीं, सामान्य व विशेष चेष्टायुक्त व जाग्रदादि अवस्थामध्यें अनुभवास येणारें असें जें जग तुम्हांस माहीत आहे तें सर्व आश्रय करून राहिलें आहे. परमेश्वर हा मूर्त व अमूर्त ह्या दोहोंहून श्रेष्ठ आहे. तो ब्रम्हदेवापेक्षां श्रेष्ठ आहे, तो प्रजेपेक्षां श्रेष्ठ आहे. )

यःसर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमाभुविदिव्ये ब्रम्हपुरे
ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः । मनोमयः प्राण शरीरनेता
प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं सन्निधाय तद्विज्ञानेन परि
पश्यंति धीरा आनंदरूपममृतं यद्विभाति[१] ॥ ७ ॥

( म्हणजे जो सर्वज्ञ आहे, पूर्णकाम आहे, ज्याचा हा महिमा पृथ्वीवर उघड दिसत आहे, तो परमेश्वर शरीरामध्यें व स्वर्गामध्यें व शरीरांतील आकाशामध्यें राहिला आहे. तो पूर्ण ज्ञानी, प्राणादिक वायु व

१. मुंडकोपनिषत मुं० २ खं० २.

इंद्रियें ह्यांचा प्रेरक आहे. तो देहांत हृदयाचे ठिकाणीं राहिला आहे. जो परमेश्वर आनंदरूप व नाशरहित असा शोभतो, त्याला ज्ञानाच्या योगानें ज्ञानी पहातात. )

वृहच्चतद्दिव्यमचिंत्यरूपं सूक्ष्माच्चतत्सूक्ष्मतरं
विभाति । दूरात्सुदूरे तदिहांतिके च पश्यत्स्विहै
वनिहितं गुहायां[1] ॥ ७ ॥

( म्हणजे ब्रह्म हें देशकाल व गुण ह्यांनीं पूर्ण, अद्भुत, ज्याचें रूप विचार केल्यानें ध्यानांत न येणारें, व अणूपेक्षां लहान अशा प्रकारें शोभतें. तें दूरच्यापेक्षां दूर आहे व जवळच्यापेक्षां जवळ आहे. ज्ञान्यांच्यामध्यें शरीरांत हृदयांतील गुहेंत तें राहिलें आहे. )

अथयदिदमस्मिन् ब्रम्हपुरे दहरं पुंडरीकवेश्म
दहरोऽस्मिन्नंतराकाशस्तस्मिन्यदंतस्तदन्वेष्ट
व्यंतद्वावविजिज्ञासितव्यमिति[2] ॥ १ ॥

( म्हणजे ज्यांत परमेश्वर राहतो, अशा ह्या शरीररूप नगरींत हृदय कमलरूप वाड्यामध्यें जें लहान आकाश आहे त्याच्या आंत जें काय आहे त्याजविषयीं शोध करणें अवश्य आहे. तें जाणण्याची इच्छा करावी असें गुरूनें शिष्यास सांगितलें. )

सवाएषआत्माहृदितस्यैतदेवनिरुक्तंहृदयमिति
तस्मात्हृदयमहरहर्वाएवंवित्स्वर्गंलोकमेति[3] ॥ ३ ॥

( म्हणजे तो परमात्मा हृदयकमलांतील आकाशांत आहे. त्याला हृदय असें जें नांव सांगावयाचें आहे त्याचें व्याख्यान " हृदि "

---

१. मुंडकोपनिषत्, मुं॰ ३ खं॰ १.

२. छांदोग्योपनिषत्. प्र॰ ८ खं॰ १.

३. छांदोग्योपनिषत्. प्र॰ ८ खं॰ ३.

[ हृदयांत ] आणि " अयते " [ म्हणजे प्राप्त होतो ] असें आहे म्हणून त्याला हृदय असें नांव आहे. जो असें नेहमीं जाणतो तो स्वर्गलोकाला जातो. )

मनोमयोऽयंपुरुषोभा:सत्यस्तस्मिन्नंतर्हृदयेयथा
व्रीहिर्वायवोवासएषसर्वस्येशान:सर्वस्याधिपति:
सर्वमिदं प्रशास्तियदिदंकिंच[1] ॥ १ ॥

( म्हणजे हा परमात्मा ज्ञानमय आहे, प्रकाशरूप आहे, सद्गुणात्मक आहे, व हृदयकमलांत राहणारा आहे. एखादा तांदूळ किंवा जव जेवढा असतो तेवढा परमात्मा जीवाच्या हृदयकमलामध्यें आहे. तो सर्वांचा नियामक आहे. तो सर्वांचा धनी आहे. जें कांहीं जगत आहे त्या सर्वांवर अंमल चालवितो. )

## २९. परमात्मा हा अग्नीमध्यें अनेक रूपांनीं आहे.

ह्याविषयीं प्रमाण.

तस्यमध्ये वन्हिशिखा अणीयोर्ध्वा व्यवस्थित: ।
नीलतोयदमध्यस्थाद्विद्युल्लेखेव भास्वरा ।
नीवारशूकवत्तन्वीपीताभास्वत्यणूपमा ।
तस्या:शिखायामध्येंपरमात्माव्यवस्थित[2]: ।

( म्हणजे आग्नीमध्यें त्याची अति सूक्ष्म ज्वाला वर पसरलेली आहे. ती ज्वाला पाण्याच्या ढगांत असलेल्या विजेप्रमाणें प्रकाशणारी; सावा, राळा, इत्यादि धान्याच्या कणसांच्या लांब शेंड्याप्रमाणें मऊ, पिंवळ्या रंगाची; चकचकणारी; व अतिसूक्ष्म पदार्थासारखी आहे. त्या अग्नीच्या ज्वालेमध्यें परमात्मा अनेक रूपांनीं राहिला आहे. )

---

१. बृहदारण्यकोपनिषत्. अ॰ ५ ब्रा॰ ६.

२. नारायणोपनिषत्.

अयमग्निर्वैश्वानरोयोयमंतः पुरुषे येनेदमन्नं

पच्यते यदिद मद्यते तस्यैष घोषो भवति यमेत·

त्कर्णावपिधायशृणोतिसयदोत्क्रामिष्यन्

भवति नैनं घोषंश्शृणोति[१] ॥ १ ॥

( म्हणजे जीवाच्या आंत जो हा परमात्मा आहे तो वैश्वानर नामक अग्नि आहे. प्राणी जें अन्न खातात त्याचें तो पचन करितो. त्या परमात्म्याची स्तुति करण्यास मुख्यवायु जो नाद करितो तो कानावर हात ठेविला असतां ऐकू येतो. जेव्हां तो परमात्मा ह्या देहांतून निघून जातो तेव्हां जीवाला तो नाद ऐकू येत नाहीं. )

**३०. परमेश्वर हा भूः भुवः सुवः व महः ह्या चार व्याहृतींत आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

भुर्भुवःसुवरितिवाएतास्तिस्त्रोव्याहृतयइत्यादि श्रुतिः[२]

( म्हणजे भूः, भुवः, व सुवः ह्याप्रमाणें तीन व्याहृती आहेत, इ०. )

**३१. परमेश्वर हा पृथ्वी, आकाश, इत्यादि ठिकाणीं व सूर्य, चंद्र इत्यादि ठिकाणीं आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

पृथिव्यंतरिक्षंद्यौर्दिशोऽवांतरदिशः ।

( म्हणजे पृथ्वी, आकाश, स्वर्ग, दिशा, दुसऱ्या दिशा हीं लोकपंचकडी आहे. )

हिरण्मये परे कोशे विरजं ब्रम्ह निष्कलं ।

तच्छुभ्रंज्योतिषांज्योतिस्तद्यदात्मविदोविदुः ॥ ९ ॥

---

१. बृहदारण्यकोपनिषत्. अ० ५ ब्रा० ९.

२ शिक्षावल्ली.

( म्हणजे सोन्याच्या उत्तम ब्रम्हांडामध्यें, रजोगुणादिकांनीं रहित, कलारहित, शुभ्र, प्रकाशाला प्रकाश देणारे, अशा सूर्याचे ठिकाणीं असलेल्या परमेश्वराला आत्मज्ञानी जाणतात. )

**३२. परमेश्वर हा ओंकाराच्या ठिकाणीं आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

ओमितिब्रम्ह । ओमितीदꣳसर्वमित्यादिश्रुतिः[1] ।

( म्हणजे ओं हें ब्रह्म आहे. ओं हें सर्व आहे. )

ओँमित्येतदक्षरमिदꣳसर्वंतस्योपव्याख्यानं
भूतंभवद्भविष्यदितिसर्वमोंकार एव । यच्चान्यत्त्रिकाला-
तीतं तदप्योंकारएव[2] ॥ १ ॥

( म्हणजे ओंकाररूप परमात्मा तिन्हीकालीं नाश न पावणारा आहे. तो गुणपूर्ण आहे. त्यास अक्षर म्हणण्याचें कारण सांगतों. ओंकाररूप परमात्मा पूर्वीं होता, आतां आहे, व पुढेंही असणार. म्हणून त्यास अक्षर हा शब्द लागतो. भूत, वर्तमान व भविष्य ह्या तिन्ही काळापासून होणारा विकार ज्यांत नाहीं असें जें लक्ष्मीचें रूप तेंही ओंकाररूप परमात्माच आहे. )

**३३. मनुष्यांत असणारा परमेश्वर व सूर्यांत असणारा परमेश्वर हे एकच आहेत.** ह्याविषयीं प्रमाण.

सयश्चायंपुरुषे । यश्चासावादित्ये । सएकः[3] ।

( म्हणजे जो परमात्मा प्राण्यामध्यें आहे व जो परमात्मा सूर्याचें ठिकाणीं आहे, ते दोन्ही एकच आहेत. )

हिरण्मयेनपात्रेणसत्यस्यापिहितंमुखं[4] ।

---

१. शिक्षावल्ली.

२. मांडुक्योपनिषत्.

३. भृगुवल्ली.

४. बृहदारण्यकोपनिषत्. अ० ५ ब्रा० १५; ईशोपनिषत्.

( म्हणजे प्रकाशमय पात्रानें म्हणजे सूर्यमंडलानें सूर्यमंडलाच्या ठिकाणीं असलेल्या भगवंताचें मुख इत्यादि सर्व शरीर झांकून गेलें आहे.)

तद्यत्तत्सत्यमसौसआदित्योयएषएतस्मिन्मंडलेपुरुषो
यश्चायंदक्षिणेऽक्षन्पुरुषस्तावेतावन्योन्यस्मिन्प्रति-
ष्ठितौ रश्मिभिरेषोऽस्मिन् प्रतिष्ठितः प्राणैरयममुष्मिन्
सयदोत्क्रमिष्यन्भवतिशुद्धमेवैतन्मंडलंपश्यति
नैनमेतेरश्मयः प्रत्यायंति[1] ॥ २ ॥

( म्हणजे हें प्रसिद्ध वासुदेव नामक भगवंताचें रूप सूर्यमंडलामध्यें आहे, व जो सूर्यमंडलामध्यें आहे तो पुरुषाच्या उजव्या डोळ्यामध्यें आहे. हे दोघे एकमेकांच्या आश्रयानें आहेत. सूर्यमंडलामधील परमात्मा किरणें घेऊन डोळ्यांत शिरला आहे, व डोळ्यांतील परमात्मा प्राण घेऊन सूर्यमंडलांत शिरला आहे. ज्या वेळेस डोळ्यांतील परमात्मा त्या शरीरांतून निघून जातो त्या वेळेस मरणपावलेला जीव किरणांनीं हीन असें मंडल पाहतो. किरणें असलीं तथापि त्या जीवाला तीं किरणें परमात्म्याविषयीं ज्ञान होऊं देत नाहींत. )

### ३४. ओंकाररूप परमात्म्याची चार रूपें आहेत.

ह्याविषयीं प्रमाण.

सर्वंह्येतद्ब्रम्हायमात्माब्रम्हसोऽयमात्माचतुष्पात्[2] ॥ २ ॥

( म्हणजे ॐ पदवाच्य परमात्मा पूर्ण आहे. कारण [ तशाविषयीं श्रुति आहे. ] हा लक्ष्मी, ब्रह्मदेव इत्यादिकामध्यें असलेला आत्मा ब्रम्हच आहे. तो आत्मा चार रूपांनीं सर्व जीवांच्या शरीरांत आहे. )

सोयमात्माऽध्यक्षरमोंकारोऽधिमात्रंपादामात्रा
मात्राश्चपादा अकारउकारोमकार इति[2] ॥ ८ ॥

---

१. बृहदारण्यकोपनिषत्. अ० ५ ब्रा० ५.
२. मांडूक्योपनिषत्

( म्हणजे ॐपदवाच्य चतूरूप परमात्मा सर्वांपेक्षां अधिक व नाश न पावणारा व ज्याचे भाग श्रेष्ठ आहेत असा आहे. प्राणवायूचे भाग हे परमात्म्याचीं रूपें आहेत. विश्व हा अकार आहे, तैजस हा उकार आहे, प्राज्ञ हा मकार आहे, [ व तुरीय हा नाद आहे. ] )

**३५. ओंकाररूप परमात्म्याचें पहिलें रूप विश्वनामक आहे व तें अकारानें वाच्य आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

जागरितस्थानो बहिःप्रज्ञः सप्तांग एकोनविंशतिमुखः
स्थूलभुग्वैश्वानरः प्रथमः पादः[1] ॥ ३ ॥

( म्हणजे जीवाचें जागें असण्याचें ठिकाण जे डोळे त्यांत रहाणारें, बाहेरील पदार्थांचें ज्ञान करून देणारें, चार हात, दोन पाय, व सोंड मिळून सात अंगें असलेलें, एकूणीस तोंडें असलेलें, स्थूलपदार्थांचा उपभोग घेणारें, असें वैश्वानरनामक पहिलें रूप आहे. )

जागरितस्थानो वैश्वानरोऽकारः प्रथमा मात्राप्ते
रादिमत्वाद्वाप्नोति हवै सर्वान् कामानादि श्च भवति
य एवंवेद[1] ॥ ९ ॥

( म्हणजे डोळे ज्याचें स्थान आहे, व जो पहिला भाग आहे, असा वैश्वानर हा " अकारवाच्य " आहे, कारण तो योग्य भोग प्राप्त करून देतो. अथवा कारण विश्व हा प्राज्ञ व तैजस ह्यांचें अगोदर असतो. सुषुप्ति व स्वप्न ह्या दोन अवस्थांमध्यें विश्वाचें प्राज्ञ व तैजस ह्यांच्याशीं ऐक्य होतें. नंतर जागें होण्याचें वेळीं प्राज्ञ व तैजस ह्या दोहोंपासून विश्व निराळा होऊन उजव्या डोळ्यांत येतो. विश्व हा अकारवाच्य आहे असें जो जाणतो त्याला विश्व हा योग्य असे सर्व इच्छित पदार्थ मिळवून देतो; आणि विश्व हा त्याचा आदि होतो. )

---

१. माण्डुक्योपनिषत्.

**३६. ओंकाररूप परमात्म्याचें दुसरें रूप तैजस नामक आहे व तें उकारानें वाच्य आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

स्वप्नस्थानोऽतःप्रज्ञः सप्तांगएकोनविंशतिमुखः
प्रविविक्तभुक् तैजसो द्वितीयः पादः[१] ॥ ४ ॥

( म्हणजे ज्या ठिकाणीं राहून जीव स्वप्नांतील पदार्थ पहातो त्या ठिकाणीं म्हणजे गळ्यांत राहणारें, वासनामय पदार्थांचें ज्ञान करून देणारें, चार हात, दोन पाय, व एक सोंड, मिळून सात अंगें असलेलें, एकूणीस तोंडें असलेलें, स्वप्नांतील पदार्थांचा उपभोग आपण घेणारें, व दुसऱ्यास देणारें, असें तैजसनामक दुसरें रूप आहे. )

स्वप्नस्थानस्तैजस उकारो द्वितीया मात्रोत्कर्षादुभय-
त्वाद्वोत्कर्षति ह वै ज्ञानसंततिंसमानश्च भवति नास्या
ब्रम्हवित्कुले भवति य एवंवेद[१] ॥ १० ॥

( म्हणजे कंठांत राहणारा, व दुसरा भाग असा तैजस हा उकारवाच्य आहे. कारण जागृत अवस्थेंतील देहाभिमानापासून जीवास निराळें काढून स्वप्नाकडे जीवाचें आकर्षण करितो, अथवा बाहेरचे पदार्थ न जाणणें अशा प्रकारची निद्रा व वासनामय पदार्थांचा अनुभव ह्या दोहोंविषयीं तैजस फार कारण आहे. जो असें जाणतो त्यास अखंडित ज्ञान प्राप्त होतें, देह बंधापासून त्याचा उद्धार होतो, व मुक्त लोकीं राहतो. त्याच्या कुलांत कोणीही ब्रह्म न जाणणारा असा उत्पन्न होत नाहीं. )

**३७. ओंकाररूप परमात्म्याचें तिसरें रूप प्राज्ञनामक आहे व तें मकारानें वाच्य आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

यत्र सुप्तो न कंचनकामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति

---

१. मांडुक्योपनिषत्.

तत्सुषुप्तम् । सुषुप्तस्थान एकीभूतः प्रज्ञानघनएवानं

दमयोह्यानंदभुक् चेतोमुखः प्राज्ञस्तृतीयः पादः ॥ ५ ॥

( म्हणजे ज्या ठिकाणीं जीव सुखरूप भगवंताप्रत प्राप्त होऊन कोणत्याही पदार्थाची इच्छा करीत नाहीं. व कोणतेंही स्वप्न पाहत नाहीं म्हणजे आपला आत्मा काल व त्याचें अज्ञान ह्याशिवाय दुसरें कांहीं पहात नाहीं, त्या ठिकाणाला “ सुषुप्त ” असें म्हणतात. सुषुप्त ठिकाणीं म्हणजे हृदयाच्या कळीच्या टोंकावर राहणारे, वैश्वानर व तैजस ह्या दोन रूपांशीं एकवट झालेलें, निजल्या वेळीं जीवाचें स्वरूप, अज्ञान, व तेव्हांचा काल ह्या तिहींचें ज्ञान करून देणारें, पूर्णानंद असलेलें, विषयभोग न घेतां आनंदाचा उपभोग घेणारें व देणारें, ज्याचें मुख इत्यादि अवयव ज्ञानरूप आहेत, असें [ जीव स्वरूप, काल, व अज्ञान ] ह्याशिवाय बाहेरील किंवा स्वप्नांतील कोणताही पदार्थ दाखवीत नसल्याकारणानें प्राज्ञनामक तिसरें रूप आहे. )

सुषुप्तस्थानः प्राज्ञोमकारस्तृतीयामात्रामितेर-

पीतेर्वामिनोति हवाइदꣳ सर्वमपीतिश्च भवति-

य एवंवेद ॥ ११ ॥

( म्हणजे हृदयकमलाच्या कळ्यावर राहणारा तिसरा भाग प्राज्ञ हा मकारवाच्य आहे. कारण जीवात्म्यांत तो आपण शिरतो, अथवा प्राज्ञ हा लयास कारण आहे. जो असें जाणतो तो आपल्या योग्यतेप्रमाणें सर्व जगत आपल्यामध्यें आणितो व दुःखादिक सर्व अनिष्टें नाहींशीं करितो. )

---

१. माण्डुक्योपनिषत्.

## ३८. ओंकाररूप परमात्म्याचें चवथें रूप तुरीयनामक आहे.

ह्याविषयीं प्रमाण.

नांतःप्रज्ञं न बहिःप्रज्ञं नोभयतःप्रज्ञं नप्रज्ञानघनं
नप्रज्ञं नाप्रज्ञं । अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणम-
चिंत्यमव्यपदेश्यमैकात्म्य प्रत्ययसारं प्रपंचोपशमं शांतं
शिवमद्वैतंचतुर्थंमन्यंतेसआत्मासविज्ञेयः[1] ॥ ७ ॥

( म्हणजे परमात्म्याचे प्रणवानें दर्शविलेलें जें तुरीयरूप तें स्वप्नांतील पदार्थ दाखविणारे नव्हें, जागृत अवस्थेंतील पदार्थ दाखविणारे नव्हें, बाहेरील पदार्थ दाखवून स्वप्नांतील पदार्थ दाखविणारे असें नव्हें, निजलेल्या जीवास आपलें स्वरूप व अज्ञान दाखविणारें असें नव्हें, ध्यानाच्या वेळीं वासनामय पदार्थ दाखविणारें असें नव्हें, कांहीं एक न जाणविणारें असेंही नव्हें, [ म्हणजे मुक्तांस आपआपल्या योग्यतेप्रमाणें ज्ञान देण्याचा व्यापार करणारें असें आहे ], जसें विश्वादि तीन रूपें बाहेरील व आंतील पदार्थ जाणविण्यावरून अनुमित केलीं जातात तसें नव्हे, मुक्तीवांचून व्यवहार न होण्याजोगें, मुक्तीवांचून ज्ञान न होण्याजोगें, जागृतादि अवस्थेंत जीवांना प्रवृत्ति करणें हें विश्वादिक रूपांचें अनुमान करण्यास जसें कारण आहे तसें ज्याचें अनुमान करण्यास कारण नाहीं असें, स्वतः चिंतन करण्यास अशक्य, दुसऱ्याला सांगण्यास अशक्य, मुख्य, पूर्णज्ञानरूप व आनंदरूप असें, प्रपंच्याचा नाश करणारें असें, शांत, कल्याणकारक, अहंकार व ममता इत्यादि भ्रम नाहींसें करणारें, अशा प्रकारचें परमात्म्याचें तुरीयरूप आहे. असे ब्रम्हादिक विद्वान मानितात. चार रूपांनीं युक्त असा परमात्मा आहे. )

---

१. मांडुक्योपनिषत्.

अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपंचोपशमःशिवोऽद्वैत
एवमोंकारआत्मैवसंविशत्यात्मनाऽऽत्मानं यएवं
वेदयएवं वेद² ॥ १२ ॥

( ह्मणजे [ जसें विश्व व तैजस हे प्राज्ञाशीं एक होत असून पुनः त्यापासून निराळे होत असल्यामुळें तें अंश आहेत तसे नसल्यामुळें ] तुरीयरूप भागरहित आहे. मुक्त झाल्यावांचून त्याच्याशीं व्यवहार होण्याजोगें तें नाहीं. तें प्रपंच्याचा नाश करणारे, चवथें, व नादानें वाच्य असें आहे. जो असें जाणतो तो अभिमान रहित होऊन परमेश्वराच्या कृपेनें नादानें दर्शविलेल्या तुरीयरूपांत प्रवेश करितो. )

### ३९. जीव व परमात्मा हे दोघे निरनिराळे आहेत.

ह्याविषयीं प्रमाण.

द्वासुपर्णासयुजासखायासमानं वृक्षं परिषस्वजाते
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति¹ ॥ १ ॥

( म्हणजे नेहमीं मिळून असणारें व मित्र असे दोन पक्ष्यांच्या रूपानें ईश्वर व जीव हे देहरूप एकच झाडाला चिकटून आहेत. त्यांपैकीं एक म्हणजे जीव हा अश्वत्थाचें फलरूप देहानें केलेल्या कर्माचें फळ गोड म्हणून खातो, व दुसरा ह्मणजे ईश्वर हा जीवाचें कर्माच्या फलांचा उपभोग न घेतां आसमंतात प्रकाशतो. )

यद्वाचानभ्युदितं येनवागभ्युद्यते । तदेवब्रम्हत्वं विद्धि
नेदं यदिदमुपासते¹ ।

( म्हणजे जें वाणीनें पूर्णपणें वर्णिलें जात नाहीं, परंतु ज्यानें प्रेरणा केली असतां जीवाकडून वाणी उच्चारिली जाते, असें जें तोच परमेश्वर आहे असें जाण. जीव हा परमेश्वर आहे असें समजूं नको. )

---

२. मांडुक्योपनिषत्.

यन्मनसानमनुतेयेनाहुर्मनोमतं । तदेवब्रम्हत्वं
विद्धिनेदं यदिद मुपासते[१] ।

( म्हणजे जें मनानें पूर्णपणें चिंतिलें जात नाहीं परंतु ज्यानें प्रेरणा केली असतां जीव मनानें मनन करितो, असें जें तो परमेश्वर आहे असें जाण. जीव हा परमेश्वर आहे असें समजूं नको. )

यच्चक्षुषा न पश्यति येनचक्षूंषि पश्यति । तदेव
ब्रम्हत्वं विद्धि नेदं यदिदमुपासते[१] ।

( म्हणजे जें डोळ्यानें पूर्णपणें पाहिलें जात नाहीं, परंतु ज्यानें प्रेरणा केली असतां जीव डोळ्यांनीं पहातात, असें जें तो परमेश्वर आहे असें जाण. जीव हा परमेश्वर आहे असें समजूं नको. )

यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतं । तदेव ब्रम्हत्वं
विद्धि नेदं यदिदमुपासते[१] ।

( म्हणजे जें कानानें पूर्णपणें ऐकिलें जात नाहीं परंतु ज्यानें प्रेरणा केली असतां जीव कानानें ऐकितो असें जें तो परमेश्वर आहे असें जाण. जीव हा परमेश्वर आहे असें समजूं नको. )

यत्प्राणेन न प्राणितियेन प्राणः प्रणीयते ।
तदेव ब्रम्ह त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते[१] ।

( म्हणजे जें मुख्य प्राणाकडून प्रेरित होत नाहीं, परंतु ज्याच्याकडून मुख्यप्राण प्रेरित होतो, असें जें तो परमेश्वर आहे असें जाण. जीव हा परमेश्वर आहे असें समजूं नको. )

ऐतदात्म्यमिदꣳ सर्वंतत्सत्यꣳ स आत्मा तत्वमसि
श्वेतकेतो इतिभूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति
तथासोम्येति होवाच[२] ॥ ८ ॥

---

१. केनोपनिषत्.
२. छांदोग्योपनिषत् प्र० ६ खं० ८.

( म्हणजे हें सर्व जगत ह्या परमेश्वराच्या अधीन आहे. परमेश्वर व्याप्त असल्यामुळें तत् आहे, साधु पुरुष असल्यामुळें सत्य आहे, दैत्यांचा नाश करितो म्हणून सः आहे, पूर्णगुण असल्यामुळें आत्मा आहे. असा आहे म्हणून; हे श्वेतकेतु, परमात्मा नव्हेस असा तूं आहेस. तेव्हां आपल्या देहांत आपणांहून निराळा असा परमेश्वर असल्याचें समजुतीस येत नसल्यामुळें श्वेतकेतु बापास असें ह्मणाला कीं, तुम्ही मला आणखी समजून सांगा. असें म्हणाल्यावर बाप म्हणाला, बरें तुझ्या शंकेचें समाधान होईल असें सांगतों. )

सयएषोऽणिमैतदात्म्यमिदꣳसर्वंतत्सत्यꣳस
आत्मा तत्वमसि श्वेतकेतो इतिभूयएवमाभग
वान् विज्ञापयत्विति तथासोम्येतिहोवाचं ॥ १ ॥

( ह्मणजे परमेश्वर हा सत्य असल्यामुळें सः, ज्ञानरूप असल्यामुळें यः, सर्वांना इष्ट असल्यामुळें एषः, परिमाणांमध्यें अति सूक्ष्म असल्यामुळें अणिमा, असा आहे. हें सर्व जगत ह्या परमात्म्याचे अधीन आहे. [ पुढें अर्थ वर सांगितल्याप्रमाणें समजावा. ] )

जीवापेतंवावकिलेदंम्रियतेनजीवोम्रियत इति
सयएषोऽणिमैतदात्म्यमिदꣳसर्वंतत्सत्यꣳसआ-
त्मा तत्वमसि श्वेतकेतो इतिभूयएवमा भगवान् वि-
ज्ञापयत्विति तथासोम्येति होवाचं ॥ २ ॥

( म्हणजे परमेश्वरानें शरीराला सोडिलें असतां हा संसारी लोकांचा समुदाय मरतो, परमेश्वर मरत नाहीं. [ पुढें अर्थ वर सांगितल्याप्रमाणें समजावा. ] )

---

१. छांदोग्योपनिषत्. प्र० ६ खं० ९.

२. छांदोग्योपनिषत्. प्र० ६ खं० ११.

श्रद्धत्स्वसोम्येति सयएषोऽणिमैतदात्म्यमिदꣳसर्वं
तत्सत्यꣳसआत्मा तत्वमसि श्वेतकेतो इतिभूयएव
माभगवान्विज्ञापयत्विति तथासोम्येतिहोवाच[1] ॥ ३ ॥

( म्हणजे, हे मुला, तूं ह्या गोष्टीवर विश्वास ठेव. ज्याच्या सामर्थ्यानें वड उत्पन्न होतो तो परमेश्वर सत्य आहे म्हणून सः, [ पुढील अर्थ वर सांगितल्याप्रमाणें समजावा. ] )

सयएषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वंतत्सत्यꣳ स
आत्मा तत्वमसिश्वेतकेतो इतिभूयएवमाभगवान्
विज्ञापयत्वितितथासोम्येति होवाच[2] ॥ ३ ॥

( [ वर सांगितल्याप्रमाणें अर्थ समजावा. ] )

सययातत्रनादाह्येतैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ
स आत्मा तत्वमसि श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति
विजज्ञाविति[3] ॥ २ ॥

( म्हणजे तो जेणेंकरून त्या ठिकाणीं जळत नाहीं त्या परमेश्वराच्या स्वाधीन हें सर्व जगत आहे. [ बाकीचा अर्थ वर सांगितल्याप्रमाणें समजावा. ] )

मघवन्मर्त्यंवाइदꣳशरीरमात्तं मृत्युना तदस्यामृत-
स्या शरीरस्यात्मनोऽधिष्ठानमात्तो वै स शरीरः प्रिया-
प्रियाभ्यांनवैसशरीरस्यसतः प्रियाप्रिययोरपहतिर-
स्त्यशरीरंवावसंतं न प्रियाप्रिये स्पृशतः ॥ १ ॥

---

१. छांदोग्योपनिषत्. प्र० ६ खं० १२.

२. छांदोग्योपनिषत्. प्र० ६ खं० १३,१४,१५.

३. छांदोग्योपनिषत्. प्र० ६ खं० १६.

अशरीरो वायुरभ्रं विद्युत्स्तनयित्नुरशरीराण्येतानित-
द्यथैतान्यमुष्मादाकाशात्समुत्थायपरंज्योतिरूपसंपद्य
स्वेनरूपेणाभिनिष्पद्यंते ॥ २ ॥ एवमेवैषसंप्रसादोऽस्मा-
च्छरीरात्समुत्थायपरंज्योतिरूपंसंपद्यस्वेनरूपेणाभि-
निष्पद्यते सउत्तमः पुरुषः सतत्रपर्यैति जक्षन् क्रीडन्
रममाणः स्त्रीभिर्वायानैर्वाज्ञातिभिर्वानोपजनंस्मर-
न्निदंशरीरंसयथा प्रयोग्य आचरणे युक्त एवमे-
वायमस्मिन् शरीरे प्राणोयुक्तः ॥ ३ ॥ अथयत्रैतदाका-
शमनुविषण्णं चक्षुः सचाक्षुषः पुरुषोदर्शनायचक्षु-
रथयोवेदेदंजिघ्राणीति स आत्मा गंधायघ्राणमथ
योवेदेदमभिव्याहराणीतिसआत्माऽभिव्याहारायवा-
गथयोवेदेदंशृण्वानीतिसआत्माश्रवणायश्रोत्रं ॥ ४ ॥
अथयोवेदेदं मन्वानीति स आत्मा मनोऽस्यदैवंचक्षुः
सवाएषएतेनदैवेनचक्षुषा मनसैतान् कामान्प
श्यन् रमते[१] ॥ ५ ॥

( म्हणजे हे इंद्रा, जीवांना मरण व म्हातारपणही आहेत, आणखी शरीर तर मृत्यूनें ग्रासलेलेंच आहे. जीवाचें शरीर हें, मरण रहित व शरीररहित अशा परमात्म्याचे राहण्याचे ठिकाण आहे. शरीरयुक्त असलेल्या जीवाला सुख व दुःख ह्यांचा संबंध आहे, आणि शरीराशीं जीवाचा संबंध आहे तोंपर्यंत त्याचा सुख व दुःख ह्यांच्याशीं संबंध नाहींसा होत नाहीं. नेहमीं शरीर रहित असलेल्या परमात्म्याचा तर सुख दुःख ह्यांच्याशीं मुळींच संबंध नाहीं ॥१ ॥ ज्याचा आपल्या शरीराशीं अत्यंत संबंध नाहीं असा मुख्यवायु, व्यापकत्व धर्म असल्यामुळें अप् ह्मणजे

---

१. छांदोग्योपनिषत्. प्र० ८ खं० १२.

भगवान ह्यानें ध्रियमाण ह्मणजे पोषण केलेला आहे म्हणून ज्याला अभ्र [ ब्रह्मदेव ] म्हणतात तो, विद्युत् म्हणजे वायूची बायको, जीस स्तन-यित्नु ह्मणतात अशी ब्रह्मदेवाची बायको ह्यांच्या शरीराशीं अत्यंत संबंध नाहीं, म्हणून त्यांना सुद्धां सुखदुःख ह्यांचा स्पर्श नाहीं, [ मग ज्याचा कधींही शरीराशीं संबंध नाहीं अशा परमात्म्याला सुखदुःखाचा संबंध नाहीं हें काय सांगावें ! ] मुख्यवायु इत्यादिक पूर्वीं सांगितलेले देव परमात्म्याच्या कृपेच्या योगानें शरीरांतून उत्तम प्रकारें बाहेर पडून परमात्म्याजवळ जाऊन आपल्या स्वरूपानंदाचा अनुभव घेत राहतात. ॥ २ ॥ ह्याप्रमाणें मुक्तीस जाणारा जीव परमात्म्याची उत्कृष्ट कृपा मिळवून आपल्या शेवटच्या शरीरांतून उत्तम रीतीनें बाहेर पडून ज्या आत्म्याजवळ जाऊन आपल्या मूळच्या सच्चिदानंद रूपानें राहतो तो परमात्मा उत्तम पुरुष आहे. मुक्त झालेला जीव परमात्म्याच्या लोकीं हसत खेळत आणि स्त्रिया गाड्या व ज्ञातीचे लोक ह्यांच्याशीं रममाण होऊन असतो. तो इतका रममाण होतो कीं, त्याला आपल्या जवळ असणाऱ्या लोकांचें व आपल्या शरीराचें भान न राहून केवळ परमा-त्म्याकडे तल्लीन होऊन सुख भोगीत राहतो. ह्यास दृष्टांत असा कीं, जसा एखादा गाडीचा मालक गाडी हांकण्याकरितां सारथि ठेवितो, तशी परमेश्वरानें ह्या शरीरांत प्राणाची योजना केली आहे ॥ ३ ॥ आतां जो मी हें डोळ्यानें पाहतो असें स्वतंत्रपणानें जाणतो व ज्यानें आपले ठिकाणीं असलेलें प्रकाशमानरूप पाहण्याकरितां चक्षुरिंद्रिय व त्याचा विषय हीं उत्पन्न केलीं आहेत तो परमात्मा उत्तम पुरुष आहे. तसेंच, जो मी हा वास घेतों असें स्वतंत्रपणानें जाणतो व ज्यानें आपल्याला वास घेण्याकरितां घ्राणेंद्रिय व त्याचा विषय हीं उत्पन्न केलीं आहेत तो परमात्मा उत्तम पुरुष आहे. तसेंच, जो मी हें बोलतों असें स्वतंत्र-पणानें जाणतो व ज्यानें आपल्याला बोलण्याकरितां वागिंद्रिय व त्याचा विषय शब्द हीं उत्पन्न केलीं आहेत, तो परमात्मा उत्तम पुरुष आहे. तसेंच

जो मी हें ऐकतों असें स्वतंत्रपणानें जाणतो व ज्यानें आपणाला ऐकण्याकरितां श्रोत्रेंद्रिय व त्याचा विषय हीं उत्पन्न केलीं आहेत तो परमात्मा उत्तम पुरुष आहे ॥ ४ ॥ तसेंच, जो ह्याविषयीं मी मनन करितों असें स्वतंत्रपणानें जाणतो व ज्यानें आपल्याला मनन करण्यासाठीं मन उत्पन्न केलें आहे तो परमात्मा उत्तम पुरुष आहे. परमात्म्याची चक्षुरादिक इंद्रियें दुसऱ्यांना प्रकाशित करण्याजोगीं असल्यामुळें ते देव म्हणजे आपल्या स्वरूपात्मक आहेत. तो परमात्मा आपल्या स्वरूपभूत व दिव्य अशा चक्षुरादिक इंद्रियांनीं जीवाच्या इंद्रियांना व्यापून आपल्यापुढें असलेल्या विषयांचा उपभोग घेऊन आपल्या इच्छेप्रमाणें रमतो. ॥ ५ ॥ )

अथै तद्वामेऽक्षिणी पुरुषरूपमेषास्य पत्नी विराट्
तयोरेषसꣳस्तावोय एषोंऽतर्हृदय आकाशो
ऽथैन योरेतदन्नं य एषोंऽतर्हृदये लोहित पिंडो ऽथैन
योरेतत्प्रावरणं यदेतदंतर्हृदये जालकमिवाथैन-
योरेषा सृतिः संचरणी यैषा हृदयादूर्ध्वा नाड्यु-
च्चरति यथाकेशः सहस्रधा भिन्नएव मस्यैता
हितानामनाड्योंऽतर्हृदये प्रतिष्ठिता
भवंत्येताभिर्वा एतदास्रवदास्रवति तस्मादेष
प्रविविक्ता हारतर इवैव भवत्यस्माच्छरीरादात्मनः ॥ २ ॥

( म्हणजे जें पुरुषाचें रूप डाव्या डोळ्यामध्यें आहे त्याला विराट हें नांव असून तें उजव्या डोळ्यांतील भगवंताची बायको आहे. इंद्र व विराट ह्या दोघांची स्तुति हा सर्व वेद आहे. तो असा कीं, कान झांकून धरिले असतां जो नाद ऐकूं येतो तो आहे. ह्या दोघांचें अन्न

१. बृहदारण्यकोपनिषत् अ० ४ ब्रा० २.

हृदयांतील लाल गोळा आहे. ह्या दोघांचें वस्त्र हृदयामधील जाळ्यासा- रखी ही वपा आहे. ह्या दोघांचा मार्ग हृदयापासून वरती मस्तकापर्यंत जाणारी एक नाडी आहे, ही एका केंसाचे हजार अंश केले असतां ते जितके लहान होतात तितक्या लहान नाड्यांनीं ह्या मस्तकामधून नेहमीं अमृताचा श्राव होत असतो व त्या अमृताचें प्राशन परमात्मा करितो. म्हणून तो ह्या जीवाहून अगदीं पृथक् आहार करणारा होतो, तो परमात्मा अवतारामध्यें स्थूल पदार्थही खातो. )

### ४०. परमेश्वराला जो जाणतो त्यास मुक्ति मिळते.

ह्याविषयीं प्रमाण.

ब्रम्हविदाप्नोति परं[१] ।

( म्हणजे जो परमेश्वराला जाणतो त्यास मुक्ति मिळते. )

आनंदं ब्रम्हणो विद्वान् नबिभेति कदाचनेति[१] ।

( म्हणजे परमेश्वराचा आनंद जाणणारा कशासही भीत नाहीं. )

यदाह्येवैषएतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलनयेऽभयं
प्रतिष्ठां विंदते । अथसोऽभयं गतो भवति[१] ।

( म्हणजे जेव्हां हा अधिकारी जीव, ज्याचें पूर्ण ज्ञान होत नाहीं, जो जीवसंबंधीं अल्पज्ञान व अल्पसुख इत्यादिक गुणरहित आहे, वेदानें ज्याचें पूर्ण वर्णन होऊं शकत नाहीं, ज्याला दुसऱ्याचा आश्रय नको, अशा भगवंताच्या ठिकाणीं निर्भयपणें ज्ञानरूप मोठेपणा मिळवितो, त्यानंतर तो अधिकारी भयरहित अशा भगवंताप्रत प्राप्त होतो. )

तयोःश्रेय आददानस्य साधु भवति हीयते ऽर्थाद्य उप्रेयो वृणीते[२] ।

---

१. ब्रम्हवल्ली.

२. काठकोपनिषत अ० १ व० २.

( ह्मणजे ब्रह्मविद्या व बायकामुळें ह्या दोहोंमध्यें जो ब्रम्हविद्येचें ग्रहण करितो त्याचें कल्याण होतें आणि जो बायकामुळें इत्यादि प्रियकर वस्तु ग्रहण करितो त्याचें कल्याण होत नाहीं. )

अमृतस्यैषसेतुः ।

( ह्मणजे हा परमेश्वर मोक्षाचा सेतु आहे. )

नारायणं महाज्ञेयं विश्वात्मानं परायणं[1] ।

( ह्मणजे विद्वान लोकांनीं जाणण्यास योग्य, सर्व जगामध्यें अंतर्यामी रूपानें राहणारा, सर्वांस उत्तम आश्रय देणारा, अशा परमात्म्याचें ध्यान करावें. )

एतमानंदमयमात्मानमुपसंक्रामतीति[2] ।

( ह्मणजे ह्या आनंदमय नारायणनामक परमात्म्याप्रत प्राप्त होतो. )

यस्तुसर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सति[3] ।

( म्हणजे जो कोणी सर्व जगत परमात्म्याच्या आश्रयानें आहे व सर्व प्राण्यांमध्यें परमात्मा आहे असें जाणतो तो तसें ज्ञान झाल्यावर आपलें रक्षण करण्याची इच्छा करीत नाहीं. )

अविद्यया मृत्युं तीर्वा विद्ययाऽमृतमश्नुते[3] ।

( म्हणजे मिथ्याज्ञानाच्या निंदनाच्या योगानें दुःखादिकांस उल्लंघून परमात्म्याच्या यथार्थ ज्ञानानें मोक्ष मिळतो. )

भूतेषु भूतेषु विचिंत्य प्रेत्यास्माल्लोकादमृता भवंति[4] ।

---

१. नारायणोपनिषत् भा० १ पृ० ७६.

२. भृगुवल्ली.

३. ईशोपनिषत्.

४. केनोपनिषत्.

( म्हणजे सर्व प्राण्यांचे ठिकाणीं असलेला परमेश्वर जाणून ह्या लोकापासून गेल्यावर ज्ञानी मुक्त होतात. )

पुरमेकादशद्वारमजस्यावक्रचेतसः।

अनुष्ठाय नशोचतिविमुक्तश्चविमुच्यते। एतद्वैतत्॥ ११॥

( म्हणजे अकराद्वारें दोन कान, दोन डोळे, दोन नाकपुड्या, तोंड, गुद, जननेंद्रिय, मन, आणि बुद्धि असलेला देह हा, ज्याचें तेज गुप्त आहे अशा भगवंताच्या स्वाधीन आहे, असें मनांत आणून ममता टाकणारा मनुष्य शोक करीत नाहीं, आणि मुक्त झालेल्या जीवाप्रमाणें त्यास कर्माचें दुःख होत नाहीं, व प्रारब्धकर्म संपलें म्हणजे तो पूर्णपणें मुक्तीस जातो. तूं विचारिलेला परमेश्वर हा आहे. )

एकोवशी सर्वभूतांतरात्मा एकंरूपं बहुधायः करोति॥

तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीरास्तेषां सुखं शाश्वतन्नेतरेषां[1]॥ १२॥

( म्हणजे, जो स्वतंत्र सर्वांस वश ठेवणारा व सर्व प्राण्यांचे अंतरीं असणारा आहे, जो एका रूपाला अनेक रूपें करितो, तो आत्म्याचें ठिकाणीं राहणारा परमेश्वर जे ज्ञानी जाणतात त्यांचें सुख नेहमीं राहणारें असतें व इतरांचें सुख नेहमीं राहणारें नसतें. )

नित्यो ऽनित्यानां चेतनश्चेतनानामेको बहुनांयो विदधाति कामान्।

तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीरास्तेषां शांतिः शास्वती नेतरेषां॥१३॥

( म्हणजे नित्यपदार्थांमध्यें नित्य असणारा आणखी चेतनपदार्थांमध्यें चेतन असणारा, जो बहुत इच्छिलेले पदार्थ देतो, त्या परमेश्वरास जे ज्ञानी जाणतात, त्यांची शांति नेहमीं राहणारी असते; इतरांची शांति नेहमीं राहणारी नसते. )

---

1 काठकोपनिषत अ॰ २ व॰ ५.

अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापकोऽलिंग एवच ।
तंज्ञात्वामुच्यते जंतुरमृतत्वंच गच्छति[1] ॥ ८ ॥

( ह्मणजे प्रकृतीपेक्षां परमेश्वर श्रेष्ठ, अमर्यादित, व भौतिक देह-रहित आहे. त्याचें ज्ञान झाल्यानें प्राणी संसार पाशांतून मोकळा होतो आणि जेणेंकरून पुनः जन्ममरण न येईल असा मोक्ष त्याला प्राप्त होतो. )

अरा इव रथनाभौ कला यस्मिन् प्रतिष्ठिताः ।
तंवेद्यं पुरुषं वेद यथामावो मृत्युः परिव्यथा इति[2] ॥ ६ ॥

(ह्मणजे जसे रथाच्या चाकाच्या तुंब्यावर अऱ्या राहतात, तसे प्राणादिक सोळा कला ज्या परम पुरुषावर अवलंबून राहतात त्या ज्ञेय परमेश्वराला तुम्ही अशा प्रकारें जाणा कीं, जेणेंकरून मृत्यु तुम्हास दुःख देणार नाहीं. )

सयो हवै तदच्छायमशरीरमलोहितं शुभ्रमक्षरं
वेदयते यस्तुसोम्य ससर्वज्ञः सर्वं भवति तदेष
श्लोकः[3] ॥ १० ॥

( ह्मणजे, हे सोम्य, जो विज्ञानरूप असलेला, शरीररहित असलेला, रूपरहित, शुद्ध, नित्य अशा परमात्म्याला जाणतो, तो सर्वज्ञ होतो व सर्वज्ञ परमेश्वराप्रमाणें पूर्ण होतो. )

संप्राप्यै न मृषयो ज्ञान तृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशांताः ।
ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरायुक्तात्मान सर्वमेवाविशांति ॥ ५ ॥
सयो हवै तत्परमं ब्रम्हवेद ब्रम्हैव भवति । नास्या ब्रम्हवित्कुले

१. काठकोपनिषत् अ० २ व० ६.

२. प्रश्नोपनिषत् प्र० ६.

३. प्रश्नोपनिष प्र० ४.

भवति । तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रंथिभ्यो विमुक्तो

ऽमृतो भवति[1] ॥ ९ ॥

( म्हणजे ज्ञानानें तृप्त झालेले ऋषी भगवंता जवळ जाऊन कृतकृत्य वैराग्यशील व विषयाविषयीं कंटाळलेले असे होतात. ते ज्ञानी सर्व देहादिक बंध टाकून परमेश्वराच्या ठिकाणीं चित्त लावून परमेश्वरा जवळ जाऊन त्याच्यामध्यें प्रवेश करितात ॥ ९ ॥ जो अधिकारी हें श्रेष्ठ ब्रम्ह जाणतो तो ज्ञान, आनंद इत्यादि आपणास योग्य अशा गुणांनीं श्रेष्ठ होतो. त्याच्या वंशांत ब्रम्हाला न जाणणारा असा कोणी होत नाहीं. तो शोक व पाप ह्यापासून तर तो. हृदयांत असलेल्या अज्ञानजन्य काम्यकर्मादिकांच्या बंधापासून मोकळा होऊन मुक्त होतो ॥ ९ ॥ )

**४१. परमेश्वरावाचून दुसरें जाणणें व्यर्थ आहे.** ह्याविषयीं प्रमाण.

तमे वैकं जानथ आत्मान मन्यावाचोविमुंचथ

अमृतस्यैषसेतुरिति ।

यस्तंनवेदाकिमृचाकरिष्यति ।

**४२. परमेश्वर कर्मे इत्यादि केल्यानें प्राप्त होत नाहीं, तर सर्व कर्मे परमात्म्याला अर्पण केल्यानें प्राप्त होतो.** ह्याविषयीं प्रमाण

नकर्मणानप्रजयाधनेनत्यागेनैकेअमृतत्वमानशुःपरेण

नाकंनिहितं गुहायां विभ्राजदेतद्यतयोविशंति[2] ।

( म्हणजे, मोक्ष हा काम्यकर्म केल्यानें अथवा पुत्रादिकांनीं अथवा पैक्यानें प्राप्त होत नाहीं, तर सर्व कर्मे परमेश्वराला अर्पण केल्यानें ज्ञान्यांना

---

१. मुंडकोपनिषत मुं० २ खं० २.

२. नारायणोपनिषत् भा० १ पृ० ७२.

मोक्ष मिळतो. हृदयगुहेंत स्वर्गापेक्षां उत्कृष्ट असून जवळ असलेला व प्रकाशमान असा परमेश्वर संन्याशांना प्राप्त होतो.)

**४३. सर्वसंगपरित्याग करूनच परमात्मा प्राप्त होतो असें नाहीं, तर वेदांत शास्त्राचा अभ्यास केल्यानें त्याचा साक्षात्कार होऊन मोक्ष मिळतो.** ह्याविषयीं प्रमाण.

वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाःसन्यासयोगाद्यतयःशुद्ध
सत्वाःतेब्रम्हलोकेतु परांतकालेपरामृतात्परिमुच्यंतिसर्वे[1]।

(म्हणजे वेदाचा निर्णय करणारें अर्थे जें मीमांसा शास्त्र आहे, त्या शास्त्राच्या ज्ञानानें ज्यांनीं श्रेष्ठतत्व कोणतें ह्याचा पूर्ण निश्चय केला आहे व सर्व कर्मे परमात्म्याला अर्पण केल्याच्या योगानें ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे असे जे [ मोक्षासाठीं ] यत्न करणारे त्यांना भगवंताचा साक्षात्कार होऊन नंतर ते ब्रम्हदेवाच्या सत्य लोकीं जातात. तेथें ब्रम्हदेवाचें आयुष्य आहे तोंपर्यंत [ म्हणजे दोन परार्द्ध वर्षेपर्यंत ] राहून मग भगवंताच्या कृपेनें साधनें पूर्ण मिळवून मुक्त होतात.)

**४४. ॐकार हा परमेश्वराचा वाचक आहे. त्यांत अकार, उकार, व मकार अशा तीन मात्रा आहेत. त्या तिन्ही मात्रांचें ज्ञान होऊन ॐकारानें परमेश्वराचें ध्यान केलें असतां ध्यान करणारा सूर्यलोकीं जाऊन पापापासून मुक्त होऊन ब्रम्हदेवाच्या उपदेशानें त्याला परमेश्वराची प्राप्ति होते. मग तो पुनः जन्मास येत नाहीं.** ह्याविषयीं प्रमाण.

यः पुनरेतंत्रिमात्रेणैवोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुष
मभिध्यायीत सतेजासि सूर्ये संपन्नः। यथा पादोदर
स्त्वचा विनिर्मुच्यत एवं हवै सपाप्मनाविनिर्मुक्तः

---

१. नारायणोपनिषत् भा० १ पृ० ७३.

ससामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं सएतस्माज्जीवघना-

त्परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते । तदेतौ श्लोकौ भवतः ॥ ५ ॥

( ह्मणजे ज्याचे तीन भाग आहेत अशा ओंकारानें परमेश्वराचें जो ध्यान करितो तो तेजरूप सूर्यलोकीं जाऊन, जसा साप आपली कात टाकतो तसा तो पापापासून मुक्त होऊन नंतर त्याला सामवेदाच्या अभिमानी देवता ब्रह्मलोकास नेतात. तेथें सर्व जीवामध्यें उत्तम जीव जो ब्रम्हदेव त्यापेक्षां सर्वोत्कृष्ट व सर्व मनुष्याचे शरीरांत असणारा अशा परमात्म्याला पाहतो. ह्याविषयीं पुढील श्लोक आहेत. )

### ४५. जो जसें कर्म करितो तसें फल त्यास परमात्मा देतो.

ह्याविषयीं प्रमाण.

एषह्येव साधुकर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्य उन्निनी-

षत एषउ एवासाधुकर्म कारयति तं यमधोनिनीषतएष

लोकपाल एष लोकाधिपतिरेष लोकेशः सम आत्मेतिवि-

द्यात् सम आत्मेति विद्यादिति[1] ।

### ४६. मनुष्यापासून ते ब्रम्हदेवापर्यंत आनंदाचें तारतम्य आहे. ह्यास प्रमाण.

सैषानंदस्यमीमाꣳसाभवति[2] ।

( म्हणजे हा आनंदाचा विचार आहे. )

योनिमन्ये प्रपद्यंते शरीरत्वायदेहिनः ।

स्थाणुमन्येऽनु संयांति यथाकर्मयथाश्रुतं ॥ ७ ॥

( म्हणजे देह धारण करण्याजोगे कांहीं जीव शरीर धारण करण्याकरितां आपआपली विद्या व कर्में जशीं असतील तशा योनीस

१. कौषीतकी ब्राम्हणोपनिषत् ( अ० ३ खं० ८ ).

२. ब्रम्हवल्ली.

जातात. देह धारण करणारे दुसरे कांहीं जीव आपआपलीं कर्मे जशीं असतील तसे स्थावराचे जन्मास जातात. )

## ४७. मोक्षास जाण्याला परमेश्वराचें ज्ञान अवश्य आहे.

ह्यास प्रमाण.

तमेवं विद्वानमृत इह भवति नान्यः पंथा विद्यतेऽयनाय[१] ।

( ह्मणजे परमेश्वराला ह्याप्रमाणें जाणणारा येथें मुक्त होतो. मोक्षाला दुसरा मार्ग नाहीं. )

जानाम्यहं शेवधिरित्यनंतं नह्य ध्रुवैः प्राप्यतेहि ध्रुवंतत् ।

य आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोकोऽविजिघ-

त्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यःस

विजिज्ञासितव्यः ससर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च-

कामान्यस्तमात्मानमनुविद्यविजानातीतिहप्रजापति-

रुवाचे ॥ १ ॥[२]

( म्हणजे जो परमात्मा पापानें निर्लिप्त, जरारहित, मरणरहित, शोकरहित, भूक व तहान नसलेला, सत्यमनोरथ असलेला, सत्य-संकल्प असलेला असा आहे त्याच्याविषयीं विचार करून त्याचें प्रत्यक्ष ज्ञान करून घेतो त्याला स्वर्गादिक सर्व लोक मिळतात व त्यास ज्याची इच्छा असेल तें सर्व मिळतें, ह्याप्रमाणें ब्रम्हदेव बोलला. )

## ४८. परमेश्वर ज्यावर प्रसन्न होतो त्यालाच तो आपलें स्वरूप प्रकट करितो. ह्याविषयीं प्रमाण.

नायमात्मा प्रवचनेनलभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।

यमेवैषवृणुते तेनलभ्यस्तस्यैष आत्मा वृणुते तनूं स्वां ॥ ३ ॥

---

१. चित्युपनिषत्.

२. छांदोग्योपनिषत् प्र० ८ खं० ७.

३. मुंडकोपनिषत् मु० ३ खं० २.

( म्हणजे हा परमेश्वर अभ्यासानें प्राप्त व्हावयाचा नाहीं, बुद्धीनें प्राप्त व्हावयाचा नाहीं, पुष्कळ शास्त्र पाहिल्यानें प्राप्त व्हावयाचा नाहीं, तर तो ज्याला स्वीकारितो त्याजवर प्रसन्न होऊन त्याला प्राप्त होतो. त्याला तो आपले प्रत्यक्ष ज्ञान देतो. )

यस्य प्रसादात् परमार्तिरूपादस्मात्संसारान्मुच्यतेनापरेणेति ।

( म्हणजे ज्या परमात्म्याच्या प्रसादानें अतिशय दुःखरूप संसारापासून मुक्त होतो, दुसऱ्या कशानेंही मुक्त होत नाहीं. )

तमक्रतुं पश्यति वीतशोको धातुः प्रसादान्महिमानमीशं[1] ।

( म्हणजे जो यज्ञादिक कर्मांनीं प्राप्त होण्यासारखा नाहीं अशा त्या परमात्म्याला भगवंताच्या व ब्रम्हदेवाच्या कृपेनें जीव पाहातो, तो मुक्त होतो, व त्याचें माहात्म्य पाहातो. )

तेजोयत्ते रूपं कल्याणतमंतत्तेपश्यामि[2] ।

( म्हणजे जें तुझें कल्याणदायक रूप तें मी तुझ्या ज्ञानानें पाहतों.)

अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्वभावेनचोभयोः ।

अस्तीत्येवोपलब्धस्यतत्वभावः प्रसीदति[3] ॥ १३ ॥

( ह्मणजे परमेश्वर आहे ही गोष्ट त्याच्या प्रसादानेंच जाणावयाची आहे, आणि सर्वांहून अधिक असल्यामुळें अस्ति ह्या नांवाचा परमेश्वर आहे असें जाणणाऱ्याला भगवान प्रसाद देणारा होतो. )

अयय एष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परंज्योति-
रूपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यत एष आत्मेतिहो

---

१. नारायणोपनिषत् भा० १ पृ० ६१; काठकोपनिषत् अ० १ पृ० ३९.

२. ईशोपनिषत.

३. काठकोपनिषत अ० २ व० ६.

वाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति तस्य हवाएतस्यब्रह्मणो नाम सत्यमिति[1] ॥ ४ ॥

( ह्मणजे जो परमात्म्याची उत्कृष्ट कृपा मिळवितो तोच ह्या शरीराला सोडून त्याला निर्लेप ज्योतिरूप परमात्म्याचा साक्षात्कार होतो, व त्याला आपल्या मूळ सच्चिदानंद रूपाचें ज्ञान होतें. जीव ज्या परमात्म्याकडे गेला असतां त्याला आपल्या मूळ रूपाचें ज्ञान होतें तोच पूर्वीं सांगितलेला हृदयकमलांतल्या आकाशांतील परमात्मा आहे असें सांगितलें. हें उत्कृष्ठ तेज ( परमात्मा ) नित्यमुक्त आहे, त्याला कशाचेंही भय नाहीं, तें पूर्ण आहे, असें सांगितलें आहे. त्याच परमात्म्याचें दुसरें नांव सत्य हें आहे असें ह्मटलें आहे. )

**४९. परमेश्वराचें ज्ञान चक्षुरादिक इंद्रियांनीं होणें अशक्य आहे.**

ह्याविषयीं प्रमाण.

नसंदृशेतिष्ठति रूपमस्यनचक्षुषापश्यतिकश्चनैनं । हृदामनीषामनसाभिक्लृप्तोयएनंविदुरमृतास्तेभवंति[2] ॥ ९ ॥

( म्हणजे परमात्म्याचें रूप आपल्या इंद्रियादिकांच्या साधनांनीं समजत नाहीं व कोणीही इंद्रियादिकांच्या साधनांनीं त्याचें रूप पाहिलें नाहीं. प्रीतिपूर्वक भगवंताच्या माहात्म्याचें ज्ञान असल्यानें, व भक्तिसहित श्रवण, मनन इत्यादिकांनीं मन उत्तम प्रकारचें झाल्यानें, परमात्मा दर्शन देतो. जे कोणी परमात्म्याला प्रत्यक्ष जाणतात ते मुक्त होतात. )

नचक्षुर्नश्रोत्रंनतर्कोनस्मृतिर्वेदाह्येवैनंवेदयति ।

( म्हणजे परमेश्वराचें ज्ञान डोळ्यानें होत नाहीं, कानानें होत नाहीं, तर्कानें होत नाहीं, स्मृतीनें होत नाहीं, व वेदानें होत नाहीं. )

---

१. छांदोग्योपनिषत् प्र० ८ खं० ३

२. काठकोपनिषत् अ० १ व० ६; नारायणोपनिषत् भा० १ पृ० ११.

नैषातर्केणमतिरापनेया ।

( म्हणजे परमेश्वराचें ज्ञान तर्कानें प्राप्त होत नाहीं. )

देवैरत्रापिविचिकित्सितंपुरानहिसुविज्ञेयोऽणुरेषधर्मः

अन्यंवरंनचिकेतोवृणीष्वमामोपरोत्सीरतिमासृजैनं[1] ॥ २१ ॥

( म्हणजे तूं जो प्रश्न केला आहेस त्याविषयीं पूर्वीं देवही विचार करून संदेह पावले, कारण तो विषय सुलभतेनें समजण्याजोगा नाहीं. ईश्वराचें स्वरूप फार सूक्ष्म आहे, ह्या कारणास्तव, हे नचिकेता, दुसरा वर माग, हाच प्रश्न सांग अशी अट धरूं नको. तेंव्हां नचिकेता असें म्हणाला कीं, अशा प्रकारें माझी समजूत घालून तो विषय सोडूं नका. )

नचक्षुषागृह्यतेनापिवाचानान्यैर्देवैस्तपसाकर्मणावा ।

ज्ञानप्रसादेनविशुद्धसत्वस्ततस्तुतं पश्यते निष्कलं

ध्यायमानः ॥ ८ ॥

( म्हणजे परमेश्वराचें ज्ञान चक्षुरिंद्रियदेवतेच्या प्रसादानें होत नाहीं, वागिंद्रिय देवतेच्या प्रसादानेंही होत नाहीं, दुसऱ्या इंद्रियांच्या देवतांच्या प्रसादानें होत नाहीं, तप केल्यानें होत नाहीं, किंवा कर्म केल्यानें होत नाहीं. तर परमेश्वराच्या प्रसादानें केवळ शुद्ध सत्वगुणाचा होतो. नंतर ध्यान करणारा सोळा भागांचा देहरहित अशा परमेश्वरास पाहतो. )

अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगंधवच्च यदिति ।

( म्हणजे जो शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ह्यांनीं गोचर नसून नाशरहित व नित्य आहे. )

विमेकर्णापतयतो विचक्षुर्वीदंज्योतिर्हृदयआहितं यत्

विमेमनश्चरति दूर आधीः किंस्विद्वक्ष्यामिकिमनू

मनिष्ये इति ।

---

१. काठकोपनिषद्द अ० १ व० २.

५० परमेश्वराला पूर्णपणें कोणीही जाणूं शकत नाहींत.

ह्याविषयीं प्रमाण.

यतोवाचोनिवर्त्तंते अप्राप्यमनसासह[१] ।

( म्हणजे ज्या ब्रम्हापासून ऋग्वेद इत्यादि मनासहवर्तमान ब्रम्हास पूर्णपणें न जाणून मागें परतात. )

विष्णोर्नुकंवीर्याणि प्रवोचंयः पार्थिवानिविममेरजांसि इति ।

( ह्मणजे एखादा पृथ्वीचे कण मोजील, परंतु परमेश्वराचे पराक्रम कोण सांगेल ? )

परोमात्रयातन्वावृधानेत्यादिचसहिनतेविष्णोजायमानो
नजातो देव महिम्नः परमंतमापेति ।

अनेजदेकं मनसो जवीयो नैनदेवा आप्नुवन् पूर्व मर्षत[२] ।

( ह्मणजे परमेश्वर हा निर्भय, मुख्य, मनापेक्षां फार वेगवान, असा आहे. त्यास देवांनीं पूर्णपणें जाणिलें नाहीं. )

नतत्रचक्षुर्गच्छति नवाग्गच्छति नोमनो नविद्मो नविजानीमो[३] ।

( म्हणजे परमेश्वराचा महिमा पूर्णपणें जाणण्यास बाहेरील इंद्रियें प्रवृत्त होत नाहींत, वेदही प्रवृत्त होत नाहींत, व मनही प्रवृत्त होत नाहीं.)

यदिमन्यसेसुवेदेतिदभ्रमेवापिनूनंत्वं वेत्थब्रम्हणोरूपं
यदस्यत्वंयदस्यदेवेष्वथनुमीमांस्यमेवतेमन्येविदितं[३] ।

( ह्मणजे मी परमेश्वराला चांगल्या रीतीनें जाणतों असें जर मानशील तर त्याचें रूप तूं थोडेंच जाणिलेंस. म्हणून तुझ्या ठिकाणीं व देवांच्या ठिकाणीं असलेलें जें परमेश्वराचें रूप तूं थोडें जाणिलेंस त्याचा तुला विचार केला पाहिजे असें मी समजतों. )

---

१. ब्रम्हवल्ली, पृ॰ २२.

२. ईशोपनिषत्.

३. केनोपनिषत.

नाहं मन्ये सुवेदेति नोन वेदेति वेदच । योनस्तद्वेदतद्वेद
नोन वेदेति वेदच ।

( ह्मणजे मी परमेश्वराला चांगलें जाणतों असें मी समजत नाहीं. ह्यावरून मी परमेश्वराला जाणत नाहीं असें नाहीं, तर मी त्यास जाणतों. कारण जो परमेश्वराला जाणिलें असें म्हणतो तो त्यास जाणत नाहीं. परंतु जो परमेश्वराला जाणिलें नाहीं असें म्हणतो तो त्यास जाणतो. )

यस्यामतंतस्यमतंमतंयस्य नवेदसः । अविज्ञातं
विजानतां विज्ञातमविजानतां[1] ।

( म्हणजे परमेश्वराचें चिंतन झालें नाहीं असें जो मानितो त्याला परमेश्वराचें चिंतन झालें असें समजावें. मी परमेश्वराचें चिंतन केलें असें जो मानितो त्याला परमेश्वराचें चिंतन झालें नाहीं असें समजावें. परमेश्वराचें दर्शन चांगलें झालें असें समजणारास दर्शन झालें नाहीं असें समजावें. परमेश्वराचें दर्शन चांगलें झालें नाहीं असें समजणारास परमेश्वराचें दर्शन झालें असें समजावें. )

**५१. वेद नित्य आहेत.** ह्याविषयीं प्रमाण.

नित्ययानित्ययास्तौमिपरमात्मानमच्युतमितिश्रुतिः ।
अनादिनिधनानित्यावागुत्सृष्टास्वयंभुवा ऋषीणांनामधे
यानियाश्चवेदेषुदृष्टयइतिश्रुतिः ।

**५२. परमेश्वराचें ज्ञान शुद्ध अंतःकरण होऊन मनानें विचार केल्यानें होतें.** ह्याविषयीं प्रमाण.

एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो यस्मिन् प्राणः पंचधा
संविवेश । प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानाम् यस्मिन् विशुद्धे
विभवत्येष आत्मा[2] ॥ ९ ॥

---

१. केनोपनिषत्.
२. मुंडकोपनिषत् मुं० ३ खं० १.

( म्हणजे लोकांचें सर्व चित्त इंद्रियांससहवर्तमान ज्या मुख्यप्राणाचे ठिकाणीं आश्रय करून राहिलें आहे तो मुख्यप्राण ज्या शुद्ध परमेश्वराचे ठिकाणीं प्राणादिक पांच रूपांनीं आश्रय करून राहिला आहे व शोभत आहे तो अणुरूपानें सर्व प्राण्यामध्यें असलेला परमेश्वर चित्तानें चिंतन करून जाणण्यास योग्य आहे.

धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासानिशितंसं-
धयीत । आयम्यतद्भागवतेन चेतसालक्ष्यं तदेवाक्षरं
सोम्य विद्धि ॥ ३ ॥ प्रणवोधनुः शरोह्यात्मा ब्रम्हतल्लक्ष्य-
मुच्यते । अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयोभवेत्[1] ॥ ४ ॥

( म्हणजे उपनिषदांत सांगितलेला ओंकाररूप धनुष्य घेऊन जें मोठें शस्त्र असून उपासनेच्या योगानें तीक्ष्ण केलेल्या बाणासारखें आहे असें चित्त तूं [ ब्रम्हाकडे ] लाव. चित्त सर्व पदार्थांपासून आवरून घेऊन एकट्या भगवंताकडेच लावून, हें सौम्य, रोखावयास योग्य असें जें ब्रम्ह तें जाण ॥ ३ ॥ ओंकार हें धनुष्य आहे, चित्त हा बाण आहे, तें ब्रह्म रोखण्याचा पदार्थ आहे असें म्हटलें आहे. [ ब्रम्ह ] सावधपणानें रोखावें. रोखलेल्या पदार्थांत जसा बाण शिरतो तसा ज्ञात्यानें ब्रम्हांत प्रवेश करावा ॥ ४ ॥ )

तस्यक्कमूल ॐ स्यादन्यत्राद्भ्योऽद्भिः सोम्य शुंगेन तेजो
मूलमान्विच्छ तेजसा सौम्य शुंगेन सन्मूलमन्विच्छ
सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः[2] ॥ ६ ॥

( म्हणजे शरीराला उदकाहून दुसरें काय कारण आहे, [ तर दुसरें कांहीं कारण नाहीं. ] हे मुला, शरीराप्रमाणें हें उदक कार्य आहे

---

१. मुंडकोपनिषत् मुं० २ खं० २.
२. छांदोग्योपनिषत् प्र० ६ खं० ८.

म्हणून उदकाचा कोणी कर्ता आहे असें अनुमान कर. तसेंच तेज हें कार्य आहे म्हणून परमेश्वर हा त्याचा कर्ता आहे, असें अनुमान कर. हे मुला, ही सर्व प्रजा परमेश्वरापासून उत्पन्न झाली आहे, त्यांस परमेश्वराचा आश्रय आहे. तोच मुक्त प्रजेंचा नियमन करणारा आहे. )

**५३. तथापि आपल्या योग्यतेप्रमाणें परमेश्वराचें अंशतः ज्ञान झालें असतां मुक्ति मिळते.** ह्याविषयीं प्रमाण.

प्रतिबोधविदितंमतममृतत्वंहिविंदते । आत्मना विंदतेवीर्यंविद्ययाविंदतेऽमृतं[१] ।

( म्हणजे आपल्या योग्यतेप्रमाणें ऐकिलेल्या परमात्म्यास आपल्या योग्यतेप्रमाणें पाहिलें असतां मुक्ति मिळते. )

**५४. परमेश्वराचें ज्ञान झाल्यावर हीं कर्मे केलीं पाहिजेत.** ह्याविषयीं प्रमाण.

आत्मना विंदते वीर्यं विद्ययाविंदतेऽमृतं[१] ।

( म्हणजे आपल्या यज्ञादिक कर्मांनीं अतिशय आनंद प्राप्त होतो व परमेश्वराच्या प्रत्यक्ष ज्ञानानें अज्ञानाचा नाश होतो. )

**५५. ज्ञानी हे ज्ञान होताच मुक्त होत नाहींत तर ब्रम्हदेवाच्या अंतकाळीं मुक्त होतात.** ह्याविषयीं प्रमाण.

वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाःसन्यासयोगाद्यतयःशुद्ध सत्त्वाः । तेब्रम्हलोकेषु परांतकाले परामृताःपरिमुच्यंतिसर्वे[२] ॥ ६ ॥

( म्हणजे वेदांचा निर्णय करणारे अशा मीमांसाशास्त्रापासून झालेल्या ज्ञानानें ज्यांनीं अर्थाचा निर्णय केला आहे तें, आणि भगवंताच्या

१. केनोपनिषत्.

२. मुंडकोपनिषत् मुं० ३ खं० २.

ठिकाणीं सर्व कर्में अर्पण केल्यामुळें शुद्ध अंतःकरण झालेलें असे मुक्ती-विषयीं प्रयत्न करणारे लोक, हे सर्व ब्रह्मदेवाच्या लोकांत राहून ब्रह्म-देवाच्या अंतकालीं मायेच्या बंधापासून मोकळे होतात म्हणजे मुक्त होतात. )

**५६. ज्ञानी कोणत्या मार्गानें मुक्तीस जातो.** ह्याविषयीं प्रमाण.

यदावैपुरुषोऽस्माल्लोकात्प्रैतिसवायुमागच्छाति
तस्मैसतत्रविजिहीतेयथारथचक्रस्यखंतेनस
ऊर्ध्वमाक्रमतेसआदित्यमागच्छतितस्मैसतत्र
विजिहीतेयथालंबरस्यखंतेनसऊर्ध्वमाक्रमते
सचंद्रमसमागच्छतितस्मैसतत्रविजिहीतेयथा
दुंदुभेःखंतेनसऊर्ध्वमाक्रमतेसलोकमागच्छत्य-
शोकमहिमंतस्मिन्वसतिशाश्वतीःसमाः ॥ १ ॥

(.म्हणजे त्या वेळेस जीव मुक्त होण्याकरितां देहांतून निघतो त्या वेळेस प्रथम तो मुख्यप्राणाचा पुत्र प्रवाह ह्याजवळ जातो. नंतर तेथें तो प्रवाह त्या ज्ञान्याला पुढें जाण्या करितां जसें चाकाचें छिद्र असतें तसा मार्ग करून देतो, त्या मार्गानें तो जातो. मग सूर्य लोकीं जाऊन पोहोंचतो. तेथें सूर्यही त्याला पुढें जाण्याकरितां जसें लंबरनामक वाद्याचें छिद्र असतें तसा मार्ग करून देतो, त्या मार्गानें तो ज्ञानी चंद्राच्या लोकीं जातो. तेथें गेल्यावर तो चंद्र त्याला पुढें जाण्याकरितां जसें दुंदुभीचें छिद्र असतें त्याप्रमाणें मार्ग करून देतो, त्या मार्गानें तो मुख्य प्राणाजवळ जातो. तेथून तो जेथें कांहींही उपद्रव नाहीं अशा ब्रम्हलोकीं जातो. तेथें गेल्यावर अनंत वर्षेंपर्यंत राहतो. )

---

१. बृहदारण्यकोपनिषत् अ० ५ ब्रा० १०.

**५७. परमेश्वराची प्रार्थना करण्याचा प्रकार सांगणाऱ्या श्रुती.**

हिरण्मयेनपात्रेणसत्यस्यापिहितंमुखं । तत्वंपूषन्नपा

वृणुसत्यधर्मायदृष्टये[1] ।

( म्हणजे प्रकाशमय पात्रानें म्हणजे सूर्यमंडळानें सूर्यमंडळामध्यें असणाऱ्या परमेश्वराचें तोंड झांकून गेलेलें आहे. ह्यास्तव, हे परमेश्वरा, तें शरीर तूं आपल्या भक्ताला दर्शन देण्यासाठीं मला उघडें करून दाखीव. )

पूषन्नेकर्षेयमसूर्यप्राजापत्यव्यूहरश्मीन्समूह ।

तेजोयत्तेरूपंकल्याणतमंतत्तेपश्यामि । योऽसावसौपुरुषः

सोऽहमस्मि[1] ।

( म्हणजे हे सर्वज्ञा, हे सर्वांचें नियमन करणाऱ्या, हे देवादिकांना प्राप्त होणाऱ्या, हे ब्रम्हदेवास विशेषेंकरून प्राप्त होणाऱ्या, माझ्या आत्मस्वरूपाचें ज्ञान वाढीव आणि बाहेरील ज्ञानही वाढीव. जें तुझें कल्याणदायक रूप तें मी तुझ्या कृपेनें पाहतों. )

ॐक्रतोस्मरकृतंस्मर[2] ।

( म्हणजे हे सर्वव्यापकत्वादिगुणवान् परमेश्वरा, हे ज्ञानस्वरूपहरि, मजवर कृपा कर. म्यां केलेल्या ध्यानादिक कर्मानें मजवर कृपा करण्याविषयीं प्रसन्न हो. )

अग्नेनयसुपथारायेअस्मान्विश्वानिदेववयुनानिविद्वान् ।

युयोध्यस्मज्जुहुराणमेनोभूयिष्ठांतेनमउक्तिंविधेम[3] ।

( म्हणजे हे जगताला प्रेरणा करणाऱ्या अग्निनामक देवा, ज्या मार्गानें

---

१. ईशोपनिषत्.

२. बृहदारण्यकोपनिषत्. अ० ५ ब्रा० १५; ईशोपनिषत्.

३. ईशोपनिषत्.

गेले असतां जन्ममरणरूपसंसारांत पुनः येत नाहीं अशा आर्चिरादि मार्गानें आम्हाला मोक्षरूप धन मिळण्याकरितां घेऊन जा. हे देवा, मोक्ष मिळण्यास आम्ही संपादन केलेलीं संपूर्ण ज्ञानें तूं जाणतोस. मनुष्याची योग्यता कमी करून त्यास प्रपंच्याच्या फेऱ्यांत आणणाऱ्या अशा पापास आम्हापासून दूर कर. पाप दूर करण्याचें सामर्थ्य आमच्यांत नाहीं; म्हणून आम्ही तर तुला ज्ञान व भक्ति ह्यांनीं युक्त असा नमस्कार करितों. )

## ५८. परमात्म्याचें ज्ञान इत्यादि मिळविण्याचीं जीं साधनें आहेत तीं व त्याविषयीं प्रमाण.

### १ सत्यपणा.

१. सत्यपणानें वागणें हें ज्ञानाच्या योगानें मोक्ष देणारें उत्तम साधन आहे ह्याविषयीं श्रुति—

सत्यंपरंपरꣳसत्यꣳसत्येननसुवर्गाल्लोकाच्चयवंते
कदाचनसताꣳहिसत्यंतस्मात्सत्येरमंते[1] ।

( ह्मणजे सत्य हेंच उत्कृष्ठ साधन आहे. परमात्म्याच्या कृपेनें स्वर्ग लोकांतून परत येत नाहींत. कारण सज्जनांचें बोलणें सत्य असतें. ह्मणून सत्य हेंच ज्ञानाच्या योगानें मोक्ष देणारें साधन आहे. ह्मणून कांहीं लोक सत्यपणानें चालण्यांत आनंद पावतात. )

सत्येनवायुरावातिसत्येनादित्योरोचतेदिविसत्यंवाचः
प्रतिष्ठासत्येसर्वंप्रतिष्ठितंतस्मातसत्यंपरमंवदंति[2] ।

( ह्मणजे वायुदेवता सत्य बोलण्यानें वाहते. सूर्य आकाशांत सत्य बोलण्यानें प्रकाशतो. सत्यनामक परमात्मा हा वाणीला स्थिरपणा देणारा

---

१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ६६.
२. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ७२.

आहे. सत्यनामक परमात्म्यावर सर्व अवलंबून आहे. म्हणून सत्य हेंच मुख्य साधन आहे. )

तेषामसौविरजोब्रम्हलोकोनयेषुजिम्हमनृतं
नमायाचेति[1] ॥ १६ ॥

( म्हणजे ज्याच्या ठिकाणीं कपट नाहीं, व खोटेंपणा नाहीं, व ठकबाजी नाहीं, त्यांना लिंगदेहरहित ब्रम्हलोक प्राप्त होतो. )

ह्याचा ह्या जगांतच थोडक्यांत असा अनुभव पाहवा कीं, सत्यपणा हा फार मोठा सद्गुण आहे असें सर्व लोक समजतात. मनुष्यांमध्यें जसजसा सत्यपणा असतो तसतसा त्याला मोठेपणा मिळतो व त्याची कीर्ति होते. जो सत्यपणानें चालतो त्याजवर सर्व भरंवसा ठेवितात व त्यास जें पाहिजे तें देतात. परमेश्वरामध्यें सत्यपणा अनंत आहे, म्हणून त्याचा महिमा अनंत आहे. ह्यावरून जर सत्यपणानें चालणारा मनुष्य सर्व लोकप्रिय होतो, तर तो परमेश्वराला अत्यंत प्रिय होईल किंवा नाहीं व त्याला परमेश्वर मोक्षरूप अत्यंत सुख देईल किंवा नाहीं हें काय सांगावें! असत्यपणाचा परिणाम नेहमीं वाईट होतो. जो असत्य बोलतो त्याजला शिक्षा होते, त्याजवर कोणी भरंवसा ठेवीत नाहींत. त्याच्या बरोबर कोणी व्यवहार करीत नाहींत. त्याला कोणीही मदत देत नाहींत. ह्याविषयीं लांडगा आणि धनगराचें पोर ह्याची गोष्ट प्रसिद्ध आहे. ती अशी. एक धनगराचें पोर मेंढरें राखीत असतां उगाच खोटें असें ओरडलें कीं " लांडगा आला, लांडगा आला. " तेव्हां शेजारील लोक मदत करण्याकरितां धांवून येऊन पाहतात तों लांडगा नाहीं. तेव्हां पोर लबाड आहे असें समजून ते परत गेले. पुढें कांहीं दिवसांनीं खरोखर लांडगा आला, तेव्हां तें पोर पुनः " लांडगा आला, लांडगा आला " असें ओरडूं लागलें. तेव्हां शेजारील लोक तें पोर लबाड आहे असें समजून कोणीही आले नाहींत. तेव्हां लांडग्यानें बरींच बकरीं पार केलीं.

---

१. प्रश्नोपनिषत् प्र० १.

असत्य बोलण्याचा परिणाम मनुष्यावर होतो येवढेंच नाहीं, तर त्याचा परिणाम निर्जिव पदार्थांवरही घडतो. ह्याविषयीं एक लोकप्रसिद्ध गोष्ट आहे ती अशी. कोणी एक स्वामी एके दिवशीं दोनप्रहरीं एका श्रीमंत सावकाराचे घरीं पुडीस गेले. येथें चांगलें जेवण यथेच्छ जेवून आपल्या देवळांत येऊन निजले. पुढें स्वामी उठले तों एक श्रीमंताची बाई रूप्याच्या प्याल्यांत तांदूळ घेऊन आली व देवापुढें तांदूळ ठेवून त्यास नमस्कार करून तेथें रूप्याचा प्याला विसरून गेली. मग स्वामींनीं तो प्याला आपणाकरितां उचलून ठेविला. परंतु स्वामीस असें वाटलें कीं, आजच आपणास अशी वाईट बुद्धि कां झाली ? तेव्हां स्वामी त्या सावकाराच्या घरीं जाऊन त्यास गुप्तरीतीनें असें म्हणाले कीं, तुमच्या येथें पुडी घेतल्यामुळें मजला आज रूप्याचा पेला चोरण्याची बुद्धि उत्पन्न झाली, तर तुमचें अन्न कसें संपादन केलें आहे तें मला सांगा. तेव्हां त्या सावकारानें स्वामीजवळ खोटें बोलूं नये म्हणून त्यास असें सांगितलें कीं, मी लोकांच्या ठेवी गडप केल्यानें द्रव्यवान झालें आहे व त्या द्रव्यावर निर्वाह करितो. हें ऐकून स्वामींनीं आपल्या शरीराची शुद्धि होण्याचा विधि केला. तसेंच, लोकांमध्यें असें आढळतें कीं, जे लांच खाऊन किंवा दुसऱ्या प्रकारें लोकांचे गळे कापून किंवा त्यांना फसवून किंवा त्यांचा विश्वासघात करून किंवा दुसऱ्या वाईट प्रकारें पैसा मिळवितात त्यांच्या पैशांचा नाश बहुत करून त्यांच्या जीवंतपणींच होतो, आणि कदाचित् पैसा त्यांच्या पश्चात राहिल्यास तो चोरपोर खाऊन त्यांच्या मुलांना त्या पैशाचा उपयोग होत नाहीं, येवढेंच नाहीं तर तो पैसा अनेक प्रकारें त्या मुलांच्या नाशास कारण होतो.

सत्यपणानें शरीराची व अंतःकरणाची शुद्धि होऊन परमात्म्याचें ज्ञान होतें व मोक्ष मिळतो. हें साधन अति सुलभ असून ह्यास पैसा किंवा कष्ट ह्याची जरूरी नाहीं. हें साधन सर्वांना उपयोगी पडण्याजोगें आहे.

## २ तप.

एकादशीस उपवास करणें इत्यादि व्रतें करणें हें ज्ञानाच्या योगानें मोक्ष देणारें उत्तम साधन आहे. ह्याविषयीं श्रुति.

तपइतितपोनानशनात्परंयद्धिपरंतपस्तद्दुर्धर्षं
तद्दुराधर्षंतस्मात्तपसिरमंते[1] ।

( म्हणजे भगवंताच्या प्रातीकरितां एकादशीस उपवास करणें, कृच्छ्र चांद्रायण, इत्यादि तपापेक्षां दुसरें उत्तम तप नाहीं. कारण हीं तपें फारच दुःखाचीं आहेत. म्हणून कांहीं लोक हें तप आनंदानें करितात. )

तपसादेवादेवतामग्रआयन्तपसऋषयः
सुवरन्वविंदन्तपसासपत्नान्प्रणुदामाराती-
स्तपसिसर्वंप्रतिष्ठितंतस्मात्तपःपरमंवदंति[2] ।

( म्हणजे सृष्टीच्या पूर्वीं इंद्रादिक देवांना कृच्छ्रचांद्रायण इत्यादि तपाच्या योगानें देवपणा मिळाला. मोठमोठ्या ऋषींना आलोचनरूप तपानें स्वर्ग मिळाला. आतांही जप इत्यादिकांच्या योगानें आम्ही शत्रूंचा नाश करितो. एकादशीस उपवास करणें इत्यादि तपामध्यें पाहिजे तें सर्व फळ मिळणार आहे. म्हणून तपच मोक्षाचें मोठें साधन आहे असें तप करणारे ह्मणतात. )

जगामध्यें आपण असें पाहतों कीं, जेव्हां सावकार आपल्या कुळाचे घरीं धरणें घेऊन बसतो, तेव्हां सावकाराचें दुःख पाहून कुळाला कष्ट पडून तो पाहिजे तशी तजवीज करून सावकाराचे पैसे देतो. तसेंच, कोणी भिकारी दुसऱ्याचे घराच्या किंवा दुकानाच्या पुढें देवाचीं पदें ह्मणत किंवा चांगलें गाणें गात किंवा आपलें शरीरास इजा करीत

१. नारायणोपनिषत्. भा० २ पृ० ६७.
२. नारायणोपनिषत्. भाग २ पृ० ७३.

बसतो किंवा उभा राहतो, तेव्हां त्या घराचा किंवा दुकानाचा मालक प्रसन्न होऊन त्या भिकाऱ्यास पैसे, अन्न किंवा वस्त्र देतो. असें जर आहे, तर परमेश्वर प्रसन्न होण्याकरितां कष्ट भोगून जे व्रतें करितात त्यांना तो ज्ञान देऊन मुक्ति देईल किंवा नाहीं हें काय सांगावें!

## २ दम.

दम म्हणजे इंद्रियांचा निग्रह करणें, म्हणजे, इंद्रियांना आपआपल्या विषयाकडे भलत्या रीतीनें न जाऊं देणें. इंद्रियांचा स्वाभाविक कल पाहिला असतां भलत्या विषयाकडे जाण्याचा आहे. जगामध्यें हजारों लोक नाच, तमाशे, बैठकी, वाईट नाटकें इत्यादि पाहण्यांत गुंतले आहेत. हजारों लोक बीभत्स लावण्या, ठुंबऱ्या इत्यादि ऐकण्यांत आपला सर्व मोल्यवान काळ घालवितात. हजारों लोक स्त्रियांच्या नादीं लागून रांडबा-जीच्या व्यसनांत निमग्न आहेत. हजारों लोक व्यर्थ भांडणांत गुंतून आपला पैसा गमावून भिकेस लागले आहेत. हजारों लोक दारू, मांस इत्यादि वाईट पदार्थ पिण्यांत व खाण्यांत गुंतले आहेत. हजारों लोक दुसऱ्यांच्या मुंडद्या मुरगाळून व दुसऱ्या लबाडीच्या प्रकारें आपणांस संपत्ति मिळविण्याच्या उद्योगांत आहेत. हजारों लोक पोट भरण्याकरितां किंवा वाईट संवय लागल्यामुळें किंवा दुष्ट स्वभाव असल्यामुळें अनेक प्रकारचे गुन्हे करीत आहेत. जे वाईट विषयाकडे इंद्रियांना जाऊं देतात ते विचारशील असल्यास ते पक्के समजतात कीं आपण जें करितों तें वाईट आहे, तथापि त्यांचीं इंद्रियें त्यांना आवरत नाहींत. ज्यांचीं इंद्रियें भलत्या विषयाकडे जातात त्यास जगामध्यें निंद्य व बेअ-ब्रूचे असें समजतात, व चांगलीं मनुष्यें त्यांच्यापासून दूर राहतात. जगामध्यें आपले पाहण्यांत असें येतें कीं, जो आपले इंद्रियांना भलत्या विषयाकडे जाऊं देत नाहीं त्याला लोक पुष्कळ मान देतात; त्याच्या-विषयीं पूज्यबुद्धि बाळगितात, आणि त्याला जें पाहिजे तें प्राप्त होतें. जर इंद्रियनिग्रह करणाऱ्याबरोबर अल्पज्ञ व अल्पशक्तिमान मनुष्यें

ह्याप्रमाणें वागतात, तर सर्वज्ञ व सर्वशक्तिमान परमेश्वर त्याला मुक्ति देईल किंवा नाहीं हें काय सांगावें!

ह्यावरून दम हें ज्ञान संपादन करून मुक्ति मिळविण्याचें एक उत्तम साधन आहे ह्याविषयीं श्रुति—

दमइतिनियतंब्रह्मचारिणस्तस्माद्दमेरमंते[1]।

(म्हणजे ब्रह्मचारी निरंतर दमरूप तप करितात. ह्मणून कित्येक अधिकारी इंद्रियनिग्रहच मुख्य तप समजून त्यामध्यें रमतात.)

दमेनदांताःकिल्बिषमवधून्वंतिदमेनब्रम्हचारिणः
सुवरगच्छंदमोभूतानांदुराधर्षंदमेसर्वंप्रतिष्ठितं
तस्माद्दमःपरमंवदंति[2]।

(म्हणजे ब्रम्हचारी ह्यांनीं आपल्या इंद्रियांचा निग्रह करून आपल्या पापाचा नाश केला. तेणेंकरून ते स्वर्ग लोकाला गेले. इंद्रियनिग्रह करणें हें मनुष्यांना फार कठीण आहे, म्हणून इंद्रियनिग्रह केल्यानें पाहिजे तें फळ मिळतें. ह्या कारणास्तव इंद्रियनिग्रह करणें हेंच मुख्य साधन आहे असें कांहीं ज्ञानी म्हणतात.)

## ४ शम.

शम म्हणजे बुद्धि परमेश्वराचे ठिकाणीं एकसारखी स्थिर ठेवणें. आपलीं इंद्रियें आवरून धरलीं म्हणजे शांतता येते. शांतता आल्यावर परमेश्वराकडे बुद्धि योग्य प्रकारें लाविली असतां ती त्याचे ठिकाणीं स्थिर होते. तसें झालें असतां परमेश्वर प्रसन्न होऊन भक्तास मुक्ति देतो. म्हणून शम हें एक मुक्तीचें उत्तम साधन आहे. ह्यास प्रमाण—

---

१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ६७.

२. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ७४.

शमइत्यरण्येमुनयस्तस्माच्छमेरमंते[1] ।

( म्हणजे शम हें एक उत्तम साधन आहे. म्हणून अरण्यांत राहणारे वानप्रस्थाश्रमी मुनी शमरूप तपामध्येंच रमतात. )

शमेनशांताः शिवमाचरंति शमेननाकं मुनयो

ऽन्वविंदनूछमो भूतानां दुराधर्षंछमेसर्वं प्रातिष्ठितं

तस्माच्छमः परमं वदंति[2] ।

( म्हणजे शांत असलेले ऋषि परमेश्वराच्या ठिकाणीं एकसारखी स्थिरबुद्धि ठेवून आपलें कल्याण होईल असें करितात. मुनी परमेश्वराच्या ठिकाणीं एकसारखी स्थिरबुद्धि ठेवून स्वर्गास गेले. परमेश्वराच्या ठिकाणीं बुद्धि एकसारखी स्थिर ठेवणें हें प्राण्यांना फार दुःसाध्य आहे. परमेश्वराच्या ठिकाणीं एक सारखी स्थिरबुद्धि ठेविल्यानें सर्व प्राप्त होतें. म्हणून शम हा मोक्षाचें उत्तम साधन आहे. )

साधारण व्यवहारांत देखील असें पाहण्यांत येतें कीं, चाकरानें आपल्या धन्यावर, शिष्यानें आपल्या गुरूवर, बायकोनें आपल्या नवऱ्यावर, मुलानें आपल्या आईबापावर किंवा कोणा मनुष्यानें आपल्या स्नेह्यावर एकनिष्ठ बुद्धि ठेवून त्याच्या मर्जीप्रमाणें चांगल्या रीतीनें वागणूक केली असतां धनी इत्यादि प्रसन्न होऊन चाकर इत्यादिकांस पाहिजे तें देतात व त्यांचें कल्याण करितात. असें जर अल्पज्ञ, अल्पशक्तिमान्, व अल्प दयाळू मनुष्य त्याच्यावर एकनिष्ट अशी बुद्धि ठेविल्यानें पाहिजे तें देतो, तर सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् व पूर्ण दयाळू अशा परमेश्वराच्या ठिकाणीं एक सारखी स्थिर बुद्धि ठेविली असतां तो मुमुक्षूला मुक्ति देईल किंवा नाहीं हें काय सांगावें !

---

१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ६७.

२. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ७५.

## ५ दान.

दान म्हणजे आपल्या मालकीच्या योग्य पदार्थावरील आपली मालकी सत्पात्र अशा दुसऱ्या मनुष्यास किंवा मनुष्यसमुदायास किंवा इतर प्राण्यास किंवा वस्तूस त्याजकडून कांहीं मोबदला न घेतां किंवा घेण्याची इच्छा न ठेवितां निष्काम बुद्धिनें देणें. उदाहरण, गरिबांना अन्नवस्त्र, पैका, इत्यादि देणें; जनावरांना चाराघालणें; पक्ष्यांना दाणें घालणें, पंढरपूरच्या विठोबास जमीन देणें, इत्यादि. जगांत बहुतकरून सर्व लोक असे आहेत कीं, ते संपत्तीची फार इच्छा करितात. अज्ञान मुलांना सुद्धां पैसा फार प्रिय वाटतो. एक लहान मूल रांगत रांगत चिरेबंदी मोरीच्या भोंकांत शिरून आंत लांब पर्यंत गेलें. त्याला बाहेर काढतां येईना व तें आंत फार रडत राहिलें. तेव्हां एका कुशल मनुष्यानें "हा रुपया घे" म्हणून मोरीच्या तोंडाशीं रुपया वाजविला, तेव्हां तें मूल पाठीमागें सरकत सरकत बाहेर निघालें.

बहुतेक लोक संपत्ती करितां भाड्याच्या बैला प्रमाणें ओझीं वाहण्याचें काम करितात; परंतु संपत्ति मिळाल्यावर तिचा उपयोग कसा करावा हें समजणारे लोक फार विरळा आढळतात. बहुतकरून कोणी समजत नाहींत असें ह्मटलें असतां हरकत नाहीं. दानशूरत्व असणें हा गुण फार क्वचित आढळतो. तथापि लोकांमध्यें हा गुण कमजास्त आढळतो, कारण दयेवांचून कोणीही प्राणी नाहीं. परंतु क्वचित प्रसंगीं एकादा मनुष्य कर्णासारखा दानशूर व दयाळू अंतःकरणाचा आढळतो. असा मनुष्य जीवंत असतां जगामध्यें त्याची मोठी कीर्ति होते व मेल्यावरही त्याची कीर्ति फार दिवस राहते. असा मनुष्य सर्व जगांत पूज्य होऊन त्याच्या अंकित सर्व असतें. जर दान करण्याचा परिणाम ह्या लोकीं असा आहे तर परलोकीं परमेश्वर अशा मनुष्यावर प्रसन्न होऊन मुक्ति देईल किंवा नाहीं हें कशास सांगायाला पाहिजे ! ह्याविषयीं प्रमाणः—

दानमिति सर्वाणि भूतानि प्रशꣳसंतिदानान्ना–

तिदुश्चरं तस्माद्दाने रमंते[1]।

(म्हणजे दान करणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे. म्हणून सर्व प्राणी त्याची स्तुति करितात. कारण दानापेक्षां अतिशय दुष्कर तप असें दुसरें नाहीं. म्हणून कित्येक दानामध्येंच रमतात.)

दानं यज्ञानां वरूथं दक्षिणा लोके दातारꣳ सर्व-

भूतान्युपजीवंति दानेनारातीरपानुदंतदानेन-

द्विषंतो मित्रा भवंति दाने सर्वं प्रतिष्ठितं तस्मा-

द्दानं परमं वदंति[2]।

(म्हणजे यज्ञादिकामध्यें दक्षिणा देणें हें दान श्रेष्ठ आहे. लोकांमध्यें सर्व प्राणी दान देणारावर उपजीवन करितात. तसेच पैसे इत्यादि देऊन शत्रूचा नाश करितात. जे द्वेष करितात त्यांना द्रव्य दिल्यानें ते मित्र होतात. दान केल्यानें आपणास पाहिजे तें मिळतें. म्हणून दान करणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे.)

## ६ धर्म.

धर्म म्हणजे वेद, स्मृति व पुराण इत्यादिकांमध्यें सांगितल्याप्रमाणें स्नान, संध्या, जप, देवपूजा इ० करणें; विहिरी, आड, व तळीं बांधणें; इत्यादि जो मनुष्य आपली जात, वर्ण, व आश्रम ह्यांस योग्य अशा धर्मानें चालतो त्यास उत्तम व श्रेष्ठ समजावा; आणि जो धर्म सोडून वागतो त्यास कनिष्ट व अधम समजावा. जो धर्माप्रमाणें चालत नाहीं तो मनुष्य फार भयंकर समजून त्याच्या पासून फार दूर रहावें. जो धर्मानें वागतो त्याचे हातून सहसा वाईट आचरण होत नाहीं, आणि जो अधर्मानें वागतो त्याचें हें वागणेंच दुराचरण होतें. जो धर्मानें वागतो

१. नारायणोपनिषद् भा० २ पृ० ६७.

२. नारायणोपनिषद् भा० २ पृ० ७५.

त्याच्या तोंडावर निराळ्याच प्रकारचें म्हणजे पुण्याचें तेज असतें. त्याच्या योगानें लोकांमध्यें त्याचें मोठें वजन पडतें. आपलें रोजच्या पाहण्यांत असें येतें कीं, जो आपल्या धर्माप्रमाणें वागतो त्याजवर लोकांची श्रद्धा बसते. धर्मशील मनुष्यावर लोकांचा अतिशय भरंवसा राहून त्याजबरोबर निःशंकपणानें ते व्यवहार करितात. जो आपल्या धर्मानें वागतो त्यास सर्व दुनिया मान देते व त्याच्याविषयीं पूज्य बुद्धि ठेवितात. जो आपल्या धर्मानें वागत नाहीं त्यास अति निंद्य व हलकट समजतात. जो धर्मभ्रष्ट असतो तो नेहमीं संकटांत असतो. म्हण आहे कीं 'धर्मभ्रष्टो सदा कष्टी.' जो धर्मभ्रष्ट असतो तो कमी आयुष्याचा होतो. धर्मभ्रष्टपणानें मनुष्याचे कुटुंबास व राष्ट्रास अनेक प्रकारचीं दुःखें सोसावीं लागतात. जे सांथीचे रोग किंवा लढाईचे प्रसंग येतात ते राज्यामध्यें फार अधर्म झाल्यामुळें येतात. अधर्मानें फार पाप वाढतें, व पापाचा परिणाम ह्याप्रमाणें होतो. हें प्रजेच्या किंवा राजाच्या लक्षांत येत नसल्यामुळें दुःख निवारणाचे बरोबर उपाय होत नाहींत. अधर्माच्या योगानें पाप वाढून संतति व संपत्ति नाहींशी होते. ह्याप्रमाणें अधर्मापासून अनेक प्रकारचीं अरिष्टें उत्पन्न होतात; आणि मोठी दुर्दैवाची गोष्ट ही कीं, धर्मांध लोकांच्या मनांत ही गोष्ट वागत नाहीं. साधारणपणानें हें लक्षांत ठेवावें कीं, दुसऱ्यास आनंद वाटेल असें आपण कांहीं कृत्य केलें तर तेणेंकरून त्या मनुष्याचें हृदयांत असलेल्या परमेश्वरासही आनंद वाटतो. म्हणून आपण धर्माप्रमाणें आचरण केल्यानें दुसऱ्यास आनंद झाला तर तेणेंकरून परमेश्वर संतुष्ट होतो. मग प्रसन्न झालेला परमेश्वर धर्मिष्ट मनुष्याचें कल्याण करील किंवा नाहीं व त्यास मुक्ति देईल किंवा नाहीं हें काय सांगावें! ह्यास प्रमाण-—

धर्म इतिधर्मेण सर्वमिदं परिगृहीतं धर्मान्नाति-
दुष्करं तस्मात्धर्मेरमंते[1] ।

---

१. नारायणोपनिषत्. भा० २ पृ० ६९.

(म्हणजे धर्म हा मोक्षाचें साधन आहे असें कित्येक मानितात. धर्मानें हें सर्व जग चाललें आहे. धर्माहून दुसरें कोणतेंही तप कठीण नाहीं. म्हणून धार्मिक लोक धर्मामध्यें रमतात.)

धर्मोविश्वस्यजगतः प्रतिष्ठा लोके धार्मिष्ठं
प्रजा उपसर्पंति धर्मेण पापमपनुदाति धर्मे सर्वं
प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदंति[२] ।

(म्हणजे धर्म हा सर्व जगाच्या स्थितीस कारण आहे. लोकांमध्यें जो उत्तम धर्मानें वागतो त्याच्या जवळ लोक आपल्याला पाहिजे तें मिळण्या करितां जातात. धर्मानें मनुष्याचें पाप नाहींसें होतें. जें पाहिजे असेल तें फळ धर्मामध्यें आहे. म्हणून धर्म हा मोक्षाचें उत्तम साधन आहे असें म्हणतात.)

## ७ प्रजनन.

प्रजनन म्हणजे धर्मपत्नीचे ठिकाणीं संतति उत्पन्न करणें. जगांत हरएक लोकांमध्यें मनुष्यें अशी इच्छा करितात कीं, आपणास मुलगा असावा, तो आपला वारस व्हावा, त्यानें आपली जिनगी घ्यावी, आपले पश्चात आपलें क्रियाकर्मांतर करावें, त्यासही संतति व्हावी, व आपला निर्वंश न होण्यास्तव त्यानें व त्याच्या संततीनें वंशपरंपरा आपलें नांव चालवावें. धर्मशास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, पुत्र जन्मला म्हणजे तो लगेच आपले बापास पुन् नामक नरकापासून तारतो. ह्या वरून पुत्र जन्मल्यानेंच बाप मुक्तीस जातो असें होतें. ह्याच कारणास्तव मुलग्याला पुत्र असें म्हटलें आहे. साधारणपणें ज्यास मुलगा होत नसेल किंवा मुलगा होऊन मरत असेल त्यास पापिष्ठ समजतात. कोणास मुलगा असल्यास त्यास दैववान समजतात. कांहीं प्रसंगीं पुत्रवती स्त्रियांना निपुत्रवती स्त्रियांच्या अगोदर वारसा मिळतो. उदाहरण,

२. नारायणोपनिषत भा० २ पृ० ७६.

मेताच्या दोन मुली असून एकीस मुलगा असेल व दुसरीस नसेल तर पुत्रवती मुलगी अगोदर वारस होते. कांहीं धर्म संबंधीं कृत्य करितांना भोजनास दंपत्य सांगतात, तेव्हां त्यांना मुलगा असल्यास तें दंपत्य चांगलें असें समजतात. घरांतून बाहेर निघतांना पुढें विधवा आली तर तो अपशकून होतो, परंतु त्या विधवेस मुलगा असल्यास तो शकून चांगला असें समजतात. ह्याशिवाय सर्व मनुष्यांची स्वाभाविक इच्छा मुलगा व्हावा अशी असते. कोणाची बायको बाळंतीण होऊं लागली म्हणजे तिजला मुलगा होतो किंवा मुलगी होते ह्याची तो काळजीनें वाट पाहत असतो, आणि मुलगा झाल्यास आनंदानें पेढे वाटतो व मुलगी झाल्यास खिन्न होतो. ह्यावरून मुलगा होणें ही गोष्ट सर्व मनुष्यांना फार महत्वाची, फार प्रियकर व फार आनंदाची आहे. म्हणून सर्व मनुष्यांच्या हृदयांत असलेल्या परमेश्वरासही ती गोष्ट फार संतोषकारक असली पाहिजे. म्हणून जो प्रजनन म्हणजे चांगला पुत्र जन्मेल असें कृत्य करितो त्याजवर परमेश्वर प्रसन्न होऊन त्यास ज्ञान देऊन मुक्ति देतो. ह्याविषयीं प्रमाण—

प्रजननइतिभूयाꣳसस्तस्माद्भूयिष्ठाः प्रजायंते
तस्माद्भूयिष्ठाः प्रजनने रमंते[1] ।

(म्हणजे धर्मपत्नीचे ठिकाणीं संतति उत्पन्न करणें हें मोक्ष देणारें साधन आहे असें पुष्कळ ज्ञानी मानितात. म्हणून पुष्कळ ज्ञानी मनुष्यें पुत्र व्हावा अशी इच्छा करितात. ह्यास्तव पुष्कळ लोक पुत्र उत्पन्न करण्यामध्यें रमतात.)

प्रजननंवै प्रतिष्ठा लोके साधु प्रजायास्तंतुं
तन्वानः पितृणामनृणो भवति तदेव तस्या अनृणं
तस्मात्प्रजननं परमं वदंति[2] ।

---

१. नारायणोपनिषत्. भा० २ पृ० ६९.
२. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ७७.

( म्हणजे आपल्या बायकोपासून चांगला मुलगा उपत्न्न करणें हें वंश राहण्याला कारण आहे. लोकांमध्यें चांगले मुलगे व मुली ह्यांचा विस्तार करणारा मनुष्य वडिलांच्या ऋणांतून मुक्त होतो. म्हणून उत्तम मुलगे व मुली होणें हेंच ऋणमुक्त करणारें आहे. म्हणून चांगली संतति उत्पन्न करणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे असें म्हणतात. )

## ८. अग्नि.

जो अग्नीची सेवा करितो त्यास परमेश्वर ज्ञान देऊन मुक्ति देतो. ह्यास प्रमाण.—

अग्नय इत्याह तस्मादग्नय आधातव्या
अग्निहोत्रमित्याह तस्मादग्निहोत्रे रमंते[1] ।

( म्हणजे अग्नीची सेवा केली असतां मोक्ष मिळतो असें कोणी म्हणतात. म्हणून गृहस्थांनीं अग्नींची सेवा करावी. )

अग्नयो वैत्रयी विद्यादेवयानः पंथागार्हपत्य
ऋक्पृथिवी रथंतरमन्वाहार्यपचनं यजुरंत
रिक्षंवामदेव्यमाहवनीयः सामसुवर्गो लोको बृह-
त्तस्मादग्नीन्परमं वदंति[2] ।

( म्हणजे गार्हपत्य, दक्षिणाग्नि, आहवनीय असे तीनप्रकारचे अग्नी हे तीन वेद आहेत असें म्हणतात. अग्नि हा परमेश्वराकडे जाण्याचा मार्ग आहे. गार्हपत्य हा अग्नि ऋग्वेद आहे. पृथिवी नांवाचा अग्नि हा सामवेदांतील रथंतरनांवाच्या भागानें प्रतिपादन केलेला आहे. अन्वाहार्यपचन म्हणजे दक्षिणाग्नि हा यजुर्वेद आहे. गार्हपत्य व आहवनीय ह्या दोहोमध्यें तो ध्यान करण्यास योग्य आहे. तो वाम-

१. नारायणोपनिषत् भाग २ पृ. ६१.
२. नारायणोपनिषत्. भा० २ पृ० ७८.

देवानें गायन केलेल्या सामवेदानें युक्त आहे. आहवनीय नांवाचा अग्नि सामवेद आहे. तो स्वर्गलोक मिळवून देणाऱ्या होमद्रव्यांचा आधार आहे. तो सामापैकी बृहत्सामानें वर्णिलेला आहे. म्हणून हे तीन अग्नि मोक्षाचें मुख्य साधन आहेत असें म्हणतात.)

## ९ अग्निहोत्र.

गृहस्थांच्या पाठीमागें प्रपंचाची फार लचांडें असतात; त्यामुळें त्यांना मोठें तप किंवा दुसरें कांहीं कठिण साधन मिळविण्यास फार अडचण पडते. अशा लोकांनीं अग्निहोत्र ठेवून अग्निनारायणाची सेवा केल्यास त्यांनां ज्ञान प्राप्त होऊन मुक्ति मिळते.

ह्यास प्रमाण.

## १० यज्ञ.

देवाला यज्ञ फार प्रिय आहे. यज्ञ केल्यानें मनुष्याचे मोठ मोठाले मनोरथ देव पूर्ण करितो. योग्य प्रकारें यज्ञ करणें हें सामान्य काम नाहीं. यज्ञ करण्यास पैसा फार लागतो व मोठमोठाल्या विद्वान ब्राह्मणांची मदत लागते. इतकेंही करून परमेश्वर अनुकूल असल्यास यज्ञ योग्यप्रकारें सिद्धीस जातो. अनेक वेळीं अनेक ठिकाणच्या राजांनीं अनेक ऋषींची मदत घेवून अनेक उद्देशांनीं अनेक प्रकारचे यज्ञ केले व त्यांना उद्देशलेलीं अनेक फलें प्राप्त झालीं असें वेद व पुराण ह्यांत आढळतें. योग्य प्रकारें यज्ञ करून परमेश्वर संतुष्ट झाल्यास तो यज्ञ करणारावर प्रसन्न होऊन त्यास ज्ञान देऊन मुक्ति देतो. ह्यास प्रमाण—

यज्ञ इति यज्ञोहिदेवास्तस्माद्यज्ञे रमंते[1]।

(म्हणजे कांहीं लोक असें मानितात कीं यज्ञ करणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे, कारण परमेश्वराला यज्ञ प्रिय आहे. यज्ञ केल्यानें देव स्वर्ग लोकाला गेले. म्हणून कांहीं यज्ञाचे ठिकाणीं रमतात.)

---

१. नारायणोपनिषद् भाग २ पृ० ७०.

यज्ञ इति यज्ञेन हिदेवादिवं गता यज्ञेनासुरान-
पानुदंत यज्ञेन द्विषंतो मित्राभवंति यज्ञे सर्वं प्रति-
ष्ठितं तस्माद्यज्ञं परमं वदंति[२] ।

( म्हणजे यज्ञ हा मोक्षाचें साधन आहे. कारण देवही यज्ञानें स्वर्गास गेले. देव हे यज्ञानें दैत्यांचा पराजय करितात. यज्ञानें आपले शत्रु मित्र होतात. यज्ञानें सर्व फळ मिळतें. म्हणून यज्ञ हाच मोक्षाचें उत्तम साधन आहे असें ह्मणतात. )

**११ मन एकाग्रकरणें.**

मन एकाग्र करणें हें ज्ञानाचें फारच उत्तम साधन आहे. साधारणपणें आपणास कांहीं गोष्टीचें विस्मरण झालें असून त्याची आठवण करितों तेव्हां त्या विसरलेल्या गोष्टीचें ज्ञान होतें. अशी गोष्ट व्यवहारांत नेहमीं घडते. ह्यावरून मन एकाग्र करणें हें एक ज्ञानाचें इतकें जबर साधन आहेकीं, त्याच्या योगानें परमेश्वराचें ज्ञान होऊन मुक्ति मिळते. चित्त एकाग्र करण्याचा अभ्यास योग्य मनुष्यानें योग्य प्रकारें फार दिवस करावा लागतो. हा अभ्यास कसा करावा व त्याजपासून काय फळें मिळतात हें योगशास्त्रांत सविस्तरपणें सांगितलेलें आहे. ज्यास ह्याची चांगली माहिती करून घेण्याची इच्छा असेल त्यांनीं आम्ही योगसूत्राच्या मराठी तरजुम्याचे चार भाग छापिले आहेत ते पहावेत. योगाभ्यासाच्या योगानें विलक्षण शक्ती प्राप्त होतात. योगाभ्यास हा बुद्धिवान, सदाचारी, व पुण्यवान मनुष्यास मात्र साध्य आहे, इतरांना नाहीं. ज्यास परमेश्वराचें ज्ञान करून घेण्याची योग्यता असेल त्याचा योगाभ्यास सिद्धीस जातो. ज्याची तशी योग्यता नसेल तो योगाभ्यास करीत असतां त्यास मध्येंच विघ्न येतें. असें झालें असतां तो मनुष्य नाश पावत नाहीं, किंवा वाईट गतीला जात नाहीं, तर तो पुढील जन्मीं योग्य कुलांत उत्पन्न होऊन त्याला आपला योगाभ्यास पुढें वाढविण्याची

२. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ८१.

साधनें प्राप्त होतात. ह्या विषयीं गीतेच्या ६ वे अध्यायांत श्लोक आहेत ते असे —

प्राप्य पुण्यकृतां ल्लोकानुषित्वा शाश्वती समाः ॥
शुचीनां श्रीमतांगेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥
अथवा योगिनामेव कुलेभवति धीमताम् ॥
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्मयदीदृशम् ॥ ४२ ॥
तत्रतं बुद्धिसंयोगं लभते पौर्वेदेहिकम् ॥
यततेच ततोभूयः संसिद्धौ कुरु नंदन ॥ ४३ ॥
पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियतेह्यवशोऽपिसः ॥
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥
प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ॥
अनेकजन्मसंसिद्धस्ततोयाति परांगतिम् ॥ ४५ ॥
तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपिमतोऽधिकः ॥
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥
योगिनामपिसेर्वेषांमद्गतेनांतरात्मना ॥
श्रद्धावान् भजते योमां स मे युक्ततमोमतः ॥ ४७ ॥

( म्हणजे पुण्य केल्यानें जे लोक प्राप्त होतात त्या लोकीं जाऊन तेथें पुष्कळ वर्षे राहून पवित्र व श्रीमंत ह्यांचे घरीं योगभ्रष्ट जन्मास येतो ॥ ४१ ॥ अथवा ज्ञानवान् योग्यांचे कुलांत जन्मास येतो. ह्या जगांत अशा प्रकारचा जन्म येणें अति दुर्मिळ आहे ॥ ४२ ॥ तेथें पूर्वीच्या देहांत असलेला संस्कार त्यास प्राप्त होतो. हे अर्जुना, मग ज्ञान प्राप्ती विषयीं तो पूर्वीपेक्षां ज्यास्त प्रयत्न करितो ॥ ४३ ॥ त्यास योगाभ्यास करण्याची इच्छा नसली तरी पूर्वीच्या योगाभ्यासाच्या संस्काराच्या योगानें तो विषयापासून परत फिरून ब्रम्ह-

निष्ठ होतो. योग जाणण्याची इच्छा करणाराही विधिनिषेधात्मक वेदाला उल्लंघून मुक्त होतो ॥ ४४ ॥ दिवसेंदिवस अधिक योगाभ्यासाचा प्रयत्न केल्यानें योगी योगानेंच पापरहित होतो. नंतर अनेक जन्मांनीं अपरोक्ष ज्ञानी होऊन त्याला उत्तम गति प्राप्त होते ॥ ४५ ॥ कृच्छ्रचांद्रायणादि तपें करणाऱ्यांपेक्षां ध्यान योग करणारा उत्तम आहे, ध्यान न करितां ध्यानाचा प्रकार चांगल्या प्रकारें जाणणाऱ्या ज्ञान्यापेक्षां ध्यानाचा प्रकार चांगल्या रीतीनें समजून ध्यान करणारा योगी अधिक उत्तम आहे, आणि यज्ञ इत्यादि कर्में करणाऱ्यापेक्षां ध्यान करणारा योगी अधिक उत्तम आहे. ह्मणून हे अर्जुना, तूही ध्यान करणारा योगी हो ॥ ४६ ॥ सर्व योग्यांमध्येंही जो श्रद्धायुक्त भक्तिमान असून माझ्या ठिकाणीं स्थिर झालेल्या अंतःकरणानें व फल मिळण्याची इच्छा न धरितां माझी सेवा करितो तो योगी उत्तम आहे असें माझें मत आहे ॥ ४७ ॥ )

योगज ज्ञान सत्य असतें. आपल्या लोकांत बहुतेक ज्ञान योगज असल्याकारणानें सत्य आहे. म्हणून त्या ज्ञानांत वेळोवेळीं फरक होऊं शकत नाहीं. परंतु ह्या देशांतील लोकांप्रमाणें परदेशांतील लोकांना योगज ज्ञान नसल्यामुळें त्यांच्या ग्रंथाच्या निरनिराळ्यावेळीं निघालेल्या निरनिराळ्या आवृत्तींत निरनिराळ्या चुका व निरनिराळ्या सुधारणुका आढळतात.

मनाच्या एकाग्रतेनें परमात्म्याचें ज्ञान होऊन मुक्ति मिळते. ह्यास प्रमाण—

मानस मिति विद्वांऽसस्तस्माद्विद्वांऽसएवमान-
से रमंते[1] ।

( ह्मणजे ध्यान इत्यादि हें मोक्षाचें उत्तम साधन आहे असें कांहीं विद्वान मानितात. ह्मणून विद्वान मनुष्यें ध्यान इत्यादिकामध्यें रमतात. )

---

१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ७८.

मानसं वैप्राजापत्यं पवित्रं मानसेनमनसा

साधुपश्यति मानसाऋषयः प्रजा असृजंत

मानसे सर्वं प्रतिष्ठितं तस्मान्मानसंपरमंवदंति[१] ।

( ह्मणजे मनानें विचार करून मिळालेल्या ज्ञानानें प्रजापति देवाला उद्देशून केलेलें अनुष्ठान पवित्र करणारें आहे. एकाग्र चित्तानें विचार करून उत्तम ज्ञान मिळवितो. ब्रह्मदेवानें आपल्या मनानें जे मरीचि इत्यादि पुत्र उत्पन्न केले त्यांनीं सर्व प्रजा केवळ आपल्या संकल्पानें निर्माण केलीं. एकाग्र चित्ताचे ठिकाणीं सर्व इच्छित फळ मिळतें. ह्मणून मनन हें मोक्षाचें उत्तम साधन आहे असें विद्वान ह्मणतात.

तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ।

( ह्मणजे मननाच्या योगानें परमेश्वराला जाणण्याची इच्छा कर. )

## १२ संन्यास.

साधारण लोक असें समजतात कीं, संन्यास म्हणजे डोई बोडून मिशाकाढून भगवें गुंडाळून लोकांच्या घरीं पुडी खाण्यास जाण्याला तयार होणें. कित्येक संन्याशी असे असतात कीं, ते व्यापार करितात, घरच्या माणसाजवळ राहतात, तंबाखु खातात, कोर्टांत साक्षीला जातात, खोटा कागद करितात, खून करितात, इ०. हा संन्यास नव्हे. संन्यास म्हणजे काय ह्या विषयीं गीतेच्या १८ व्या अध्यायांत २ रा श्लोक आहे तो असा—

काम्यानां कर्मणांन्यासं संन्यासं कवयोविदुः ॥

सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

( म्हणजे काम्यकर्म न करणें ह्यास संन्यास असें विद्वान लोक समजतात; सर्व कर्मांच्या फळांची इच्छा सोडणें ह्यास विचारवंत लोक त्याग

---

१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ८१.

असें म्हणतात. न्यास म्हणजे त्याग करणें, म्हणजे सोडणें; आणि संन्यास म्हणजे सम्यक् न्यास म्हणजे उत्तम प्रकारें सोडणें. कोणतेंही कर्म कारितांना त्या कर्मापासून आपणास अमुक फळ प्राप्त व्हावें अशी इच्छा अगदीं न ठेवितां तें कर्म केवळ भगवंताच्या प्रीत्यर्थ करणें ह्यास संन्यास ह्मणतात. अशा प्रकारें संन्यासी होणें फार कठिण व दुर्घट आहे. साधारण व्यवहारांतही असें आढळतें कीं, जो कोणी चाकर नेहमी आपल्या धन्याकरितांच कामें करितो त्याजवर त्या धन्याची मर्जी मोठी बहाल असते. मग जो मनुष्य आपलीं सर्व कर्में निष्काम बुद्धिनें करून परमेश्वरास अर्पण करितो त्याजवर तो प्रसन्न होऊन त्यास मुक्ति देईल किंवा नाहीं हे काय सांगावें !

मुक्ति मिळण्याला संन्यासासारखें दुसरें उत्कृष्ट साधन नाहीं. ह्यास प्रमाण—

न्यास इति ब्रम्हा ब्रम्हाहि परः परोहि ब्रम्हा ता-
निवाएतान्यवराणि परा॰ सिन्यास एवात्यरेच-
यद्यएवं वेदेत्युनिषत्[1] ।

(म्हणजे संन्यास हा मोक्षाचें उत्तम साधन आहे असें ब्रम्हदेव मानितो. तो ब्रम्हदेव परमात्म्याहून निराळा आहे. तीं म्हणजे पूर्वी सांगितलेलीं अकरा साधनें उत्कृष्ट आहेत तथापि त्या सर्वांहून उत्कृष्ट साधन संन्यास आहे. जो ह्याप्रमाणें जाणतो तो मोक्षास जातो. हें उपनिषदाचें मुख्य तात्पर्य आहे.)

न्यासइत्याहुर्मनीषिणोब्रह्माणं[2] ।

(म्हणजे कर्म करितांना फलाची इच्छा सोडणें ह्यास न्यास ह्मणतात. तो परमात्म्यासारखा आहे आणि तो त्याला अतिशय प्रियकर आहे असें ज्ञानी ह्मणतात.)

१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ७०.

२. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ८२.

तस्मान्न्यासमेषां तपसा मतिरिक्तमाहुः।[1]

( म्हणजे, म्हणून ह्या [ म्हणजे पूर्वी सांगितलेल्या बारा साधनां] मध्यें संन्यास हा उत्कृष्ट साधन आहे असें ज्ञानी म्हणतात. )

ह्याप्रमाणें मुक्ति मिळविण्याला बारा साधनें वर सांगितलीं आहेत. ज्या मनुष्याची योग्यता जशी असेल तशीं त्यानें कोणतें एक किंवा अनेक साधनांच्यायोगानें परमेश्वरास प्रसन्न करून मुक्ति मिळवावी.



१. नारायणोपनिषत् भा० २ पृ० ८१.

# नारायणोपनिषत्.

## भाग २.

अदितिर्देवागंधर्वामनुष्याः पितरोऽसुरास्तेषाꣳसर्वभूतानांमातामेदिनीमहतामहीसावित्रीगायत्रीजगत्युर्वीपृथ्वीबहुलाविश्वाभूताकतमाकायासासत्येत्यमृतेतिवसिष्ठः ॥२८॥

**टीका—देवाः** तत्वाभिमानिनोदेवाः अष्टविधाः **गंधर्वाः** त्रिविधाः देवगंधर्वाः मनुष्यगंधर्वाः असुरगंधर्वाश्चेति **मनुष्याः** अर्वाक् स्रोतः संज्ञकाः[1] **पितरः** चिरपितरः **असुराः**[2] चतुर्विधाः दैत्यरक्षःपिशाचमर्त्याधमभेदेन **तेषां सर्वभूतानां** देवादीनां तदतिरिक्तसर्वप्राणिनां च **अदितिः**[3] तच्छब्दवाच्या परमात्मनो मूर्तिः **माता**[4] अव्यवधानेन निर्मात्री **मेदिनी** पुष्टा **महता** महत्तत्वाभिमानिना चतुर्मुखेन **मही** पूज्या **सावित्री**[5] सर्वप्राणिप्रसवितृत्वात् सवितृनामसूर्यसंबंधित्वाद्वा **गायत्री**[6] गायनत्राणकर्त्री **जगती** सदासर्वत्रगतिमती **उर्वी** उत्कृष्टा च **पृथ्वी** प्रथनात् विस्तृतत्वात् पृथ्वीनाम्निभगवन्मू-

---

१ अर्वाक्स्रोतस्तु नवमः क्षत्तरेकविधोनृणामिति भागवते ।

२ परप्राणहिंसादिभिः स्वासुतर्पकत्वादसुरत्वं ।

३ तथा च सूत्रं अत्ताचराचरग्रहणादिति । सर्वं वा अत्तीति तददितेरदितित्वमिति श्रुतिश्च ।

४ अदितिर्माता स पिता स पुत्र इति श्रुतिः ।

५ षूङ्प्राणिप्रसव इत्यस्माद्धातोस्तृच्प्रत्यये ऋन्नेभ्योङीबिति स्त्रीत्वविवक्षया सावित्रीति रूपसिद्धेः ।

६ गायति त्रायति चेति श्रुतेः ।

तिः **बहुला** बहुरूपा **विश्वा**[1] सर्वप्राणिगता **भूता** पूर्वमेवविद्यमाना **कतमा** ब्रह्माद्युत्तमा अतिशयितसुखरूपा वा **कायासा** कायाः शरीराण्यास्सते ऽस्या-मिति त्रीणिपदानि वा **सत्या** यथार्थस्वरूपा सर्वेषां सद्भावप्रापका वा **अमृता** नित्यमुक्ता भगवन्मूर्तिः **इति वसिष्ठः** ब्रह्मपुत्रः वक्तीत्यनेनोक्तार्थे ज्ञानिसं-मतिरुक्ता भवति । अनेन वाक्येन अदितिशब्दवाच्याया भगवन्मूर्त्तेः सर्व-प्रसवकर्तृत्वं सर्वरक्षकत्वं सर्वात्तृत्वं सर्वत्रगमनशीलत्वादिकमुक्तं भवति ॥२८॥

**अर्थ**—तत्वांचे अभिमानी आठ प्रकारचे देव, तीन प्रकारचे गंधर्व म्हणजे देवगंधर्व, मनुष्यगंधर्व व असुरगंधर्व, मनुष्यें, पितर, चार प्रकारचे असुर म्हणजे दैत्य, राक्षस, पिशाच व हलक्या जातीचें मनुष्य, ह्या सर्व प्राण्यांची उत्पन्न करणारी अदिति नामक भगवंताची मूर्ति आहे. ती, एकसारखी उत्पत्ति करणारी, फार पुष्ट, ब्रह्मदेवानें पूज्य, सर्व प्राण्यांना उत्पन्न करीत असल्यामुळें ( अथवा सविता नामक सूर्याची वायको असल्यामुळें ) सावित्री नांवाची, गायन व रक्षण करणारी असल्यामुळें गायत्री नांवाची, नेहेमीं सर्व ठिकाणीं असणारी, उत्कृष्ठ, प्रसिद्ध व विस्तृत असल्यामुळें पृथ्वी नांवाची, नानाप्रकारचीं रूपें घेणारी, सर्व प्राण्यांच्या आंत असणारी, पूर्वींपासून असलेली, ब्रह्मादिक देवांमध्यें उत्तम ( अथवा अतिशय सुखरूपि ), जिच्या ठिकाणीं शरीरें आहेत अशी, यथार्थ-स्वरूप असणारी, नेहेमीं मुक्त असलेली, अशी भगवंताची मूर्ति आहे असें वसिष्ठ ऋषि म्हणतो. ह्यावरून जो पूर्वीं अर्थ सांगितला तो ज्ञा-न्यांना मान्य आहे असें होतें. ह्या वाक्यानें अदिति नांवाच्या भगवंता-च्या मूर्तीमध्यें सर्वांना उत्पन्न करणें, सर्वांचें रक्षण करणें, सर्वांना खाणें, सर्वत्र असणें, इत्यादि धर्म आहेत असें सांगितलें असें होतें ॥ २८ ॥

**आपोवाइद ँ सर्वंविश्वाभूतान्यापः प्राणावाआपः प-शवआपोन्नमापोऽमृतमापः सम्राडापोविराडापः स्वराडापः**

---

१ विशः प्रजाः वाति गच्छतीति विड्डुपपदाद्वातेरातोनुपसर्गे कइति कप्रत्यये टाप् ।

छदा ँ स्यापोज्योती ँ ष्यापोयजू ँ ष्यापः सत्यमापः सर्वादेवताआपोभूर्भुवः सुवरापओम् ॥ २९ ॥

**टीका**—वृष्ट्यभावकृतोपद्रवपरिहारिणं अब्देवता भगवन्मंत्रमाह ॥ आप इति ॥ यत् **इदं** भूभूधरसागरांकुरादिकं जगत् तत् **सर्वं आपः** अबुपलक्षिततेजोबन्नात्मकं पंचभूतात्मकं वा अप्शब्दितभगवदधिष्ठानभूतं । सर्वप्राप्तिमत्वात् सर्वत्वं भगवतो न तु सर्वाभेदात् । तत्किं सर्वमिति क्रमेणाह॥ विश्वाभूतानीति ॥ **विश्वा** विश्वानि **भूतानि** प्राणिनः तच्छरीराणि च पंचभूतानि च **आपः** अबुपलक्षितपंचमहाभूतात्मकानि अप्शब्दितभगवताव्याप्तानि च । **प्राणाः** इंद्रियाणि पंचप्राणा वा **आपः** तदुपलक्षिताःपंचमहाभूतोपचिताः अप्शब्दिततन्नियामकव्याप्तभगवदधिष्ठिताश्च **वै** । **पशवः** गवादयः तदुपलक्षित मृगकीटादयश्च **आपः** तदुपलक्षितपंचमहाभूतात्मकशरीरिणः । **अन्नं** व्रीहियवादिकं **आपः** । **अमृतं** सुरैरुपजीव्यसुधादिकं **आपः** तदुपादानमिति प्राग्वत् । **सम्राट्** सम्यग्राजत इति सम्राट् सूत्रनामा वायुः **आपः** । **विराट्** विशेषेण राजत इति विराट् ब्रम्हांडदेहः **आपः** । **स्वराट्** स्वयमेव राजत इति स्वराट् अहंकारतत्वाभिमानी रुद्रः **आपः** तेजोबन्नात्मकशरीरिणः सर्वव्याप्तत्वादप्शब्दवाच्यभगवदधिष्ठिताश्च । **छंदांसि** गायत्र्यादीनि **आपः** गायत्रीशब्दवाच्योपि अप्शब्दितो भगवान् ।

---

१ त्रिवृत्त्रिवृत्तमेकैकमकरोदिति श्रुतेः । पंचभूतात्मकं सर्वं तदप्येकविवक्षयेति स्मृतेश्च । सर्वं समाप्नोषि ततोसि सर्व इति गीतोक्तेश्च ।

२ अप्शब्देन भूतांतरोपलक्षणं तु भूयस्त्वात्त्वापामिति सूत्रसिद्धं । सर्वशरीरेषु मिलित्वा अबंशस्याधिक्यनिबंधनं ज्ञेयं ।

३ तेषां भूतैरुपचयः सृष्टिकाले विधीयत इति वचनात् ।

४ आपो वा अन्नमिति श्रुतेः ।

५ समउपसर्गात् राजतेः सकाशात् क्विप् ।

६ छंदोभिधानान्नेति चेन्न तथा चेतोर्पणनिगदात्तथाहि दर्शनमिति सूत्रात् ।

**ज्योतींषि** आदित्यादिज्योतींषि **आपः** प्राग्वत् । **यजूंषि** अनियताक्षराणि वेदवाक्यानि **आपः** । **सत्यं** यथार्थवचनं मीमांसा[1] वा **आपः** अप्शब्दितभगवत्प्रतिपादकानि[2] । **सर्वाः देवताः** इंद्राद्याः **आपः भूः भुवः सुवः** इति त्रिलोकः **आपः ओम्** अप्शब्दितपूर्णब्रम्हाधिष्ठितं तदंतर्यामिकं चेत्यर्थः न तु तदात्मकं । अनेन वाक्येन भगवतः सर्वांतर्यामित्वं तत्तच्छक्तिप्रबोधकत्वं ब्रम्हादिचेष्टकत्वं सर्वदेवतांतर्यामित्वं च प्रतिपादितं भवति ॥ २९ ॥

**अर्थ**—[ पाऊस नसल्यामुळें होणाऱ्या उपद्रवाचा नाश करणारा असा जलदेवतारूप भगवंताचा मंत्र सांगतो. ] पृथ्वी, डोंगर, समुद्र, वनस्पति इत्यादि जें जग आहे तें सर्व अन्न, पाणी व तेज ह्यांनीं (अथवा पंचमहाभूतांनीं ) झालेलें आहे व तें अप् नांवाच्या भगवंताचें रहाण्याचें ठिकाण आहे. सर्व जग व भगवान् हीं एकच आहेत असें जें म्हटलें आहे तें तीं दोन्ही अभिन्न आहेत अशा अर्थानें नाहीं, तर भगवंताची व्याप्ति सर्व ठिकाणीं असल्यामुळें तसें म्हटलें आहे. [ जें भगवंतानें व्यापिलें आहे तें सर्व काय आहे तें सांगतो. ] सर्व प्राणी, त्यांचीं शरीरें व पंचमहाभूतें हीं उदक इत्यादि पंचभूतात्मक असून अप् नामक भगवंतानें व्याप्त आहेत. इंद्रियें हीं ( अथवा पांच प्राण हे ) पंचभूतांनीं बनलेले असून अप् नांवाच्या भगवंताचें रहाण्याचें ठिकाण आहे. गाई, हरणें, किडे इत्यादि हे, उदक इत्यादि पंचभूतांनीं झालेले आहेत. सातू, तांदूळ, इत्यादि अन्न हें उदक आहे. देव जें खातात तें अमृत इत्यादि ह्यांचें कारण पाणी असल्यामुळें तें उदक आहे. सूत्र नांवाचा वायु हा उदक आहे. विराट् पुरुषाचें शरीर हें उदक आहे. अहंकार तत्वाचा अभिमानी रुद्र हा, तेज, उदक व अन्न ह्यांनीं बनलेला असून अप् नामक भगवंताच्या राहाण्याचें ठिकाण आहे. गायत्री इत्यादि छंद हे अप् नामक भगवान आहेत. सूर्य इत्यादि तेजें हीं अप् नामक

---

१ सत्यं मीमांसेति तलवकारभाष्योक्तेः ।

२ आपो वै लोकः प्रथमा महानाम्नीत्यादिवत् प्रतिपाद्यप्रतिपादकयोरभेदव्यपदेशः ।

भगवान आहेत. ज्याच्या अक्षरांमध्यें नियम नाहीं असा यजुर्वेद हा अप् नामक भगवान आहे. सत्य वाक्य हें ( अथवा मीमांसा ही ) अप् नामक भगवंताचें वर्णन करणारें आहे. इंद्र इत्यादि सर्व देव हे अप् नांवाचा भगवान आहेत. भूः, भुवः, व सुवः हे तीन लोक अप् नामक भगवंताच्या राहाण्याचें ठिकाण असून त्यांत तो आहे, परंतु ते लोक व भगवान हे एक नाहींत. ह्या मंत्रानें असें सांगितलें आहे कीं, भगवान सर्वांमध्यें आहे, निरनिराळ्या पदार्थांमध्यें जी शक्ति आहे ती त्यांना देणारा आहे, ब्रम्हदेव इत्यादि देवांकडून व्यापार करविणारा आहे, व सर्व देवांच्या आंत राहाणारा आहे ॥ २९ ॥

**आपःपुनंतुपृथिवींपृथिवीपूतापुनातुमां । पुनंतुब्रम्हणस्पतिर्ब्रम्हपूतापुनातुमां । यदुच्छिष्टमभोज्यंयद्वादुश्चरितं मम । सर्वंपुनंतुमामापोऽसतांचप्रतिग्रह १ स्वाहा ॥३०॥**

**टीका**—माध्यान्हिकसंध्यायां तदभिमंत्रणमंत्रमाह ॥ आप इति ॥ **आपः** अब्देवताः भगवन्मूर्तयः यस्यां भुवि स्थित्वाऽहं संध्यामुपासे तां **पृथिवीं पुनंतु** पवित्रयंतु । **पूता** उदकाभिमानिदेवताभिः पूता **पृथिवी मां** मांप्रति **पुनातु** । **ब्रह्मणस्पतिः** ब्रह्मणां ब्राह्मणानां वेदानां वा पतिः परमात्मा **पुनंतु** मां पुनातु । **ब्रह्मपूता** ब्रम्हणा वेदोच्चारणपूर्वकाभिमंत्रणेन पूता पृथिवी **मां पुनातु** । **यत् उच्छिष्टं** पामरभुक्तशेषादि **अभोज्यं** शूद्रद्वेष्यन्नादि **वा यत् दुश्चरितं** अगम्यागमनादि **च** यत् **असतां प्रतिग्रहं** दुर्दानादि **तत् सर्वं आपः मां पुनंतु** पवित्रयंतु । **स्वाहा** आत्माग्नौ स्वाहा सुहुतमस्तु ॥ ३० ॥

**अर्थ**—आप नांवाच्या देवता अथवा उदकाच्या अभिमानि भगवंताच्या मूर्ति, ज्या भूमीवर बसून मी संध्या करतों त्या भूमीला पवित्र

---

१ पुनंत्विति वचनव्यत्ययश्छांदसः ।

करोत. ती पवित्र झालेली पृथिवी मला पवित्र करो. ब्राम्हणांचा किंवा वेदांचा पति परमात्मा मला पवित्र करो. वेदाचें उच्चारण करून पवित्र झालेली पृथिवीदेवता मला पवित्र करो. भिकाऱ्यांनीं खाऊन उरलेलें उष्टें अन्न खाऊन झालेलें पातक, शूद्राचे किंवा शत्रूचें अन्न इत्यादिकां-पासून झालेलें पातक, अथवा जिच्याबरोबर संग करूं नये अशा स्त्रीब-रोबर संग केल्यापासून झालेलें पातक, वाईट दान घेतल्यापासून झालेलें पातक, ह्या सर्व पातकांपासून अप् नांवाच्या भगवंताच्या मूर्ति पवित्र करोत. आत्मरूप अग्नीच्या ठिकाणीं उत्तम हवन होवो ॥ ३० ॥

**अग्निश्चमामन्युश्चमन्युपतयश्चमन्युकृतेभ्यः। पापेभ्यो-रक्षंताम्। यदन्हापापमकार्षं। मनसावाचाहस्ताभ्याम्। पद्भ्यामुदरेण शिश्ना। अहस्तदवलुंपतु। यत्किंचदुरितं-मयि। इदमहं मामृतयोनौ। सत्येज्योतिषिजुहोमिस्वाहा ॥ ३१ ॥**

**टीका**—सायंसंध्याकाले जलप्राशनमंत्रानाह ॥ आग्निरिति ॥ **अग्निः** प्रसिद्धाग्निः तन्नामकः परमात्मा **च मन्युः** क्रोधाभिमानी रुद्रः तन्नियामको नृसिंहः **च मन्युपतयः** अन्येक्रोधाभिमानिनः **च मन्युकृतेभ्यः**[1] मन्यूप-लक्षितकामक्रोधाद्यरिषड्वर्गकृतेभ्यः **पापेभ्यः** पापानि परिहृत्य **मां रक्षंताम्**। यत् **अन्हा** अतीतेऽस्मिन्नहनि **मनसा** परहिंसापरवित्तापहरणाचिंतनं **वाचा** अनृतभाषणमाचार्यदूषणादिकं **हस्ताभ्यां** दुष्टप्रतिग्रहब्राह्मणताड-नादिकं[2] **पद्भ्यां** पदागोस्पर्शनादिरूपं[3] **उदरेण** नीचसेवया उदरंभरणादि **शिश्ना** शिश्नेन अन्ययोनिकुयोन्ययोन्यादौरेतः सेचनरूपं[4] तदतिरिक्तं **यत्**

---

१ ल्यप्लोपेकर्मण्यधिकरणेचेतिल्यप्लोपनिमित्ता पंचमी।

२ ब्राम्हणोनहंतव्यइति निषेधात्।

३ गौर्नपदास्पृष्टव्येतिश्रुतेः।

४ नायोनौरेतः सिंचेदित्युक्तेः।

**किंच दुरितं** इंद्रियांतरैः अनुष्ठितं अस्पृश्यस्पर्शनानास्वाद्यास्वादनाश्राव्यदुर्गानादिश्रवणादिकं पापं **मयि** वर्तते **तत्** सर्वं **अहः**[1] तदभिमानीमुख्यप्राणः **अवलुंपतु** विनाशयतु । तत् सर्वं **इदं अहं मां च अमृतयोनौ** मुक्तिकारणीभूते **सत्ये ज्योतिषि**[2] यथार्थज्ञानरूपे-ज्योतिःशब्दवाच्ये अग्नौ तदंतर्यामिपरमात्मनि च **जुहोमि स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ३१ ॥

**अर्थ**—[ संध्याकाळची संध्या करितांना पाणी पिण्याचा मंत्र सांगतो. ] लोकप्रसिद्ध अग्नि व अग्नीच्या आंत असलेला परमात्मा, क्रोधाभिमानी शंकर व त्याचा नियामक नरसिंह, आणखी दुसऱ्या क्रोधाभिमानी देवता, मला कामक्रोधादि साहा शत्रूंच्या योगानें केलेल्या पापांपासून रक्षण करोत. मीं दिवसास मनानें दुसऱ्याच्या द्रव्यादिकाचें चिंतन केल्यापासून झालेलें पातक, वाणीनें खोटें भाषण केल्यापासून ( किंवा गुरूला दूषण दिल्यापासून ) झालेलें पातक, हातानें ब्राम्हणादिकांना मारल्यापासून (अथवा वाईट दान घेतल्यापासून) झालेलें पातक, पायानें गाय इत्यादिकांना लाथ मारल्यापासून ( अथवा नीच लोकांच्या घरीं गेल्यापासून ) झालेलें पातक, पोट भरण्याकरितां हलक्या लोकांची चाकरी केल्यापासून घडलेलें पातक, शिश्नानें दुसऱ्याच्या स्त्रीबरोबर संग केल्यापासून ( किंवा वाईट स्त्रीबरोबर संग केल्यापासून किंवा योनीशिवाय रेत पाडल्यापासून ) झालेलें पातक, ह्याशिवाय इतर इंद्रियांनीं केलेलें पातक म्हणजे स्पर्श करण्यास योग्य नसलेल्या वस्तूला स्पर्श करणें, वास घेण्यास योग्य नसलेल्या वस्तूचा वास घेणें, ऐकण्यास जें योग्य नाहीं तें ऐकणें इत्यादि जीं पातकें माझ्या ठिकाणीं असतील त्या सर्व पातकांचा नाश दिवसाचा अभिमानी मुख्यप्राण व मुख्यप्राणाचा अंतर्यामीं असलेला

---

१ तथा च श्रुतिः अहरेवप्राणः रयिरेवरात्रिरिति ।

२ तथा च सूत्रं ज्योतिश्चरणाभिधानादिति ।

परमात्मा करो. ह्या सर्व पापांला व मी आपल्याला, मोक्षास कारण रूपी ज्योतिशब्दवाच्य अग्नीचे ठिकाणीं व त्यांत असलेल्या परमात्म्याच्या ठिकाणीं हवन करतों. हें हवन उत्तम असो ॥ ३१ ॥

**सूर्यश्चमामन्युश्चमन्युपतयश्चमन्युकृतेभ्यः । पापेभ्योरक्षंतां । यद्रात्रियापापमकार्षं । मनसावाचाहस्ताभ्यां । पद्भ्यामुदरेणशिश्ना । रात्रिस्तदवलुंपतु । यत्किंचदुरितंमयिइदमहंमाममृतयोनौ । सूर्येज्योतिषिजुहोमिस्वाहा ॥ ३२॥**

**टीका**—अथ प्रातःसंध्याकाले आचमनार्थं जलाभिमंत्रणमन्त्रानाह ॥ सूर्यश्चेति ॥ **सूर्यः** प्रसिद्धः सूरिगम्यत्वात्तदंतर्गतः परमात्मा च **मन्युः** क्रोधाभिमानिनो रुद्रादयः तदंतर्गतस्तन्नियामकः परमात्मा च **मन्युपतयः** एते **मन्युकृतेभ्यः** पापेभ्यः **मां रक्षंतां । यत् रात्रिया** रात्रौ **मनसा वाचा हस्ताभ्यां पद्भ्यां उदरेण शिश्ना पापं अकार्षं रात्रिः** रात्र्यभिमानिनी दुर्गा **तत् अवलुंपतु** हंतु । **मयि यत् किंच दुरितं इदं मां च अहं अमृतयोनौ ज्योतिषि सूर्ये जुहोमि स्वाहा** हुत्वा पापादिकं मां पवित्री करोमि ॥ ३२ ॥

**अर्थ**—[ आतां सकाळच्या संध्येच्यावेळीं आचमन करण्यासाठीं पाणी घेण्याचा मंत्र सांगतो. ] लोकप्रसिद्ध सूर्य आणि त्याच्या अंतर्यामी राहाणारा परमात्मा, क्रोधाच्या अभिमानि देवता व त्या देवतांच्या अंतर्यामी राहून नियमन करणारा परमात्मा, ह्याशिवाय दुसरे क्रोधाचे अभिमानि देव, हे, आम्हाला आमच्या क्रोधापासून व घडलेल्या पातकांपासून रक्षण करोत. रात्रीं मनानें, वाणीनें, हातांनीं, पायांनीं, उदरानें, शिश्नानें, मीं जें पातक केलें असेल त्या सर्व पातकांचा नाश रात्रीची अभिमानि देवता दुर्गा ही (अथवा दुर्गा नामक परमात्मा हा) करो. जें कांहीं पातक माझे ठिकाणीं आहे त्या पातकाचा व माझा या दोघांचा होम अमृतरूपी

सूर्यामध्यें मी करतों. पापादिकांचा होम करून मी आपल्याला पवित्र करतों ॥ ३२ ॥

**ॐमित्येकाक्षरंब्रम्ह । अग्निर्देवताब्रम्हइत्यार्षं । गायत्रं छंदंपरमात्मंसरूपं । सायुज्यंविनियोगं ॥ ३३ ॥**

**टीका**—योहवाअविदितेतिश्रुत्याऋषिदेवताछंदोज्ञानाभावेअनर्थोक्तिः प्रणवजपार्थंप्रणवगायत्र्योरुपास्त्यर्थंवातत्सर्वमाह ॥ ॐमिती ॥ **ॐ इति एकाक्षरं** अकारोकारमकारवतामक्षरधर्माणां समुदायः **ब्रम्ह** वेदव्याख्येयत्वात् वेदमातृत्वाच्च ब्रम्हशब्दार्थगुणपूर्त्यभिधायकत्वाच्च । तस्यप्रधानाप्रधानदेवतेआह ॥ अग्निरिति ॥ **अग्निः** प्रसिद्धः तदंतर्गतपरशुरामश्च **देवता** ॥ ऋषिमाह ॥ ब्रम्हेति ॥ **ब्रम्ह इति आर्षं** परब्रम्हऋाषिकं । छंदोवक्ति ॥ गायत्रमिति ॥ **गायत्रं** दैवीगायत्री **छंदं** गायत्रीछंदस्कं । साक्षाद्देवतांतरमाह ॥ परमात्ममिति ॥ **परमात्मं सरूपं** परमात्मदेवताकं । प्रणवमंत्रस्य विनियोगमाह ॥ सायुज्यमिति ॥ **सायुज्यं** परमात्मनासहसायुज्यं **विनियोगं** अधिकारभेदेनोक्ताभिप्रायोज्ञातव्यः ॥ ३३ ॥

**अर्थ**—[ योहवा अविदितेति ( म्हणजे जो मंत्राचा छंदऋषि व देवता जाणत नाहीं ) ह्या श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, ऋषि, देवता व छंद हे जाणले नाहींत तर अनर्थ होतो. म्हणून प्रणवाचा जप करण्यासाठीं आणि प्रणव व गायत्री ह्यांची उपासना करण्यासाठीं तें सर्व सांगतो. ] अकार, उकार, मकार, बिंदु, इत्यादि आठ अक्षरांचा समुदाय असा जो ओंकार तोच परब्रम्ह आहे. [ त्याची प्रधानदेवता व अप्रधानदेवता सांगतो. ] अग्नि व अग्नीचा नियामक परशुराम ह्या त्याच्या देवता आहेत. [ ऋषि सांगतो. ] ओंकाराचा ऋषि परब्रम्ह आहे. [ छंद सांगतो. ] ओंकाराचा छंद गायत्री आहे. [ साक्षात् दुसरी देवता सांगतो. ] ओंकाराची देवता परमात्मा आहे. [ प्रणवमंत्राचा उपयोग सांगतो. ] ओंकाराचा विनियोग केल्यानें परमात्म्याबरोबर सायुज्य मिळतें ॥ ३३ ॥

**आयातु वरदा देवी अक्षरं ब्रह्मसंमितं। गायत्री छंदसां मातेदं ब्रम्ह जुषस्व मे।**

**टीका**—एवं ऋष्यादिकमभिधाय स्वस्मिन् प्रणवगायत्र्योः आगमनमर्थ्यते ॥ आयात्विति ॥ **वरदा देवी** सवितृमंडलं मत्हृदयं च **आयातु** विशेषतः उभयत्रसंनिधत्स्व । हृदयसंनिधाने प्रयोजनमाह ॥ अक्षरमिति ॥ यत् **अक्षरं** अनादिनित्यं ओंकारादिरूपं ओमित्याक्रियमाणं **ब्रह्मसम्मितं**[1] ब्रह्मसमानं ब्रह्मसमव्याप्तं वा **इदं ब्रह्म** प्रणवगायत्र्यादिरूपं शब्दब्रम्ह **मे** मह्यं **जुषस्व** प्रणवाद्यर्थं बोधय । सर्वदेवताप्रहाणेन प्रणवगायत्रीप्रार्थनं कुत इत्यत आह ॥ गायत्रीछंदसां मातेति ॥ यतः प्रसिद्धा **गायत्री**[2] तच्छब्दवाच्योभगवान् **छंदसां** समस्तवेदानां **माता** विभागकर्त्री वेदार्थज्ञान जनयित्री वा ।

**अर्थ**—[ अशा रीतीनें प्रणवाचा ऋषि इत्यादि सांगून आपले ठिकाणीं ओंकार व गायत्री ह्या दोघांनीं यावें ह्याकरितां त्यांची प्रार्थना करण्याचे मंत्र सांगतो. ] वर देणारी गायत्रीदेवता सूर्यमंडलांत व माझे हृदयांत येवो. [ हृदयामध्यें आल्याचें फल सांगतो. ] ज्याला उत्पत्ति, नाश, इत्यादि नाहींत अशा परब्रम्हासारखें जें ओंकार गायत्रीरूप हें शब्दब्रह्म त्याचें ज्ञान मला करून देवो. [आतां इतर सर्व देवता सोडून गायत्रीचीच प्रार्थना करण्याचें कारण सांगतो. ] गायत्रीनामक परमात्मा सर्व वेदांचा विभाग करणारा ( अथवा वेदार्थाचें ज्ञान करून देणारा ) आहे.

**यदन्हा त्कुरुते पापं तदन्हात्प्रतिमुच्यते। यद्रात्रिया त्कुरुते पापं तद्रात्रियात्प्रतिमुच्यते।**

---

१ यावन् ब्रह्मविष्ठितं तावतीवागितिश्रुतेः। तदुक्तं बृहद्भाष्ये गायत्रीब्राह्मणव्याख्यावसरे।

२ गायत्रीमुख्यतोविष्णुः ध्येयः सर्वात्मना हरिः । संहर्ता सर्वदोषाणां अग्निस्थः सर्वदाहकः । नित्यानंदोऽग्निवर्णश्च रामः परशुभृत्सदेति ॥

**टीका**—सवितृमंडले गायत्रीशब्दितभगवत्संनिधानप्रार्थनाफलमाह ॥ यदिति. ॥ **अन्हात्** अन्हि **यत् पापं कुरुते तत् अन्हात्** तत्रभवात् पापात् **प्रतिमुच्यते** मुक्तो भवति । **रात्रियात्** रात्रौ **यत् पापं कुरुते तत् रात्रियात्** तत्रभवात् पापात् **प्रतिमुच्यते** मुक्तो भवति । ततश्च सायं-प्रातःसंध्यायां सवितृमंडले गायत्रीशब्दितभगवत्संनिधाने अनेन अहोरात्रि कृतात् पापात् प्रतिमुच्यते ॥

**अर्थ**—[ सूर्यमंडलामध्यें गायत्री शब्दानें प्रतिपादन केलेला परमात्मा जवळ असण्यासाठीं केलेल्या प्रार्थनेचें फल सांगतो. ] जो दिवसा पाप करितो तो त्यापासून मुक्त होतो. जो रात्रीं पाप करितो तो त्या पापापासून मुक्त होतो. ह्यावरून असें होतें कीं, गायत्री नामक भगवान जवळ असल्यानें दिवसाचें व रात्रीचें अशीं दोन्ही पातकें नष्ट होतात.

सर्ववर्णे महादेवि संध्याविद्ये सरस्वति ॥ ३४ ॥ ओजोऽसि सहोऽसि बलमसि भ्राजोऽसि देवानां धामनामासि विश्वमसि विश्वायुः सर्वमसि सर्वायुरभिभूरों गायत्रीमावाहयामि सावित्रीमावाहयामि सरस्वतीमावाहयामि छंदर्षीनावाहयामि श्रियमावाहयामि गायत्रिया गायत्री च्छंदो विश्वामित्र ऋषिः सविता देवताऽग्निर्मुखं ब्रम्हाशिरो विष्णुर्हृदयꣳ रुद्रःशिखा पृथिवीयोनिः प्राणापानव्यानोदानसमाना सप्राणा श्वेतवर्णा सांख्यायनसगोत्रा गायत्री चतुर्विंशत्यक्षरा त्रिपदा षट्कुक्षिः पंचशीर्षोपनयने विनियोग ओं भूः । ओं भुवः । ओꣳ सुवः । ओं महः । ओं

१ सुपांसुलुक् पूर्वसवर्णाच्छेया डाड्या जाल इति सूत्रेण सप्तम्याः पंचमी ।

जनः। ओं तपः। ओं सत्यं। ओं तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्। ओं आपो-ज्योती रसोमृतं ब्रह्म भूर्भुवः सुवरोम्॥ ३५॥

**टीका**—सूर्यमंडलसंनिहितगायत्रीशब्दवाच्यत्वं भगवतः कुत इ-त्यतस्तल्लक्षणमाह॥ सर्ववर्णेति॥ **सर्ववर्णे**[1] अप्राकृतशुक्लादिसर्ववर्णोपेते **महादेवी**[2] महद्भिः स्तुत्या **संध्याविद्ये** संध्याकाले ज्ञेये ध्येयेच **सरस्वति** गायत्रीपक्षे भगवदनुग्रहसरणात् सरस्वतीशब्दवाच्या हे सरस्वति भगव-त्पक्षे सरस्वान् सागरोस्याः भगवन्मूर्त्तेः आश्रयतया वर्त्तत इति सर्वदगमना-द्वा सरस्वतीशब्दवाच्या भगवन्मूर्त्तिः हे सरस्वति त्वं **ओजः** परावष्टंभन-शक्तिरूपा **असि**। **सहः** सहनवती **असि**। **बलं** बलवती **असि**। **भ्राजः** प्रकाशविशेषरूपा **असि**। **देवानां धामनाम** आश्रया **असि**। **विश्वं** सर्वांतर्यामिणी **असि**। **विश्वायुः** असि। **सर्वं** **असि**। **सर्वायुः** पूर्णायुष्मती **असि** तत्प्रदाचासि। **अभिभूः** सर्वाभिभाविका सर्वोत्तमा च असि। प्रातःसंध्यायां **ओं गायत्रीं** गुणपूर्णगानत्राणकर्त्रीं भगवन्मूर्त्तीं **आवाहयामि**। माध्यान्हे **सावित्रीं** सर्वजगत्प्रसवकर्त्रीं भगवन्मूर्तीं **आवाहयामि**। सायान्हे **सरस्वतीं आवाहयामि**। **छंदऋषीन्** वेदद्र-ष्टृऋषीन् **आवाहयामि**। **श्रियं आवाहयामि**। सर्वाः आत्मसंनिहिताः मम गायत्रीजपसिध्यर्थं भवंतु। अथ संध्यांगगायत्रीमंत्रजपार्थं तस्याः ऋष्यादिकमाह॥ गायत्रिया इति॥ **गायत्रियाः गायत्री छंदः विश्वा-मित्रः** गाधिसूनुः **ऋषिः सविता देवता अग्निः मुखं ब्रह्मा शिरः विष्णुः हृदयं रुद्रः शिखा पृथिवी योनिः प्राणापानव्यानोदानस-मानसप्राणा श्वेतवर्णा सांख्यायनसगोत्रा गायत्री चतुर्विंशत्यक्षरा** वेदविशेषरूपा **त्रिपदा षट्कुक्षिः पंचशीर्षा। उपनयने** प्राणापानयोः परस्परसमीपनयने **विनियोगः**। भूरादयः सत्यांताः सप्तव्याहृतयः सप्त-

---

१ स्त्रीरूप विवक्षया स्त्रीलिंगनिर्देशः। २ स्तुत्यर्था दीव्यतेर्घञि स्त्रीत्वविवक्षयाङीप्।

लोकप्रतिपादकाः । गायत्रीमंत्रस्यार्थमाह ॥ तदिति ॥ **यः** सविता **नः** अस्माकं **धियः** बुद्धीः **प्रचोदयात्** सत्कर्मणि ब्रह्मविचारे च प्रेरयेत् । **तत्सवितुः** तस्य सवितुः सुवति प्रेरयति सर्वं सूते जनयति वेति सविता सवितृमंडलगः सवितृनामानारायणः परमेश्वरः तस्य **देवस्य वरेण्यं** वरणीयं **भर्गः** तेजः **धीमहि** वयं ध्यायेम । गायत्रीशिरसश्चायमर्थः **ओं** पूर्णं **आपः** आप्नोति सर्वमिति **ज्योतिः** ज्योतीरूपः **रसः** सारोवरश्चेति **अमृतं** मृतिरहितं **ब्रह्म** सर्वप्रकारेण वृद्धं **भूर्भुवः सुवः** तत्तल्लोकव्यापि सर्वंभवति रक्षतीति **ओं** । आप इत्यादीनिपदानि परब्रह्मप्रतिपादकानि ॥ ३५ ॥

**अर्थ**—[ सूर्यमंडलामध्यें असलेली गायत्री हें नांव भगवंताला कशावरून आहे त्याचें लक्षण सांगतो. ] उत्तम शुक्ल इत्यादि वर्णांनीं युक्त असणारी, मोठ्या विद्वान् लोकांनीं स्तुति करण्यास योग्य असणारी, संध्याकालीं जाणण्यास व ध्यान करण्यास योग्य असणारी, भगवंताची प्राप्ति करून देणारी, अशी हे सरस्वति, ( भगवंताकडे सरस्वति हा शब्द लाविला असतां त्याचा अर्थ असा होतो कीं, जिच्या आश्रयानें समुद्र असतो अशी अथवा सर्वव्यापी अशी हे भगवंताची मूर्त्ति), तूं दुसऱ्याचे शक्तीचें अवष्टंभन करणारी, सहन करणारी, बलवती, प्रकाशणारी, सर्व देवांना आश्रय देणारी, सर्वांच्या अंतर्यामीं राहणारी, पूर्ण आयुष्मती, दुसऱ्यास पूर्ण आयुष्य देणारी, सर्वांचा पराजय करणारी, व सर्वोत्तम, अशी आहेस. प्रातःसंध्येचे वेळीं गायत्री या नांवानें असणारी जी भगवंताची मूर्त्ति तिला बोलावितो. मध्यान्हींचे वेळीं सावित्री ( म्ह० जगताला उत्पन्न करणारी ) या नांवानें असणारी जी भगवंताची मूर्त्ति तिला बोलावितो. सायंकालीं सरस्वती या नांवानें असणारी जी भगवंताची मूर्त्ति तिला बोलावितो. गायत्रीचे छंद ऋषीचें आवाहन करतो, लक्ष्मीचें आवाहन करतो, सर्व देवता जवळ येऊन माझ्या गायत्रीच्या जपाकरितां साहाय्य करोत. [ आतां संध्येचें अंग जो गायत्री मंत्रजप आहे त्याचे ऋषि इत्यादि सांगतो. ] गायत्रीमंत्राचा गायत्री नांवाचा छंद आहे, गायत्रीचा द्रष्टा ऋषि गाधीचा पुत्र

विश्वामित्र आहे, तिची देवता सूर्य आहे, तिचें मुख अग्नि आहे, तिचें मस्तक ब्रह्मदेव आहे, तिचें हृदय विष्णु आहे, तिची शिखा शंकर आहे; तिची योनि पृथिवी आहे, प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे तिचे पांच प्राण आहेत, तिचा रंग पांढरा आहे, तिचें गोत्र सांख्यायनस आहे; तिचा मंत्र चोवीस अक्षरांचा आहे, तिला तीन पाय आहेत, सहा पोटें आहेत, तिला पांच डोकीं आहेत. प्राणायाम करण्याला प्रारंभ करितो. भूपासून सत्यापर्यंत ज्या सात व्याहृती आहेत त्या सात लोकांचें प्रतिपादन करणाऱ्या आहेत. [ गायत्री मंत्राचा अर्थ सांगतो. ] जो परमेश्वर आमच्या बुद्धीला, चांगलीं कर्में करण्याला व ब्रम्हाचा विचार करण्याला प्रेरितो, त्या जग उत्पन्न करणाऱ्या स्वयंप्रकाश परमेश्वराचें श्रेष्ठ अशा तेजाचें आम्ही ध्यान करितों. [ गायत्री शिराचा अर्थ सांगतो. ] सर्वव्यापी, तेजोरूप, श्रेष्ठ, मरणरहित, सर्व प्रकारें वृद्ध असें जें ब्रम्ह तें भू इत्यादिक लोकांना व्यापून सर्वांचें रक्षण करितें ॥ ३५ ॥

**उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि । ब्राह्मणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखं । स्तुतो मया वरदा वेदमाता प्रचोदयंती पवने द्विजाता । आयुः पृथिव्यां द्रविणं ब्रह्मवर्चसं मह्यं दत्वा प्रजातुं ब्रह्मलोकं ॥ ३६ ॥**

**टीका**—जपादूर्ध्वं गायत्रीविसर्जनमंत्रमाह ॥ उत्तम इति ॥ **भूम्यां पर्वतमूर्धनि** मेरुपर्वतमूर्धनि **उत्तमे शिखरे** रत्नसानौ च **जाते** अभिव्यक्ते एवं भूते हे **देवि** त्वं **ब्राह्मणेभ्यः** ब्राह्मणैः **अभ्यनुज्ञाता** अनुमोदिता सती **यथासुखं** स्वस्थानं **गच्छ** । **पवने** पवित्रे कर्मणि स्वोपासकान् **प्रचोदयंती द्विजाता** भूम्यां रत्नसानौ च जातत्वात् **वरदा वेदमाता मया स्तुतः** । सा **मह्यं आयुः पृथिव्यां** स्थितं **द्रविणं ब्रह्मवर्चसं** च **दत्वा ब्रह्मलोकं प्रजातुं** प्रयातु ॥ ३६ ॥

**अर्थ**—[ जप झाल्यावर गायत्रीला निरोप देण्याचा मंत्र सांगतो. ] पृथ्वीवर मेरुपर्वताच्या मस्तकावर उत्तम रत्नखचित शिखराच्या ठिकाणीं प्रकट होणारी अशी हे देवी, तूं ब्राह्मणांचा निरोप घेऊन आपल्या ठिकाणीं सुखानें जा. आपल्या भक्तांला पवित्र कर्मै करण्यास प्रेरणा करणारी, पृथ्वीवर व मेरु पर्वतावर उत्पन्न झालेली, वर देणारी, वेदाची माता, अशा गायत्रीचें मीं स्तवन केलें. ती गायत्री मला आयुष्य, पृथ्वीतील द्रव्य व ब्रम्हाचें तेज हीं देऊन ब्रम्हलोकाला जावो ॥ ३६ ॥

**घृणिः सूर्य आदित्यो न प्रभावात्यक्षरं । मधुक्षरंति तद्रसं । सत्यं वै तद्रसमापोज्योती रसोऽमृतं ब्रह्मभूर्भुवः सुवरोंम् ॥ ३७ ॥**

**टीका**—अनावृष्टिव्याधिपरिहाराय योग्यानां सौराष्टाक्षरमंत्रादिकं अस्माकं प्रतिभात्वित्याह ॥ घृणिरिति ॥ **घृणिः** घृणावान् **सूर्यः** सूरिगम्यः **आदित्यः** अदितेः सुतः तदंतर्गतं **अक्षरं** अक्षरशब्दितं **ब्रह्म न प्रभावाति** अयोग्यानां ज्ञानविषयं न भवति । **तत्** अष्टाक्षरं यत् **मधु रसं** श्रेष्ठं सूर्याख्यं तदंतर्गतं ब्रह्म च **क्षरंति** योग्यानां तद्विषयंज्ञानमुत्पादयति । **तत् रसं आपः ज्योतिः रसः अमृतं ब्रह्मभूर्भुवः सुवरोम्** ॥ ३७ ॥

**अर्थ**—[ पाऊस न पडण्यापासून होणाऱ्या व्याधींचा परिहार होण्याकरितां योग्य अधिकारी अशा आम्हाला सूर्यांतर्गत नारायणाचा अष्टाक्षरमंत्र प्रकाशित होवो असें सांगतो. ] परम दयालु, विद्वानांनाच प्राप्त होणारा, अदितीच्या पुत्रांच्या अंतर्यामीं असणारा, अविनाशी असा परमात्मा, अयोग्य लोकांना ज्ञानविषय होत नाहीं. तोच योग्य अधिकारी जनांस उत्तम ज्ञान देणारा होतो. तें सर्वव्यापी, ज्योतीरूप, श्रेष्ठ, मरणरहित भू इत्यादि लोकांना व्यापून असणारें ब्रह्म सर्वांचें रक्षण करितें ॥ ३७ ॥

ब्रह्ममेतु मां । मधुमेतु मां । ब्रह्ममेवमधुमेतु मां । यास्ते सोमप्रजावत्सोभिसो अहं । दुष्वप्नहंदुरुष्षह । यास्ते सोमप्राणाꣳस्तां जुहोमि । त्रिसुपर्णमयाचितं ब्राह्मणाय दद्यात् । ब्रह्महत्यां वा एते घ्नंति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठंति । ते सोमं प्राप्नुवंति । आसहस्रात्पंक्तिं पुनंति ओम् ॥ ३८ ॥

टीका—इदानीं त्रिसुपर्णाख्यमंत्रविशेषान् तज्ज्ञानपठनयोः फलं चाह ॥ ब्रह्ममिति ॥ हे सोम उत्कृष्टया मया संपदा ज्ञानेन च सहित सोमांतर्यामिन् परमात्मन् **ते याः प्रजाः** ब्रह्माद्याः ब्राह्मणा वा **अभि** आभिमुख्येन **तव** पुरतः **ते सः अहं वत्सः** बालः अतः **ब्रह्मं** तत्संबंधि ब्रह्मविषयकं ज्ञानं **मां एतु** प्राप्नोतु । **मधु** आनंदरूपं **मां एतु** मुक्तियोग्यानां **ब्रह्मं एव मधु मां** रक्षितुं **मा एतु** प्राप्नोति । हे **दुरुष्षहः दुःस्वप्नहन् सोम याः** ये **प्राणाः** तदधीनाः मनआदींद्रियाणि ताः **तान्** प्राणान् ते **जुहोमि** त्वद्विषयान् करोमि । **ये त्रिसुपर्णं** ब्रह्ममेत्वित्यारभ्य जुहोमीत्यंतमंत्रं **अयाचितं** अप्रार्थितं ब्राह्मणाय **दद्यात्** तदुच्चाराय दद्युः उपदिशेयुः । **ते** उपदेष्टारः **ब्रह्महत्यां** वाचनिक मानसिक ब्रह्महत्यां **घ्नंति** नाशयंति **वा एव । ये ब्राह्मणाः त्रिसुपर्णं वरिष्ठं** मन्यमानाः **पठंति ते सोमं** सोमपानफलं सोमलोकं वा **प्राप्नुवंति । आसहस्रात्** सहस्रपतितानभिव्याप्य **पंक्तिं पुनंति** पवित्रं कुर्वंति । इति प्रथम त्रिसुपर्णव्याख्या समाप्ता ॥ ३८ ॥

**अर्थ**—[ आतां त्रिसुपर्णाचे मंत्र व त्याचे ज्ञानापासून व पठणापासून होणारें फल सांगतो. ] उत्तम ज्ञान व संपत्ति ह्यांनीं युक्त सोमाच्या अंतर्यामीं राहणाऱ्या परमेश्वरा, तुझ्या ज्या ब्रम्हादिक प्रजा आहेत ( अथवा ब्राम्हण आहेत ) त्या आम्ही सर्व तुझ्या पुढें तुझे बालक आहोंत. म्हणून आम्हा बालकांना तुझ्या संबंधीं उत्तम ज्ञान मिळो. ज्याचें सहन

---

१ उभयत्र सस्य षत्वं छांदस ।

करतां येत नाहीं अशा दुष्ट स्वप्नाचा नाश करणाऱ्या हे सोमाच्या अंतर्यामी असणाऱ्या परमेश्वरा, आमचे प्राण व प्राणाच्या आधीन असणारीं इंद्रियें हीं सर्व तुझ्या सेवेविषयीं तत्पर असावीत असें मी करितों. जे कोणी त्रिसुपर्णाचे मंत्राचा उपदेश मागितल्याशिवाय कोणास त्याच्या उद्धाराकरितां करतील ते शब्दानें व मनानें झालेल्या ब्रम्हहत्यांचा नाश करण्यास समर्थ होतील. जे कोणी त्रिसुपर्ण मंत्राचें पठण करतील त्यांना सोमयज्ञ केल्यापासून मिळालेल्या सोमलतेच्या रसाचे पानाचें फल मिळतें ( अथवा त्यांना चंद्रलोक मिळतो ). ते पठण करणारे हजारों पापी लोकांना पवित्र करतात. ह्याप्रमाणें पहिल्या त्रिसुपर्णाची व्याख्या संपली ॥ ३८ ॥

**ब्रम्हमेधया । मधुमेधया । ब्रम्हमेवमधुमेधया । अद्यानोदेवसवितः प्रजावत्सावीः सौभगं । परादुष्वप्नियꣳसुव । विश्वानिदेवसवितर्दुरितानिपरासुव । यद्भद्रंतन्मआसुव । मधुवाताऋतायतेमधुक्षरंति सिंधवः । माध्वीर्नः संत्वोषधीः । मधुनक्तमुतोषसि मधुमत्पार्थिवꣳरजः । मधुद्यौरस्तुनःपिता । मधुमान्नोवनस्पतिर्मधुमाꣳअस्तुसूर्यः । माध्वीर्गावोभवंतुनः । यइमंत्रिसुपर्णमयाचितं ब्राम्हणाय दद्यात् । भ्रूणहत्यांवाएतेघ्नंति । ये ब्राम्हणास्त्रिसुपर्णंपठंति । ते सोमंप्राप्नुवंति । आसहस्रात्पंक्तिं पुनंति । ओम् ॥ ३९ ॥**

**टीका**—अथ द्वितीय त्रिसुपर्णाख्यमंत्रानाह ॥ ब्रम्हेति ॥ हे **सवितः देव** प्राणिप्रसवादिकर्तृत्वेन सवितृनामक क्रीडागुणविशिष्ट सवित्रंतर्गतहरे त्वं **ब्रम्हं एव मधु मेधय** पायय । **नः** अस्मदीयाः **प्रजावत्ता** पुत्रशिष्याद्याः **ब्रह्ममेधया** वेदार्थज्ञानेन **मधुमेधया** ब्रह्मज्ञानेन च **आवीः** रक्षां

कुरु । नः अस्माकं तेषां च **अद्य सौभगं** देहीत्यर्थः । हे **सवितः देव** नः दुष्वप्रियं दुःस्वप्नदर्शनजन्यमनिष्टं **परासुव**[1] पराकुरु । च नः **विश्वानि** समस्तानि **दुरितानि परासुव । यत् भद्रं** मंगलं क्षेमं करं वा **तत् मे** मह्यं **आसुव** उत्पादय । हे देव **ते** तव **ऋताय** यथार्थज्ञानाय **वाताः** प्रधानवायुनासह पंचाशन्मरुतः **मधु** मधुररसोपेतं वचनं **क्षरंति** स्रवंति उपदिशंतीत्यर्थः । **सिंधवः** समुद्राः नद्यश्च तदभिमानिनोदेवाः **मधु** मधुररसोपेतं वचनं क्षरंति उपदिशंति । **नः ओषधीः** ओषध्यः व्रीहियवादयः तदभिमानिनोदेवाः **माध्वीः** मधुररसोपेताः मधुरवचनाः संतु । **नक्तं** रात्रिः उत **उषसि** उषःकाले **मधु** मधुरवचनं अस्तु । **पार्थिवं रजः मधुमत्** अस्तु । **द्यौः** द्युलोकाभिमानिनीदेवता च **मधु** मधुरवचना **अस्तु** । **नः पिता** रक्षको भगवान् **मधु** मधुरवचनः अस्तु । **नः वनस्पतिः** तदभिमानिदेवः चंद्रश्च **मधुमान्** पुष्पं विनापि फलवान् अस्तु । **सूर्यः मधुमान्** मधुरवचनः **अस्तु । नः गावः माध्वीः** मधुरवचनाः **भवंतु** मधुशब्दितभगवद्ज्ञानाय भवंत्विति यावत् । **ये इमं त्रिसुपर्णं** ब्रह्ममेधयेत्यादिभवंत्वित्यंतं द्वितीयत्रिसुपर्णाख्यं मंत्रं **अयाचितं** अप्रार्थितं **ब्राम्हणाय दद्यात्** दद्युः । **एते भ्रूणहत्यां** बालब्रम्हचारिहत्यां गर्भहत्यां वा **घ्नंति** नाशयंति **वै । ये ब्राम्हणाः त्रिसुपर्णं पठंति ते सोमं** सोमपानफलं सोमलोकं वा **प्राप्नुवंति । आसहस्रात्** सहस्रपतितानभिव्याप्य **पंक्तिं पुनंति** पवित्री कुर्वंति ॥ ३९ ॥

**अर्थ**—[ आतां दुसरा त्रिसुपर्ण नांवाचा मंत्र सांगतो. ] प्राण्यांची उत्पत्ति इत्यादि केल्या कारणानें सविता नांवाच्या, क्रीडा इत्यादि गुणांनीं युक्त असलेल्या, व सूर्याचे अंतर्यामीं असणाऱ्या हे परमेश्वरा, तूं मला ब्रम्हरूप गोडरस पाज. आमचे पुत्र, शिष्य इत्यादि ह्यांना वेदाच्या अर्थाचें व ब्रम्हाचें ज्ञान देऊन रक्षण कर. आम्हाला व त्यांना आज सौभाग्य दे. हे जग उत्पन्न करणाऱ्या देवा, आम्हाला वाईट स्वप्नापासून झालेलें

---

१ व्यवहिताच्छंदसीति शास्त्रात्पराइत्यस्य सुवइत्यनेन संबंधः ।

दुःख नाहींसें कर; आणि आमचीं सर्व पापें नाहींशीं कर. जें माझें कल्याण व कल्याण करणारें तें उत्पन्न कर. हे देवा, तुझें खरें ज्ञान होण्यासाठीं मुख्यवायुसह एकूणपन्नास वायू गोड वाक्यांचा उपदेश करितात. समुद्र, नद्या, व त्यांचे अभिमानी देव हे गोडरसानें युक्त अशा वाक्याचा उपदेश करितात. आमच्या तांदूळ, सातू इत्यादि औषधी व त्यांचे अभिमानी देव हे गोड बोलणारे होवोत. रात्रीं व दिवसा गोड वाक्य असो. पृथ्वीचा धुराळा गोड असो. स्वर्ग व स्वर्गाची अभिमानी देवता हे गोड बोलणारे असोत. आम्हाला वनस्पति व त्यांचा अभिमानी देव चंद्र फुलाशिवाय फळ देणारे होवोत. सूर्य गोड बोलणारा असो. आम्हाला गायी गोड बोलणाऱ्या म्हणजे भगवंताचें ज्ञान देणाऱ्या होवोत. जे कोणी हा त्रिसुपर्ण मंत्र न मागतां ब्राम्हणाला सांगतात ते गर्भहत्या, बालहत्या व ब्रम्हचारीहत्या ह्यापासून झालेल्या पापांचा नाश करितात. जे ब्राम्हण त्रिसुपर्ण मंत्र म्हणतात ते चंद्रलोकाला जातात, आणि हजारों पापी लोकांना पवित्र करितात ॥ ३९ ॥

**ब्रम्ह मेधवा । मधुमेधवा । ब्रम्हमेव मधुमेधवा । ब्रम्हादेवानां पदवीः कवीनामृषिर्विप्राणां महिषो मृगाणां । श्येनो गृध्राणाꣳस्वधितिर्वनानाꣳसोमः पवित्रमत्येतिरेभन् । हꣳसःशुचिषद्वसुरंतरिक्ष सद्धोतावेदिषदतिथिर्दुरोणसत् । नृषद्वरसदृतसद्व्योम सदब्जागोजाऋतजा अद्रिजाऋतं बृहत् ।**

**टीका**—अथ तृतीय त्रिसुपर्णाख्यमंत्रानाह ॥ ब्रम्हेति ॥ **ब्रम्ह मेधवा** मेधोयज्ञः सोस्यास्तीति मेधवत् मेधवदिति मेधवा यज्ञफलभोक्तृ अस्ति । **ब्रम्ह मधुमेधवा** परमानंदफलभोक्तृ अस्ति । **ब्रम्हं एव मधुमेधवा**

---

१ पूर्वसवर्ण श्छांदसः ।

स्वादुयज्ञफलभोक्तृ अस्ति । भगवतः सर्वोत्तमत्वं सदृष्टांतमाह ॥ ब्रम्हेति ॥ यथा **ब्रम्हा** चतुर्मुखः **देवानां** उत्तमः अस्ति । यथा **कवीनां** कवयतां **पदवीः** पदवित् व्याकरणशास्त्राभिज्ञः उत्तमः अस्ति । यथा **ऋषिः** ज्ञानी **विप्राणां** उत्तमः अस्ति । यथा **मृगाणां** पशूनां **महिषः** उत्तमः अस्ति । यथा **गृध्राणां श्येनः** उत्तमः अस्ति । यथा **वनानां स्वधितिः** यज्ञसाधनीभूतकाष्टविशेषः उत्तमः अस्ति । तथा **सोमः** उमया उत्कृष्ट ज्ञानेन लक्ष्म्या वा सहितः सोमः परमात्मा **पवित्रं** लोकपावनं यद्वस्तु तत्सर्वं **रेभन्** अतिशयत्वेन **अत्येति** अतिक्रम्यवर्त्तते । **हंसः**[1] सूर्यः विष्णुर्वा **शुचिषत्**[2] शुचिं सादयति प्रापयतीति शुद्धिप्रापक इत्यर्थः **वसुः** सर्वत्रनिवासी **अंतरिक्षसत्** अंतरिक्षे आकाशे हृदयाआकाशे वा सीदतीति अंतरिक्षसत् **होता** जुहोतीति **वेदिषत्** वेद्यां परिष्कृतयज्ञभूमौ सीदति तिष्ठतीति वेदिषत् **अतिथिः** अतिथिरिव **दुरोणसत्** दुरोणे गृहे यज्ञगृहे वा सीदतीति दुरोणसत् अतिथिरिव गृहे योवसति सईश्वरविभूतिरित्यर्थः **नृषत्** नृषु सीदतीति **वरसत्** वरदेशे सीदतीति **ऋतसत्** ऋते कर्मणि सीदतीति **व्योमसत्** व्योम्नि सीदतीति **अब्जा** अप्सु जायत इति **गोजा** गोषु जायत इति **ऋतजा** ऋतेषु जायत इति **अद्रिजा** अद्रिषु जायत इति **ऋतं** ब्रह्म **बृहत्** अस्ति ।

**अर्थ**—[ आतां तिसरा त्रिसुपर्ण नांवाचा मंत्र सांगतो. ] परमेश्वर यज्ञाचें फल भोगणारा आहे. परमेश्वर परम आनंदाचें फल भोगणारा आहे. परमेश्वरच यज्ञाचें गोड फल भोगणारा आहे. [ भगवंताचा सर्वोत्तमपणा उदाहरण देऊन सांगतो. ] जसा देवांमध्यें ब्रह्मदेव उत्तम आहे, जसा कविता करणाऱ्यांमध्यें व्याकरणशास्त्र जाणणारा उत्तम आहे, जसा ब्राह्मणांमध्यें ऋषि उत्तम आहे, जसा पशूंमध्यें रेडा उत्तम

---

१ हंसः शुचिषदितिऋक् अणोरणीय इत्यनुवाके व्याख्याता ।

२ शुचिशब्दोपपदात् सदेरंतर्णितण्यर्थात् क्विप् । यस्स्मरेत्पुंडरीकाक्षं सबाह्याभ्यंतरः शुचिरिति वचनात् ।

आहे, जसा पक्ष्यांमध्यें बहिरीससाणा उत्तम आहे, जसें रानामध्यें स्वाधीति नांवाचें यज्ञाला लागणारें लांकूड उत्तम आहे, तसा उत्कृष्ट ज्ञान अस-लेला ( अथवा लक्ष्मीसह असणारा ) परमात्मा हा लोकांना पवित्र करणाऱ्या सर्व वस्तूंमध्यें उत्तम आहे. परमेश्वर पवित्र जागीं राहणारा, ज्याचे ठिकाणीं सर्व राहते असा, अंतरिक्षांत राहणारा, हवन करणारा, यज्ञांतील वेदीच्या ठिकाणीं राहणारा, अतिथीप्रमाणें घरांत राहणारा ( जो अतिथी-प्रमाणें घरांत राहतो तो ईश्वराची विभूति आहे असा अभिप्राय जाणावा), मनुष्यांच्या ठिकाणीं राहणारा, श्रेष्ठ जागीं राहणारा, कर्मांच्या ठिकाणीं राहणारा, आकाशांत राहणारा, पाण्यांत उत्पन्न होणारा ( म्हणजे मच्छ, कूर्म इत्यादि अवतार घेणारा ), पशूंच्या ठिकाणीं उत्पन्न होणारा ( म्हणजे वराह, नारसिंह इत्यादि अवतार घेणारा ), सत्याचे ठिकाणीं उत्पन्न होणारा, पर्वतामध्यें उत्पन्न होणारा, खरा, आणि मोठा असा आहे.

**ऋचे त्वा ऋचे त्वा समित्स्रवंति सरितो न धेनाः। अंतर्हृदा मनसा पूयमानाः। घृतस्य धारा अभिचाकशी-मि। हिरण्ययो वेतसो मध्यआसां। तस्मिन्त्सुपर्णो मधु-कृत्कुलायी भजन्नास्ते मधु देवताभ्यः। तस्यासते हरयः सप्ततीरे स्वधां दुहाना अमृतस्य धारां। यइदं त्रिसुपर्ण-मयाचितं ब्राम्हणाय दद्यात्। वीरहत्यां वा एते घ्नंति। ये ब्राम्हणास्त्रिसुपर्णं पठंति। ते सोमं प्राप्नुवंति। आसह-स्रात्पंक्तिं पुनंति।**

**टीका**—ऋचेत्वेति सार्द्धऋचा भगवतः घृतस्य धारां प्रकाशयामी-त्याह ॥ ऋचेत्वेति ॥ हे ब्रम्हन् **ऋचे** ऋग्वेदाय तत्प्राप्तये **त्वा** त्वां प्रति **रुचे** तव सुरुच्यर्थं **त्वा** त्वां प्रति **अंतर्हृदा** अंतर्गतभक्तियुक्तेन **मनसा** **पूयमानाः** पवित्रीकुर्वाणाः **धेनाः** धेनवः वेदवाचः **सरितो न** नद्यइव

**समित्** समिदुपलक्षितक्षीरघृतादिहवींषि **स्रवंति**। अहं ते **घृतस्य धाराः अभिचाकशीमि** अभितः वन्हेः सर्वत्र च चाकशीमि प्रकाशयामि वसोर्धारां करोमीति यावत्। **आसां** सरितां मध्ये **हिरण्ययः वेतसः** तृणविशेषः वृक्षविशेषो वा वर्त्तते **तस्मिन् कुलायी** नीडवान् **मधुकृत्** अमृतकारी **सुपर्णः** गरुडः **देवताभ्यः** सकाशात् **मधु** अमृतं **भजन्** देवताजयेन अमृतं लब्ध्वा **आस्ते** अस्ति। यद्वा **सुपर्णः**[1] पक्षिरूपोभगवान् **देवताभ्यः** सकाशात् **मधुकृत्** अमृतकारी **मधु** अमृतं **भजन्** मोहिनीरूपेण विभागं कुर्वन् तस्य समुद्रस्य तीरेतटे **आस्ते** इति। तस्याः प्रकृतनद्याः **तीरे सप्त हरयः** विष्णुयमाद्याः **अमृतस्य धारां** तत्सदृशीं **स्वधां** पितृदेवतायोग्यां **दुहानाः** दोहमानाः **आसते** वर्त्तंते। **ये** अधिकारिणः **इदं त्रिसुपर्णं अयाचितं** अप्रार्थितं **ब्राह्मणाय दद्यात्** उपदिशेयुः **ते वीरहत्यां** पशुपुत्रस्वामिहत्यां **घ्नंति** परिहरंति। **ये इदं त्रिसुपर्णं पठंति ते सोमं** सोमलोकं प्राप्नुवंति। **आसहस्रात्** सहस्रपतितानभिव्याप्य **पंक्तिं पुनंति** पवित्री कुर्वंति।

**अर्थ**—[ ऋचेत्या ह्या दीड ऋचेनें मी परमात्म्याला तुपाची धार प्रकाशित करितो असें सांगतो. ] हे परमेश्वरा, ऋग्वेद प्राप्त होण्याकरितां तुला व तुझ्या आवडीकरितां तुला भक्तियुक्त मनानें पवित्र करणारे वेद हे नदीप्रमाणें समिधा, दूध, तूप इत्यादि होमद्रव्यांचा स्राव करितात. मी तुला अग्नीसभोंवतीं आणि सर्व ठिकाणीं तुपाची धार प्रकाशित करितों. नद्यांमध्यें सोन्यासारखा असलेल्या वेताच्या झाडावरील घरट्यांत असणारा व अमृत करणारा गरुड पक्षी हा देवांना जिंकून त्यांच्यापासून अमृत घेऊन असतो. ( दुसरा अर्थ असा कीं, पक्षिरूप परमेश्वर हा देवांपासून अमृत घेऊन मोहिनी रूपानें तें देवांना वांटून देऊन समुद्राच्या कांठीं असतो ). नदीच्या कांठीं विष्णु, यम इत्यादि सात देव अमृताच्या धारेसारखी पितरांना योग्य अशी स्वधेची

---

१ द्वासुपर्णेत्यादौ भगवतः पक्षिरूपत्वाभिधानात्।

धार काढीत रहातात. जे कोणी न मागतां ब्राह्मणांना ह्या त्रिसुपर्ण-मंत्राचा उपदेश करितात ते पशु, पुत्र व धनी ह्यांच्या हत्येपासून झालेल्या पापाचा नाश करितात. जे कोणी हा त्रिसुपर्णमंत्र ह्मणतात त्यांना सोमलोक प्राप्त होतो. ते हजारों पाप्यांना पवित्र करितात.

**ओम् मेधा देवी जुषमाणा न आगाद्विश्वाची भद्रा सुमनस्यमाना । त्वया जुष्टा नुदमाना दुरुक्तान् बृहद्वदेम विदथे सुवीराः । त्वया जुष्ट ऋषिर्भवति देवि त्वया ब्रम्हा गतश्रीरुत त्वया । त्वया जुष्टश्चित्रं विंदते वसु सा नो जुषस्व द्रविणो न मेधे ॥ ४१ ॥**

**टीका**—उपदिष्टं ब्रम्हज्ञानं मेधावत्स्वेव प्रतिष्ठितं भवतीति मेधादेवीमर्थयते । इतः परं मेधाप्रार्थनारूपान् मंत्रानाह ॥ मेधेति ॥ **विश्वाची** विश्वं समस्तं जगत् आसम्यक् चिनोति विदधाति इति सर्वावगाहन-शक्तेत्यर्थः अतएव **भद्रा** मंगलप्रदा **मेधा देवी** ग्रंथे तदर्थधारण-शक्तिमतीधीः तदभिमानिनी श्रीः सरस्वती च **जुषमाणा** प्रियमाणा **सुमनस्यमाना** सौमनस्यशालिनी सती **नः** अस्मान् प्रति **आगात्** आगच्छत्। हे **देवि त्वया जुष्टाः** अनुगृहीताः वयं **दुरुक्तान्** वेदतात्पर्याभिज्ञोक्त-वेदार्थान् **नुदमानाः** तिरस्कुर्वाणाः **विदथे** वेदतात्पर्यज्ञाने मानसयज्ञे वा **सुवीराः** समर्थाः संतः **बृहत्** गुणपूर्णं नारायणाख्यं **वदेम** कथयामः । हे **मेधे देवि** मेधाभिमानिनिसरस्वति **त्वया जुष्टः** अनुगृहीतः त्वत्प्रियः **ऋषिः** अतीतानागतज्ञानी **भवति । त्वया जुष्टः ब्रह्मा** चतुर्मुखः **आगतश्रीः** प्राप्तसंपत् भवति । अतएव **त्वया जुष्टः पुरुषः चित्रं** गवाश्वहिरण्यधान्यादिविविधं **वसु विंदते** लभते । सा तादृशी मेधे **त्वं द्रविणः** अनुसृता **नः** अस्मान् **जुषस्व** अनुगृहाण प्रीणयस्व ॥ ४१ ॥

**अर्थ**—[ उपदेश केलेलें ब्रह्मज्ञान बुद्धिमान् लोकाजवळच राहातें

याकरितां बुद्धीच्या देवतेची प्रार्थना करतो. यापुढें बुद्धीच्या प्रार्थनेचे मंत्र सांगतो. ] सर्व विश्वाचे ज्ञानाचें धारण करण्यास समर्थ असणारी, मंगलकारक ग्रंथाच्या अर्थांचें ज्ञान करून देणारी अशी, बुद्धीची अभिमानी देवता सरस्वती ( अथवा लक्ष्मी ), प्रसन्न होऊन आमच्याजवळ आली. हे देवी, तूं आमच्यावर कृपा करशील तर आम्ही वेदाचा भलता अर्थ करणाऱ्यांचा तिरस्कार करून वेदांच्या तात्पर्यार्थाचें ज्ञान संपादन करण्यास ( अथवा मानसयज्ञ करण्यास ) समर्थ होऊन गुणपरिपूर्ण नारायण नांवाचें परब्रह्माचें वर्णन करूं. हे बुद्धीचे अभिमानी सरस्वती देवते, तूं ज्यावर कृपा करशील तो त्रिकालज्ञानी होतो. तूं ब्रह्मदेवावर कृपा केल्यावर तो सर्व ज्ञानांनीं पूर्ण झाला. म्हणून तूं कृपा केली म्हणजे मनुष्याला सोनें, धान्य, गायी, घोडे इत्यादि नानाप्रकारचीं द्रव्यें मिळतात. अशा प्रकारची तूं आम्हाला अनुकूळ होऊन आम्हावर दया कर ॥ ४१ ॥

**मेधामिंद्रो ददातु मेधां देवी सरस्वती । मेधां मे अश्विनावुभावाधत्तां पुष्करस्रजा ।**

**टीका**—मेधाप्रदानिंद्रादिशब्दितभगवन्मूर्तिविशेषानर्थयते ॥ मेधामिति ॥ **इंद्रः** इंद्रांतर्गतोभगवान् **मे मेधां** धारणावतीं धियं **ददातु** दिशतु । **सरस्वती देवी** तच्छब्दवाच्यभगवन्मूर्तिः **मे मेधां** ददातु । **अश्विनौ** आशुगमनशीलित्वात् अश्विनाविति शब्दवाच्यौ भगवद्रूपविशेषौ दस्रांतर्गतौ च **उभौ पुष्करस्रजा** कमलमालिनौ **मे मेधां आधत्तां**[१] धारणपोषणादि कुरुतां ।

**अर्थ**—[ बुद्धि देणाऱ्या व इंद्रादि शब्दांनीं वाच्य अशा परमात्म्याचे विशेष मूर्तीची प्रार्थना करतो. ] इंद्राच्या अंतर्यामीं राहाणारा परमात्मा मला धारणा राहाणारी बुद्धि देवो. सरस्वती शब्दानें प्रतिपादन केलेला

---

१ आङ्पूर्वकडुधाञ् धारणपोषणयोरिति धातोर्लङात्मने पदम् ।

परमात्मा मला धारणात्मक बुद्धि देवो. त्वकर गमन करणारें म्हणून अश्विनी शब्दानें प्रतिपादित अश्विनीकुमारांतर्गत भगवंताचीं दोन रूपें व पुष्पमाला धारण करणारे अश्विनीदेव हे आमच्या बुद्धीला धारणा, पुष्टि इत्यादि देवोत.

**अप्सरासु च या मेधा गंधर्वेषु च यन्मनः। दैवी मेधा सरस्वती सा मां मेधा सुरभिर्जुषताꣳस्वाहा ॥ ४२ ॥**

**टीका**—पुनः प्रार्थनारूपमंत्रांतराण्याह ॥ अप्सरास्विति ॥ **अप्सरासु**[1] उर्वश्याख्यमुखाप्सरासु **या मेधा** भगवद्विषयिणी धारणावती धीः **गंधर्वेषु** तुंबुरुप्रभृतिषु देवगायकेषु **यत् मनः** भगवद्विषयकमेव बोधनं या च **दैवी**[2] इंद्रादिदेवसंबंधिनी **मेधा** मेधाभिमानिनी **सरस्वती सा मेधा मां जुषतां**[3] सेवतां मनुष्येषु वेदशास्त्रवित्सु या मेधा **सुरभिः** मनोरथपूरयित्री अस्ति सापि मां जुषतां इति **स्वाहा** सुहुता होमेन सुष्ठु पुनातु इति ॥ ४२ ॥

**अर्थ**—[ पुनः प्रार्थना करण्याचे मंत्र सांगतो. ] स्वर्गामध्यें राहाणाऱ्या उर्वशी इत्यादि अप्सरा आहेत, त्यांची जी धारणात्मकबुद्धि भगवंताचेविषयीं नेहेमीं तत्पर असते ती बुद्धि, व तुंबुरु इत्यादि गंधर्वांचें जें धारणात्मकज्ञान भगवंताविषयीं नित्य असतें तें, व इंद्रादिदेवासंबंधीं असलेल्या मेधाची अभिमानिनी देवता सरस्वती ही माझा स्वीकार करो म्हणजे मला उत्तम बुद्धि देवोत, व वेदशास्त्र इत्यादि शिकलेल्या विद्वानांमध्यें मनोरथ पुरविणारी अशी बुद्धि मला येवो. ती मेधेची अभिमानि देवता माझ्या होमानें मला प्रसन्न होऊन पवित्र करो ॥ ४२ ॥

---

१ स्त्रियां बहुष्वप्सरस इति शब्दानुशासनात् ।

२ दिवु क्रीडाविजिगीषा व्यवहारद्युतिस्तुतिमोदस्वप्नकांतिषु इति धातोःपचाद्यच तस्मात् ङीप् ।

३ जुषी प्रीति सेवनयोरिति धातोर्लोटि प्रथमपुरुषः ।

**आमांमेधा सुरभिर्विश्वरूपा हिरण्यवर्णा जगतीजगम्या। ऊर्जस्वती पयसा पिन्वमाना सामां मेधा सुप्रतीका जुषंतां ॥ ४३ ॥**

**टीका**--पुनरपि मेधार्थमंत्रानाह ॥ आमामिति ॥ **सुरभिः** सुगंधा कामदुघा वा **विश्वरूपा** सकलवेदशास्त्रार्थधारणपूर्णरूपा **हिरण्यवर्णा** स्वर्णवर्णा **जगतीजगम्या** जगतां संस्थे जगम्या भृशं प्राप्या यद्वा जगतीजैर्भूमिजैर्गम्या प्राप्या **ऊर्जस्वती** बलवती अन्नवती वा **पयसा** ज्ञानाख्यक्षीरेण **पिन्वमाना** प्रीणयंती **सुप्रतीका** शुभांगी सुमुखी वा एतादृशी मेधादेवी **मां आजुषतां** रक्षतु ॥ ४३ ॥

**अर्थ**—[ पुनः बुद्धीची प्रार्थना करण्याचे मंत्र सांगतो. ] सुगंधयुक्त असलेली ( अथवा मनोरथ पूर्ण करणारी ) सर्व वेदशास्त्र इत्यादिकांच्या अर्थाचा निश्चय करणारी, सोन्यासारख्या पिंवळ्या रंगाची, सर्व जगतामध्यें उत्तम ( अथवा पृथिवीवरील प्रत्येक प्राणिमात्रांनीं प्राप्त करून घेण्याजोगी ), बलांनीं परिपूर्ण ( अथवा अन्नांनीं परिपूर्ण ), ज्ञाननामक दुधानें तृप्त करणारी, चांगल्या अंगाची ( किंवा सुंदर मुखाची ) अशी मेधादेवी माझें रक्षण करो ॥ ४३ ॥

**मयि मेधां मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु मयि मेधां मयि प्रजां मयींद्र इंद्रियं दधातु मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्योभ्राजो दधातु ॥ ४४ ॥**

**टीका**—मेधाप्रजासहिताभीष्टांतरप्रार्थनारूपंमंत्रमाह ॥ मयीति ॥

१ गम् धातोः सकाशात् धातोरेकाचोहलादेः क्रियासमभिव्याहारे यङिति यङ्लुतात्पचाद्यच् ।

२ पिविप्रीतावित्यस्माल्लटः शतृशानचावप्रथमा समानाधिकरणे इत्यनेन लटः शानजादेशः ।

३ अंगंप्रतीकोवयवोऽपघन इति शब्दानुशासनं ।

**अग्निः** तेजोऽभिमान्यंतर्गतः अग्निशब्दवाच्यः परमात्मा **मयि मेधां** धारणावतीं बुद्धिं **मयि प्रजां** पुत्रशिष्यभृत्यादिप्रजां **मयि तेजः** परावष्टंभशक्तिं **दधातु । इंद्रः** इंद्रियाभिमानी शक्रांतर्गतः परमात्मा **मयि मेधां** धारणावतीं बुद्धिं **मयि प्रजां** पुत्रशिष्यभृत्यादिप्रजां **इंद्रियं** चक्षुरादियद्यत्तत्तदिंद्रियं **दधातु** पोषयतु । **सूर्यः** सूर्यांतर्यामीपरमात्मा सूरिगम्यत्वात्सूर्यशब्दवाच्यः **मयि मेधां मयि प्रजां मयि**[1] **तेजः** दीप्तिं **दधातु** पोषयतु ॥ ४४ ॥

**अर्थ**—[ धारणात्मक बुद्धि व प्रजा इत्यादि इच्छित पदार्थ मला देवोत अशी प्रार्थना मंत्रानें सांगतो. ] अग्नीच्या अंतर्यामीं असलेला व अग्नि नांवाचा परमात्मा मला धारणा करणारी बुद्धि, पुत्र, शिष्य, चाकर, इत्यादि प्रजा व दुसऱ्याचें तेज कमी करणारी शक्ति देवो. इंद्राच्या अंतर्यामीं नियमन करणारा व इंद्रियांना आपआपली शक्ति देणारा परमात्मा हा मला धारणा करणारी बुद्धि, पुत्र शिष्य चाकर इत्यादिक प्रजा व इंद्रियें देवो. सूर्याच्या अंतर्यामीं राहाणारा परमात्मा ( किंवा सूरि म्ह० विद्वान् लोकांनीं मिळविण्याजोगा आहे म्हणून सूर्य नांवाचा परमात्मा ) माझे ठिकाणीं उत्तम धारणावती बुद्धि, पुत्र शिष्य चाकर इत्यादिक प्रजा व तेज देवो ॥ ४४ ॥

**अपैतु मृत्युरमृतं न आगन्वैवस्वतो नो अभयं कृणोतु । पर्णं वनस्पते रिवाभिनः शीयताꣳ रयिः सचतां नः शचीपतिः ॥ ४५ ॥**

**टीका**—इतः परं बहुभिर्मंत्रैर्मृत्युनिवृत्तिपूर्वकमभीष्टमर्थयते ॥ अपैत्विति ॥ **नः** अस्माकं **मृत्युः** मरणं **अपैतु**[2] अपगच्छतु । **अमृतं** मृतिरा-

---

१ मयीति सर्वत्र त्रिरावृत्तिरादरार्था ।

२ अप उपसर्गात् इणूगतावित्यस्माद्धातोर्लोट । एत्येधत्यूठ्स्विति सूत्रेण वृद्धिः ।

हित्यं मुक्तिः **आगन्** आगच्छतु। **वैवस्वतः**[1] सूर्यपुत्रः यमः **नः** अस्माकं **अभयं कृणोतु** करोतु । **वनस्पतेः** वृक्षस्य **पर्णं इव नः** अस्माकं **रयिः** विद्याधनादिकं **अभि** अभितः **शीयतां**[2] प्ररोहतां । **शचीपतिः** इंद्रः उत्पन्नां विविधधनात्मिकां मयि वर्तमानां रयिं **सचतां** मयि एव बध्नातु मयि यथा स्थिरं भवति तथा करोतु ॥ ४५ ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें पुष्कळ मंत्रांनीं मरण चुकून इष्टप्राप्ति होण्याची प्रार्थना करतो. ] आमचा मृत्यु आमच्यापासून दूर राहो व आम्हाला मुक्ति मिळो. सूर्याचा पुत्र यम आम्हाला अभय देवो. ज्याप्रमाणें वृक्षाला पानें येतात त्याप्रमाणें साहजिकपणानें इंद्र आम्हाला विद्या धन इत्यादि देवो. शचीचा पति इंद्र हा आमच्या ठिकाणीं असलेल्या विद्या धन इत्यादिकांना आमच्या जवळ स्थिर करो ॥ ४५ ॥

**परं मृत्यो अनुपरेहि पंथां यस्ते स्व इतरो देवयानात् । चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मानः प्रजाᳫं रीरिषो मोत-वीरान् ॥ ४६ ॥**

**टीका**—अथ द्वितीयाऋक् । हे **मृत्यो** सर्वमारकपरमात्मन् **ते** तव **देव-यानात्** त्वत्प्रापकार्चिरादिमार्गात् **इतरः स्वः** स्वर्गस्य **पंथां** पंथाः धूमादिमार्गः **तं** मार्गं **परं** भगवत्परोक्षज्ञानिनं कर्मिणमेव **अनुपरेहि** प्रापय भगवदपरोक्षज्ञानिनं तु देवयानं प्रापय । हे भगवन् **चक्षुष्मते** दूरदर्शनादिक्षमालौकिकविश्वतश्चक्षुषे **शृण्वते** दूरश्रवणादिमते **नः** अस्मदीयां **प्रजां** अपत्यभृत्यादिरूपां **मा रीरिषः**[3] माहिंसीः । **उत वीरान्** पुत्रादीन् मारीरिषः माहिंसीः रक्ष इति **ते** तुभ्यं **ब्रवीमि**[4] विज्ञापयामि ॥ ४६ ॥

---

१ विवस्वतः सूर्यस्यापत्यं पुमान् तस्यापत्यमिति सूत्रेणाणप्रत्ययः ।

२ शीङ्स्वप्ने इत्यस्माल्लोट् ।

३ रीषींहिंसायामितिधातोर्यङ्लुगंताल्लङ् ।

४ ब्रूञ्व्यक्तायां वाचीत्यस्मात ब्रुवईट् इति सूत्रेणेडागमः लट् ।

**अर्थ**---[ आतां दुसरी ऋचा सांगतो. ] सर्वांचा नाश करणाऱ्या हे परमेश्वरा, तुझी प्राप्ति करून देणारा जो अर्चिरादि मार्ग आहे त्याहून निराळा असा स्वर्गास जाण्याचा जो धूमादि मार्ग तो, ज्याला परमात्म्याचें प्रत्यक्ष ज्ञान झालें नाहीं व जो कर्म करणारा आहे त्यालाच प्राप्त करून दे; आणि ज्याला परमात्म्याचें प्रत्यक्ष ज्ञान झालें आहे त्याला देवांचा मार्ग प्राप्त करून दे. हे भगवंता, ज्याला दूर पाहातां येण्याजोगे, लोकविलक्षण, आणि सर्व बाजूंनीं असणारे असे डोळे आहेत, व ज्याला लांबचें ऐकूं येण्यासारखे कान आहेत, अशा तुला मी अशी प्रार्थना करितों कीं, आमचीं मुलें, चाकर इत्यादि, इत्यादिकांना मारूं नकोस, आणखी पुत्र इत्यादिकांना मारूं नकोस, तर त्यांचें संरक्षण कर ॥ ४६ ॥

**वातं प्राणं मनसान्वारभामहे प्रजापतिं यो भुवनस्य गोपाः । स नो मृत्योस्त्रायतां पात्वꣳहसो ज्योग्जीवा जरामशीमहि ॥ ४७ ॥**

**टीका**---**यः भुवनस्य** चतुर्दशभुवनस्य तदंतस्थजनस्य च **गोपाः**[1] रक्षकः अस्ति तं **वातं** सर्वगतं **प्राणं**[2] प्रकृष्टचेष्टकं **प्रजापतिं** प्रजापालकं भगवंतं **मनसा अन्वारभामहे** मानसपूजां कुर्मः ध्यायामश्च । **सः** पूजितः प्राणांतर्गतः परमात्मा यथावयं **ज्योग्जीवाः** जीवनमुक्ताः **जरां अशीमहि**[3] वार्द्धकमनुभवामः । तथा **नः** अस्मान् मृत्योः सकाशात् **त्रायतां**[4] **अंहसः** पापेभ्यः **पातु**[5] रक्षतु ॥ ४७ ॥

---

१ गुपूरक्षणे इत्यस्माद्धातो र्विचिरूपं ।

२ प्राणः प्रणयनाद्धरिरिति वचनात् ।

३ शीङ्स्वप्ने इत्यस्माद्धातोर्लङ् उत्तमपुरुषबहुवचनम् ।

४ त्रैङ्पालने इत्यस्माल्लोट् प्रथमपुरुषैकवचनं ।

५ पारक्षणे इत्यस्माल्लोट् प्रथमपुरुषैकवचनं ।

**अर्थ**--जो परमात्मा चवदा भुवनांचा व त्यांतील सर्व लोकांचा पालन करणारा आहे त्या सर्वव्यापी, उत्कृष्ठ प्रेरणा करणारा, व प्रजापालन करणारा अशा परमात्म्याची आम्ही मानसपूजा करितों, व त्याचें ध्यान करितों. पूजित व प्राणादिकांच्या अंतर्यामीं असलेला परमात्मा आम्हाला, ज्याप्रमाणें आम्ही जिवंत राहून म्हातारे होऊं त्याप्रमाणें मृत्यूपासून रक्षण करो, व आम्हाला आमच्या पातकांपासून रक्षण करो ॥ ४७ ॥

**अमुत्र भूयादधयद्यमस्य बृहस्पते अभिशस्तेरमुंचः। प्रत्यौहतामश्विना मृत्युमस्माद्देवानामग्नेभिषजा शचीभिः ॥ ४८ ॥**

**टीका**—हे **अग्ने** अग्निपदवाच्यपरमात्मन् **बृहस्पते**[1] बृहतां ब्रम्हादीनां पतित्वात्तत्पदवाच्य **अमुत्र** परलोके **यमस्य अभिशस्तेः** मिथ्याभिशंसनात् यद्बाधनं तस्मात् **नः अमुंचः**[2] मोचितवानसि । हे देवानां **भिषजा** वैद्यौ **अश्विना** अश्विनौ आशुगतित्वात्तच्छब्दवाच्यौ भगवन्मूर्तिविशेषौ **शचीभिः** सुवाभिः सुभेषजैर्वा **मृत्युं** मरणादिकं अस्मात् मदीयात् जनात् **प्रत्यौहतां**[3] परिहरतां ॥ ४८ ॥

**अर्थ**—हे अग्निपदानें प्रतिपादित परमेश्वरा, ब्रम्हादिकांचा पति असल्यामुळें बृहस्पति शब्दानें प्रतिपादन केलेल्या परमेश्वरा, परलोकीं खोट्या कर्मासाठीं आम्हाला यम जें शासन करील त्या शासनापासून आम्हाला तूं सोडविलेंस. हे अश्विनीकुमार नांवाचे देवांचे वैद्यहो, तुम्ही आम्हाला उत्तम औषधें देऊन आम्हाला येणाऱ्या मृत्यूपासून रक्षण करा ॥ ४८ ॥

---

१ तद्बृहतोः करपत्योश्चोरदेवतयोः सुट्तलोपश्च ।

२ मुच्लृमोक्षण इत्यस्माद्धातोर्लङ् मध्यमपुरुषः ।

३ प्रतिआ उपसर्गात् ऊहवितर्के इत्यस्माल्लङ् प्रथमपुरुषद्विवचनं ।

**हरि॰ हरंतमनुयंति देवा विश्वस्येशानं वृषभं मतीनां। ब्रम्हसरूपमनु मेदमागादयनं मा विवधीर्विक्रमस्व ॥ ४९ ॥**

**टीका**—**विश्वस्य ईशानं** प्रपंचस्वामिनं **मतीनां** लक्षणयातद्वतां **वृषभं** श्रेष्ठं **हरंतं** ब्रम्हादीन् निगृह्यहर्त्तारं **हरिं** हरिनामकं **ब्रम्हसरूपं** स्वयं परब्रम्हत्वात्स्वसदृशं अनुपमं **इदं अयनं** स्वाश्रयं **विक्रमस्व** पराक्रमस्व **मा** मांप्रति **मा विवधीः** नजाहि । **मां** मांप्रति **अगात्** प्राप्नोतु इति **देवाः अनुयंति** अनुगच्छंति ॥ ४९ ॥

**अर्थ**—सर्वप्रपंचाचा स्वामी, मतिमान् लोकांमध्यें श्रेष्ठ, ब्रम्हादिकांना नियमन करणारा, निरूपम, सर्वांचा आश्रयरूपीं असलेला असा परमात्मा मला पराक्रमी करो. तो परमात्मा मला कधीं न मारो. तो नेहेमीं माझ्याजवळ असो. अशा रीतीनें देव परमात्म्याला जाणतात ॥ ४९ ॥

**शल्कैरग्निमिंधान उभौ लोकौ सनेमहं । उभयोर्लोकयोर्ऋध्वाति मृत्युंतराम्यहं ॥ ५० ॥**

**टीका**—**शल्कैः**[1] काष्ठशकलैः समिद्भिरिति यावत् **अग्निं** गार्हपत्याद्यग्निं **इंधानः** दीपयन् अग्न्याधानादिकं कुर्वन् **उभौ लोकौ** तत्स्थइंद्रादिदेवसमुदायौ **सनेमहं**[2] भजेमहि । तेन **उभयोः लोकयोः** स्वर्गापवर्गाख्यलोकद्वये **ऋध्वा** अभिवृध्दः सन् **अहं मृत्युं अतितरामि**[3] ॥ ५० ॥

**अर्थ**—समिधादिक काष्ठांनीं गार्हपत्याग्नीला पेटविणारा असा मी इंद्रादिकांच्या लोकीं जाईन व स्वर्गांत असलेल्या इंद्रादिक देवांची भक्ति

---

१ शल्के शकलवल्कले इति कोशात् ।

२ वनषण संभक्ताविति धातोः । वर्णव्यत्ययश्छांदसः ।

३ स्वर्गेलोकेन त्रयं किंच नास्ति न तत्रत्वंजरया बिभेति इति कठवल्ल्युक्तेः ।

करील. त्यापासून स्वर्ग व अपवर्ग ह्या दोन लोकीं आनंदांनीं पूर्ण होऊन मृत्यूपासून सुटेन ॥ ५० ॥

**मा छिदो मृत्यो मावधीर्मा मे बलं विवृहो मा प्रमोषीः । प्रजां मा मे रीरिष आयुरुग्र नृचक्षसं त्वा हविषा विधेम ॥ ५१ ॥**

**टीका**—हे **मृत्यो** तदंतर्गतपरमात्मन् **उग्र** क्रूर **नृचक्षसं** नृणांवक्तारंतज्ज्ञानिनं **त्वा** त्वां प्रति **हविषा** साधनद्रव्येण **विधेम** परिचर्यां कुर्मः । तया परिचर्यया तुष्टः सन् **मा वधीः मा छिदः** हननच्छेदनेमाकुरु । **मे बलं मा विवृहः** माछिधि । **मा प्रमोषीः** न्यूनंमाकुरु । **मे प्रजां** पुत्रशिष्यभृत्यादिजनं **मे आयुः च मा रीरिषः** माविनाशय अभिवृध्दमेवकुर्विंतिभावः ॥ ५१ ॥

**अर्थ**—हे मृत्यूच्या अंतर्यामी राहणाऱ्या परमेश्वरा, हे दुष्टाशीं क्रूरपणानें वागणाऱ्या परमेश्वरा, सर्व मनुष्यांमध्यें वक्ता व उत्तम ज्ञानि अशा तुला आम्ही तूप इत्यादि साधनांनीं पूजा करतों. त्या पूजेपासून तूं संतुष्ट होऊन माझें छेदन करूं नको व मला मारूं नको. माझें बल कमी किंवा नाहींसें करूं नको. माझ्या पुत्र शिष्य इत्यादि जनांला मारूं नको. तर त्या सर्वांची वृद्धि कर ॥ ५१ ॥

**मा नो महांतमुतमानो अर्भकं मा न उक्षंतमुत मा न उक्षितं । मा नो वधीः पितरं मोत मातरं प्रिया मा नस्तनुवोरुद्र रीरिषः ॥ ५२ ॥**

**टीका**—हे **रुद्र** रुग्द्रावकभगवन् त्वं **नः** अस्माकं **महांतं** वयोविद्यादिभिः श्रेष्ठं पुत्रं **मा वधीः** । **उत नः** अस्माकं **अर्भकं** शिशुं **मा** वधीः । **नः** अस्मत्संबंधिनं **उक्षंतं** रेतःसेचनशक्तं तरुणपुत्रं च **मा** वधीः । **नः** अस्माकं **उक्षितं** गर्भस्थं **मा** वधीः । **नः** अस्माकं **पितरं मा** वधीः ।

**उत नः** अस्माकं **मातरं** मा वधीः । **नः** अस्माकं **प्रियाः** स्निग्धाः **तनुवः** मूर्तयश्चताः **मा रीरिषः** मा वधीः ॥ ५२ ॥

**अर्थ**—हे सर्वांचा संहार करणाऱ्या रुद्राच्या अंतर्यामीं राहाणाऱ्या परमात्म्या, तूं वय, विद्या इत्यादिकांनीं श्रेष्ठ अशा आमच्या पुत्राला मारूं नकोस. आमच्या बालकाला, आमच्यासंबंधीं रेताचें सिंचन करणाऱ्या पुत्राला, गर्भांत राहणाऱ्या आमच्या पुत्राला, आमच्या बापाला आणि आईला, आमच्या आवडत्या मूर्तींना कधींही मारूं नको ॥ ५२ ॥

**मा नस्तोके तनये मा न आयुषि मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः । वीरान्मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मंतो नमसा विधेम ते ॥ ५३ ॥**

**टीका**—हे **रुद्र** तदंतर्गतपरमात्मन् **नः तोके तनये** अल्पे क्षुल्लके वा पुत्रे **नः आयुषि** च **नः गोषु** प्रसिद्धगवादिषु **नः अश्वेषु भामितः** कोपितः सन् **मा रीरिषः** मा वधीः । हे **रुद्र नः** अस्माकं **वीरान्** पतिपुत्रादींश्च भामितः **मा वधीः**। नन्वेतावत्प्रार्थनं क्रियते त्वया मम किं क्रियत इत्यत आह ॥ हविष्मंत इति ॥ **हविष्मंतः** हविरादिविशिष्टपूजासाधनवंतः तदादाय **ते** तव **नमसा** नमस्कारपूजादिना **विधेम** परिचर्यां कुर्मः । तेन तुष्टो मां रक्ष ॥ ५३ ॥

**अर्थ**—हे रुद्राच्या अंतर्यामीं असणाऱ्या परमात्म्या, आमच्या लहान बालकाविषयीं, आमच्या आयुष्याविषयीं, आमच्या गाई घोडे इत्यादिकांविषयीं, रागावून आमचा नाश करूं नको. हे रुद्राच्या अंतर्यामीं असणाऱ्या परमात्म्या, आमच्या पति, पुत्र इत्यादिकांवर रागावून नाश करूं नको. [ इतकी प्रार्थना करून रक्षण करा असें म्हणतोस तर तूं माझें असें काय केलें आहेस कीं, ज्याच्या योगानें मी तुझ्यावर कृपा करावी, तर ह्याचें उत्तर सांगतों. ] आम्ही तूप दूध इत्यादि होमाला योग्य अशा

पदार्थांच्या साधनांनीं नमस्कार करून तुझी पूजा करितों. त्या पूजेनें तूं संतुष्ट होऊन आमचें रक्षण कर ॥ ५३ ॥

**प्रजापते नत्वदेतान्यन्योविश्वा जातानि परिता बभूव। यत्कामास्ते जुहुमस्तं नो अस्तु वयं स्याम पतयो रयीणां ॥ ५४ ॥**

**टीका**—हे **प्रजापते** प्रजापालकविष्णो **एतानि विश्वा** विश्वानि समस्तानि **जातानि** जातानां **परिता** पालयिता **त्वदन्यः न बभूव** नाभून्नभविष्यति चेत्यर्थः । अथ वयं **यत्कामाः** यदिच्छवः **ते** तुभ्यं **जुहुमः** होमं कुर्मः । **तत्** कामितं **नः अस्तु । वयं रयीणां** विद्याधनात्मकानां **पतयः स्याम** भवाम ॥ ५४ ॥

**अर्थ**—हे प्रजेचें पाळण करणाऱ्या विष्णु, ह्या सर्व उत्पन्न झालेल्या प्राण्यांचा पाळण करणारा तुझ्याशिवाय दुसरा कोणी झाला नाहीं व होणारही नाहीं. आतां ज्या इच्छेनें आम्ही तुझ्यासाठीं होम करितों ती इच्छा पूर्ण होवो. आम्ही विद्वान व धनवान होऊं ॥ ५४ ॥

**स्वस्तिदा विशस्पतिर्वृत्रहा विमृधो वशी । वृषेंद्रः पुर एतु नः स्वस्तिदा अभयंकरः ॥ ५५ ॥**

**टीका**—**स्वस्तिदाः** स्वस्तिददातीति **वृत्रहा** दुष्टहिंसकः **विमृधः** विशेषेणसमृद्धिकर्त्ता **वशी** स्वतंत्रः **वृषा** अभीष्टपूरकः **इंद्रः** सर्वैश्वर्यपूर्णः **स्वस्तिदा** कल्याणरक्षकः **अभयंकरः** भक्ताभयकरः **विशस्पतिः** प्रजापतिः **नः** अस्माकं **पुरः** पुरस्तात् **एतु** ॥ ५५ ॥

**अर्थ**—कल्याण करणारा, दुष्टांचा नाश करणारा, विशेषेंकरून समृद्धि करणारा, स्वतंत्र, इच्छिलेलें देणारा, सर्व ऐश्वर्यांनीं पूर्ण, कल्या-

---

१ प्रथमा षष्ठ्यर्थे ।

२ पृपालन पूरणयो रितिधातो स्तन्प्रत्ययः ।

णाचें रक्षण करणारा, भक्ताला निर्भय करणारा असा जगाचा स्वामी परमात्मा आमच्यापुढें येवो ॥ ५५ ॥

**त्र्यंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनं। उर्वारुकमिव बंधनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥ ५६ ॥**

**टीका**—**सुगंधिं** सुगंधिनं शोभनहर्षवंतं **पुष्टिवर्धनं** समस्तपोषकं **त्र्यंबकं** त्रीणि अंबकानि यस्यसः रुद्रः तदंतर्गतः परमात्मा नृसिंहश्च तं **यजामहे**[1] पूजयामः। तेन पूजनेन **ऋतात्** यथार्थज्ञानरूपात् **मृत्योः** प्रसिद्धमृत्योः **बंधनात्** अविद्यादिलक्षणात् **उर्वारुकं इव** तत्फलमिव **मां मुक्षीय** मोचय ॥ ५६ ॥

**अर्थ**—उत्तम गंधांनींयुक्त व समस्त प्रजेला पोषणारा, अशा तीन डोळे असलेल्या शंकराची व त्याच्या आंत असलेल्या नरसिंहाची आम्ही पूजा करतों. त्या पूजेच्यायोगानें, जसें काकडीचें फळ देंठापासून तुटून पडतें तसें, यथार्थ ज्ञानरूप मृत्यूच्या अज्ञानरूप बंधनापासून मला मुक्त कर ॥ ५६ ॥

**येते सहस्रमयुतं पाशा मृत्योमर्त्याय हंतवे। तान्यज्ञस्य मायया सर्वानवयजामहे ॥ ५७ ॥ मृत्यवे स्वाहा मृत्यवे स्वाहा ॥ ५८ ॥**

**टीका**—हे **मृत्यो** मृत्युनियामकनृसिंह **मर्त्याय** मर्त्यं **हंतवे** मृत्युं हंतु **अयुतं सहस्रं** सहस्रसंख्याकाः **येते पाशाः** बंधकाः संति। **तान् यज्ञस्य** यज्ञनामकस्य परमात्मनः **मायया** इच्छया **अवयजामहे** असंगतान् कुर्मः ॥ ५७ ॥ **मृत्यवे** मृत्योरपिमारकशक्तिप्रदाय **मृत्यवे** तन्नामक नृसिंहाय स्वाहा ॥ ५८ ॥

**अर्थ**—हे मृत्यूचाही नियमन करणाऱ्या नरसिंहा, मरणाऱ्याला मार-

---

१ यजदेवपूजासंगतिकरणदानेषु !

व्याकरितां जे तुझे लक्षावधि पाश आहेत, त्या सर्व पाशांना आम्ही यज्ञ-नामक परमात्म्याच्या इच्छेनें तोडून टाकूं ॥ ५७ ॥ मृत्यूलाही मारक शक्ति देणाऱ्या नरसिंहाला आहुति असो ॥ ५८ ॥

**देवकृतस्यैनसोवयजनमसि स्वाहा । मनुष्यकृतस्यैनसोवयजनमसि स्वाहा । पितृकृतस्यैनसोवयजनमसि स्वाहा । आत्मकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा । अन्यकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा । अस्मत्कृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा । यद्दिवा च नक्तं चैनश्चकृमतस्यावयजनमसि स्वाहा । यत्स्वपंतश्च जाग्रतश्चैनश्चकृमतस्यावयजनमसि स्वाहा । यत्सुषुप्तश्च जाग्रतश्चैनश्चकृमतस्यावयजनमसि स्वाहा । यद्विद्वाꣳ सश्चाविद्वाꣳ सश्चैनश्चकृमतस्यावयजनमसि स्वाहा । एनस एनसोऽवयजनमसि स्वाहा ॥ ५९ ॥**

**टीका**—इतःपरं ब्रम्हज्ञानप्रतिबंधकीभूतपापपरिहारकएकादशहोममंत्रान् एकेनानुवाकेनाह ॥ देवकृतस्येति ॥ हे यज्ञपुरुष **देवकृतस्य देवैः** कारितस्य ज्ञानिप्रतिबंधकस्य **एनसः** पापस्य **अवयजनं** अवयजनः असंबंधकः **असि** । अतः ते **स्वाहा** स्वाहाकारेण घृताहुत्यादिकुर्मः । **मनुष्यकृतस्य** मानुषशरीरेण कृतस्य **एनसः** पापस्य **अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा** । **पितृकृतस्य** पितृपितामहाद्यैः कृतस्य **एनसः** पापस्य **अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा** । **आत्मकृतस्य** शरीरमनआदिकृतस्य **एनसः अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा** । **अन्यकृतस्य** अन्यसंसर्गात्कृतस्य प्राप्तस्य **एनसः अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा** । **अस्मत्कृतस्य** अस्मदीयैः कृतस्य **एनसः अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा** । **यत्** दिवा अन्हि **नक्तं च** रात्रौ **एनः** पापं **चकृम** कुर्मः

**तस्य अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा । स्वपंतः** स्वायंकुर्वंतः **च जाग्रतः** जागरूकाः संतः **च यत् एनः** पापं **चकृम तस्य अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा । सुषुप्तः** स्वायंकुर्वंतः **च जाग्रतः** जागरूकाः **च यत् एनः चकृम तस्य अवयजनं असि स्वाहा । विद्वांसः** ज्ञानिनः ज्ञात्वा **यत् एनः** पापं **चकृम अविद्वांसः** अज्ञानिनः अज्ञात्वा **यत् एनः** पापं **चकृम तस्य अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा । एनसः** पातकस्य **एनसः** पापस्य **अवयजनं** असंबंधकः **असि स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ९९ ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें परब्रह्माचें ज्ञान होण्याकरितां मध्यें आडवें आलेल्या पातकांचा नाश होण्याकरितां अकरा मंत्रांच्या एका अनुवाकानें आहुति देऊन प्रार्थना करतो. ] हे यज्ञपुरुषा, देवांनीं आमच्याकडून करविलेल्या पातकांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला तूप इत्यादिकांनीं मिश्रित अशी आहुति असो. मनुष्यशरीरानें केलेल्या पातकांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. पितरानें केलेल्या पातकांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. शरीर, मन, इत्यादिकांनीं केलेल्या पापांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. आमच्या आप्त लोकांनीं केलेल्या पापांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. दुसऱ्याच्या संसर्गापासून झालेल्या पातकांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. आम्ही दिवसा रात्रीं केलेल्या पापांचा संबंध आम्हाला लागूं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. आम्ही जागे असतां व झोंपेंत असतां केलेल्या पापांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो. आम्ही जाणून जें पाप केलें असेल व अजाणत जें पाप केलें असेल त्याचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहु-

ति असो. हरएक पापांचा संबंध आम्हाला होऊं देऊं नको. ह्यास्तव तुला चांगली आहुति असो ॥ ५९ ॥

**यद्वो देवाश्चकृम जिव्हया गुरुमनसो वा प्रयुती देवहेडनं। अरावायो नो अभिदुच्छुनायते तास्मिन्तदेनो वसवो निधेतनस्वाहा ॥ ६० ॥**

**टीका**—हे देवाः **यत् वः** युष्माकं **जिव्हया** कौटिल्येन **गुरुमनसः** गौरवोपेतमनस्काः स्थूलमतयः **वयं प्रयुती** प्रयुक्ताः वयं **देवहेडनं**[1] देवानां हेलनं निंदनं **चकृम**। हे **वसवः यः नः अभिदुच्छुनायते** दुष्टश्वानवदाचरति **तास्मिन् अरौ तत् एनः** जिव्हया देवहेलनादिना कृतं पापं **निधेतन** निधायत ॥ ६० ॥

**अर्थ**—हे देवहो, आम्हीं स्थूलबुद्धीचे असून लबाडीनें जिव्हेनें जी तुमची निंदा केली असेल त्यापासून झालेलें पातक, हे अष्टवसुरूपी परमेश्वरा; आमच्यामध्यें जो कोणी दुष्ट कुत्र्याप्रमाणें आचरण करीत असेल त्यावर ठेवा ॥ ६० ॥

**कामोऽकार्षीन्नमोनमः। कामोऽकार्षीत्कामः करोति नाहं करोमि कामः कर्त्ता नाहं कर्त्ता कामः कारयिता नाहं कारयिता एष ते काम कामाय स्वाहा ॥ ६१ ॥**

**टीका**—इतःपरं कामएषक्रोधएषइत्यादिगीतोक्ततया तयोर्ज्ञानप्रतिबंधकत्वात्तत्परिहारार्थं तद्देवताप्रीतये होममंत्रानाह ॥ कामोऽकार्षीदिति ॥ **कामः** तदभिमानीकामदेवः त्वं ज्ञानप्रतिबंधकं **अकार्षीत्**[2]। अतः प्रति-

---

१ डलयोरभेदः।

२ आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनोनित्यवैरिणा कामरूपेण कौंतेय दुःपूरेणानलेन चेति गीतासु।

बंधकपरिहारार्थं ते **नमः** नमस्कारं **नमः** कुर्मः । **कामः** तदभिमानी देवः असुरश्च ज्ञानप्रतिबंधकं **अकार्षीत्** पूर्वंकृतवान् । **कामः** पूर्वोक्तः **करोति** वर्तमानज्ञानप्रतिबंधरूपं पापं **करोति । अहं न करोमि । कामः कर्त्ता** ज्ञानप्रतिबंधकः । **अहं न कर्त्ता । कामः कारयिता** मद्धस्तेन ज्ञानप्रतिबंधकपापं कारयिता । **अहं न कारयिता** । तस्मात् हे **काम ते कामाय एषः** घृताहुत्यादिः **स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ६१ ॥

**अर्थ**—[ ह्या पुढें गीतिमध्यें असें जें सांगितलें आहे कीं, हा काम व क्रोध मनुष्याकडून पाप करवितो म्हणून ते ज्ञानाला प्रतिबंधक आहेत, त्यांचा परिहार करण्याकरितां त्यांच्या देवतांच्या प्रीतीकरितां होमाचे मंत्र सांगतो. ] कामदेवानें तुझ्या ज्ञानाला प्रतिबंधक अशीं कर्में केलीं. तो प्रतिबंध नाहींसा होण्याकरितां कामदेवाला माझा नमस्कार असो. कामदेव व दैत्य ह्यांनीं ज्ञानाला पूर्वीं प्रतिबंध केला. कामदेव हाच ज्ञानाला प्रतिबंध करणारें असें हल्लीं असलेलें पाप करितो. मी तें पाप करीत नाहीं. कामदेव हा ज्ञानाला प्रतिबंध करणारें असें पाप माझ्या हातानें करविणारा आहे. तें पाप करणारा मी नाहीं. म्हणून, हे कामदेवा, तुझ्या इच्छा पूर्ण होण्यास्तव ही तुपाची आहुति तुला उत्तम रीतीनें अर्पिलेली असो ॥ ६१ ॥

**मन्युरकार्षीन्नमोनमः । मन्युरकार्षीन्मन्युः करोति नाहं करोमि मन्युः कर्ता नाहं कर्ता मन्युःकारयिता नाहं कारयिता एष ते मन्यो मन्यवे स्वाहा ॥ ६२ ॥**

**टीका**—न केवलं कामः कर्त्ता कारयिता च ज्ञानप्रतिबंधकीभूतपापादीनां अपितु मन्युरपीतितच्छांत्यैहोममंत्रमाह ॥ मन्युरिति ॥ **मन्युः** तदभिमानीरुद्रः तन्नियामकोमन्युनामकोनृसिंहश्च एनंः ज्ञानप्रतिबंधकंपापं

---

१ एन इति षाष्टि मंत्रांतर्गतं पद मनु वर्त्तते ।

**अकार्षीत्** अकारयच्च । तस्मै मन्यवे **नमः नमः** । **मन्युः** एनः ज्ञानप्रतिबंधकंपापं **अकार्षीत्** पूर्वंकृतवान् । **मन्युः** वर्तमानज्ञानप्रतिबंधकंपापं **करोति** । **अहं न करोमि** । **मन्युः** तदेवपापं **कर्ता** । **अहं न कर्ता** । **मन्युः** तस्यैव पापस्य प्रजाभिः मया च **कारयिता** । अहं न कारयिता । **हे मन्यो ते मन्यवे** मन्युनिवृत्यर्थं **एषः** आहुत्यादिकं **स्वाहा** करोमि॥६२॥

**अर्थ**—[ केवळ कामदेव हाच ज्ञानाला प्रतिबंध करणारें पाप करणारा व करविणारा आहे असें नाहीं, तर क्रोधाचा अभिमानी देवही तें करणारा व करविणारा आहे. म्हणून त्याच्या शांतीकरितां होमाचा मंत्र सांगतो. ] क्रोधाचा अभिमानीदेव रुद्र आणि त्याचें नियमन करणारा नरसिंह ह्यानें ज्ञानाला प्रतिबंध करणारें पाप केलें व करविलें. त्या रुद्राला व नरसिंहाला नमस्कार असो. क्रोधाभिमानी देवानें ज्ञानाला प्रतिबंध करणारें असें पाप पूर्वी केलें. क्रोधाभिमानी देव हा हल्लींचें पाप करतो. मी करीत नाहीं. क्रोधाभिमानी देव तें पाप करणारा आहे. मी तें करणारा नाहीं. क्रोधाभिमानी देव तेंच पाप लोकांकडून व मजकडून करविणारा आहे. मी करविणारा नाहीं. हे क्रोधाभिमानी देवा, तुझा क्रोध जाण्याकरितां मी तुला आहुति इत्यादिक अर्पण करितों ॥ ६२ ॥

**तिलां जुहोमिसरसाꣳसपिष्टान् गंधार[1] मम चित्ते रमंतु स्वाहा। गावो हिरण्यं धनमन्नपानꣳ सर्वेषाꣳ श्रियै स्वाहा। श्रियं च लक्ष्मिं च पुष्टिं च कीर्तिंचानृण्यतां । ब्रम्हण्यं बहु पुत्रतां । श्रद्धामेधे प्रजाः संददातु स्वाहा ॥ ६३ ॥**

**टीका**—इतःपरं ज्ञानगोहिरण्यादिलाभार्थं तिलहोममंत्रानाह ॥ तिलानिति ॥ **सरसान् सपिष्टान्** क्षीरशर्करादिपिष्टसहितान् **तिलान्** प्रसिद्धान् **जुहोमि** । तेन होमेन हे **गंधाराः** हे देवाः **मम चित्ते रमंतु**

---

१ गंधारइतिपाठे हेगंधार हेगंधारदेश इत्यर्थः कर्तव्यः । गंधारदेशोविशेषतः तिलोत्पत्तेः ।

क्रीडयंतु मम चित्तं प्रेरयंतु **स्वाहा** सुहुतमस्तु । **गावः** प्रसिद्धाः **हिरण्यं** स्वर्णं **धनं** द्रविणं **अन्नं पानं सर्वेषां** श्रीः **संददातु** । तस्यै **श्रियै स्वाहा** सुहुतमस्तु । **श्रियं** शोभां **च लक्ष्मिं** संपत्तिं **च पुष्टिं** समृद्धिं **च कीर्तिं च अनृण्यतां** ऋणराहित्यं **ब्रम्हण्यं** ब्राम्हणप्रियत्वं **बहुपुत्रतां श्रद्धामेधे** आस्तिक्यधारणावत्यौ धियौ **प्रजाः** शिष्यभृत्यादिप्रजाः तिलाः तदभिमानितन्नियामकभगवद्रूपविशेषाश्च **संददातु** ददतु **स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ६३ ॥

**अर्थ**—[ ह्यापुढें ज्ञान, गाय, सोनें इत्यादि मिळण्याकरितां तिळाचा होम करण्याचे मंत्र सांगतो. ] दूध, साखर इत्यादि व पीठ ह्यांशीं मिसळलेल्या तिळांचा मी होम करितों. त्या होमाच्या योगानें, हे देवहो, ते तीळ माझ्या चित्ताला प्रेरणा करोत. गायी, सोनें, पैका, अन्न, पाणी इत्यादि पिण्याचे पदार्थ हे सर्व आमच्या कल्याणाकरितां लक्ष्मीही आम्हाला देवो. त्यास्तव लक्ष्मीला तें उत्तम हवन असो. शोभा, संपत्ति, समृद्धि, कीर्ति, कर्ज नसणें, ब्राम्हणांची प्रीति असणें, पुष्कळ मुलगे असणें, आस्तिक्य व धारणा ह्यांनीं युक्त अशी बुद्धि, चाकर शिष्य इत्यादि, हे ते तीळ आणि त्या तिळांचे अभिमानी व नियमन करणारे देव आम्हाला देवोत. त्यांना मीं दिलेला होम हितकर होवो ॥ ६३ ॥

**तिलाः कृष्णास्तिलाः श्वेतास्तिलाः सौम्या वशानुगाः । तिलाः पुनंतु मे पापं यत्किंचिद्दुरितं मयि स्वाहा । चोरस्यान्नं नवश्राद्धं ब्रम्हहा गुरुतल्पगः । गोस्तेयꣳ सुरापानं भ्रूणहत्या तिलाशांतिꣳ शमयंतु स्वाहा । श्रीश्च लक्ष्मीश्च पुष्टीश्च कीर्तिंचानृण्यतां । ब्रम्हण्यं बहुपुत्रतां । श्रद्धामेधे प्रज्ञातु जातवेदः संददातु स्वाहा ॥ ६४ ॥**

---

१ ह्रस्वश्छांदसः ।

**टीका**—इष्टप्राप्तये तिलहोममुक्त्वाऽनिष्ट परिहाराय तिलहोममंत्रानाह ॥ तिला इति ॥ **कृष्णाः** कृष्णवर्णोपेताः **तिलाः**[1] तद्गतभगवद्रूपविशेषाः **श्वेताः** श्वेतवर्णोपेताः **तिलाः** भगवद्रूपविशेषाः **सौम्याः वशानुगाः** भक्तवशानुगाः **तिलाः** तन्नियामकभगवद्रूपविशेषाः **मे पापं यत् किंचित् दुरितं मयि** अधिकं स्वल्पंवा वर्तते **तत् सर्वं पुनंतु स्वाहा** सुहुतमस्तु । **चोरस्य अन्नं** चोरान्नभक्षणनिमित्तं **नवश्राद्धं** नवश्राद्धीयभोजननिमित्तं **ब्रम्हहा** ब्रम्हहत्या तज्जन्यं पापं **गुरुतल्पगः**[2] मातृगुर्वादिभार्यागामिदोषं **गोस्तेयं** गोचौर्यं **सुरापानं** मद्यपानजन्यं पापं **भ्रूणहत्या** वेदशास्त्रसंपन्नब्राम्हणकुमारहत्याजन्यं पापं **तिलाः** तन्नियामकाः भगवद्रूपविशेषाः एतत्पूर्वोक्तपापं **शमयंतु** नाशयंतु **शांतिं** कुर्वंतु इति **स्वाहा** सुहुतमस्तु ॥ हे **जातवेदः** अग्न्यंतर्गतभगवन् **श्रीः च लक्ष्मीः च पुष्टीः च कीर्तिं** च **अनृण्यतां** ऋणराहित्यं **ब्रह्मण्यं बहुपुत्रतां** पुत्रबाहुल्यं **श्रद्धामेधे प्रज्ञा तु** च आस्तिक्यबुद्धिभगवद्विषयकज्ञानं मयि **संददातु स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ६४ ॥

**अर्थ**—[ जें पाहिजे तें मिळण्यास्तव तिळाचा होम सांगून जें नको तें न मिळण्यास्तव तिळाच्या होमाचे मंत्र सांगतो. ] काळ्या तिळांत राहाणारीं भगवंताचीं रूपें, पांढऱ्या तिळांत राहाणारीं भगवंताचीं रूपें, सौम्य तिळांत राहाणारीं भगवंताचीं रूपें, भक्ताच्या आधीन राहाणारीं भगवंताचीं रूपें, अशीं सर्व भगवद्रूपें माझें पाप व माझे ठिकाणीं थोडे किंवा अधिक असलेलें पाप नाहींसे करोत व मला शांत करोत. त्या रूपाकरितां मीं केलेला होम चांगला होवो. चोराचें अन्न खाल्ल्यापासून, मासिकादि श्राद्धास जेवल्यापासून, ब्राह्मणास मारल्यापासून, आई, गुरूची बायको इत्यादिकांशीं संग केल्यापासून, गाई चोरल्यापासून, दारू प्याल्यापासून, विद्वान् ब्राह्मणाच्या बालकाला मारल्यापासून झालेल्या सर्व पापांचा

---

१ तिष्ठत एव शांतिसुखं प्रयच्छंति ते तिलाः ।

२ राजभार्या गुरोर्भार्या भार्याचापि पितुस्तथेति वचनात्.

तिळांचीं नियामक अशीं भगवंताचीं रूपें नाश करून शांत करोत. हे अग्नीच्या अंतर्यामीं असणाऱ्या परमात्म्या, संपत्ति, लक्ष्मी, व पुष्टि ह्या देवता मला कीर्ति, ऋणाचें मोचन, ब्राम्हणास प्रियपणा, पुष्कळ पुत्र, आस्तिक्य बुद्धि, भगवंताचेविषयींचें ज्ञान इत्यादिक देवोत ॥ ६४ ॥

**प्राणापानव्यानोदानसमाना मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ।**

**टीका**—इत्थं ज्ञानप्रतिबंधकपापनिरासमुक्त्वा ज्ञानयोग्यतायै शरीरावयवशुध्यर्थं होममंत्रमाह ॥ प्राणेति ॥ **मे** मम **प्राणापानव्यानोदानसमानाः** प्राणः प्रकर्षेण श्वासनयनात् अपानः मलमूत्राद्यपनयनात् व्यानः विविधंनयनात् द्वासप्ततिसहस्रनाडीषु संचाराच्च उदानः ऊर्ध्वंजीवंनयतीति समानः भुक्तमन्नं शरीरावयवेषु समंनयतीति एते पंचवायवः जडाः तदभिमानिनो दासप्राणाश्च[1] अनेन आज्यहोमेन **शुध्यंतां** शुद्धा भवंतु **अहं विपाप्मा** ज्ञानप्रतिबंधकीभूतपातकरहितः **विरजाः** रजोगुणोपलक्षितपापकारणरजस्तमोगुणरहितः **ज्योतिः** प्रकाशस्वरूपः **भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—[ ह्याप्रमाणें ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापांचा निरास करण्याचें सांगून ज्ञान मिळविण्याची योग्यता येण्याकरितां शरीराच्या अवयवांची शुद्धि होण्याकरितां होमाचा मंत्र सांगतो. ] जोरानें श्वासोश्वास करणारा म्हणून प्राण नांवाचा, मलमूत्रादिकांना खालीं नेणारा म्हणून अपान नांवाचा, नानाप्रकारानें बहात्तर हजार नाडींमध्यें संचार करणारा म्हणून व्यान नांवाचा, वरच्या भागीं जीवाला नेणारा म्हणून उदान नांवाचा, खाल्लेलें अन्न सर्व शरीराच्या अवयवांत सारखें पोंहोंचविणारा म्हणून समान नांवाचा, असे हे माझे पांच जड वायु व त्याचे अभिमानी देव व नागादिक दास प्राण हे शुद्ध होवोत. नतर मी ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापानें

---

1 नागकूकलकूर्मदेवदत्तधनंजयाः ।

रहित, पापाला कारण अशा रजोगुण व तमोगुण ह्या उभयतांनीं रहित होऊन प्रकाशरूपी होईन. मीं केलेला होम उत्तम रीतीनें असो.

**वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणरेतोबुध्याकूतिः संकल्पा मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥**

**टीका—मे** मम **वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणरेतोबुध्याकूतिः** वाक् मनः चक्षुः श्रोत्रं जिव्हा घ्राणमेतानि ज्ञानेंद्रियाणि प्रसिद्धानि रेतः चरमधातुः बुद्धिः तात्कालिकीवर्तमानकालार्थविषयिणी आकूतिः अभिप्रायः **संकल्पाः** इदमित्थं करिष्यामि इति संकल्परूपवृत्तिः इमे तत्तदभिमानिनोदेवाः **शुध्यंतां ।** तेन **अहं विरजाः** रजोगुणोपलक्षिततमोगुणेनापि रहितः **विपाप्मा** पापरहितः **ज्योतिः भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—माझी वाणी, मन, चक्षु, श्रोत्र, जिव्हा, घ्राण, हीं सहा ज्ञानेंद्रियें, वीर्य, वर्तमानकालचें ज्ञानाचा विषय असणारी बुद्धि, अभिप्राय, संकल्प म्हणजे हें असें करीन अशी वृत्ति, हे सर्व व त्यांचे अभिमानी **देव** शुद्ध होवोत. त्या योगानें मी रज व तम ह्यांनीं रहित होऊन पापरहित होईन.

**त्वक्चर्ममाꣳसरुधिरमेदोमज्जास्नायवोस्थीनि मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजाविपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥**

**टीका—मे त्वक्चर्ममांसरुधिरमेदोमज्जास्नायवः** त्वक् अंतर्विद्यमाना चर्म बहिर्भागे विद्यमानं मांसं प्रसिद्धं रुधिरं रक्तं मेदः प्रसिद्धः मज्जा स्नायु नाडीबंधनरज्जुः **अस्थीनि** इमे तदभिमानिनः देवाश्च **शुध्यंतां ।** तेन होमेन **अहं विपाप्मा** ज्ञानप्रतिबंधकपापरहितः **विरजाः** रजोगुणोपलक्षिततमोगुणेनापि रहितः **ज्योतिः** स्वप्रकाशरूपः **भूयासं इति स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—माझ्या शरीराच्या आंतील कातडें व बाहेरील कातडें, मांस,

रक्त, मेद, मज्जा, नाडीचे बंधनाकारितां असलेल्या दोऱ्या, स्नायु, हाडें हीं सर्व व त्यांचे अभिमानी देव शुद्ध होवोत. त्या योगानें मी ज्ञानास प्रतिबंध करणाऱ्या पापापासून मुक्त होऊन रज व तमोगुण ह्यापासून निराळा होऊन प्रकाशरूप होईन. माझा हा होम त्या देवतांना संतोष देणारा होवो ॥

**शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदरजंघाशिश्नोपस्थपायवो मे शुध्यंतां ज्योतिरहंविरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥**

**टीका—मे शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदरजंघाशिश्नोपस्थपायवः** शिरः उत्तमांगं पाणिपादौ प्रसिद्धौ पार्श्वः[1]कक्षाधोभागः पृष्ठं[2] तनोश्चरमभागः ऊरूः सक्थिः उदरं कुक्षिः जंघा जानुः **शिश्नोपस्थौ** पुल्लिंगस्त्रीलिंगादि भेदविवक्षया **पायुः** अपानप्रदेशः एते शरीरावयवाः तदभिमानिनो देवाश्च **शुध्यंतां** शुद्धा भवंतु । अनेन घृतहोमेन **अहं विपाप्मा** ज्ञानप्रतिबंधकपापरहितः **विरजाः** रजोगुणोपलक्षिततमोगुणेनापिरहितः **ज्योतिः** स्वतश्चिदानंदाद्यात्मकः जीवः **भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—माझें मस्तक, हात, पाय, बरगड्या, पाठ, मांड्या, पोट, गुडघा, शिश्न, स्त्रीचें जननेंद्रिय, गुदस्थान हे सर्व शरीराचे अवयव शुद्ध होवोत. तेणेंकरून मी पापरहित, रजोगुण व तमोगुण यांनीं रहित होऊन जीवाचें मूळचें चित् व आनंद ह्या दोहोंनीं युक्त होईन. हा माझा होम चांगला असो ॥

**उत्तिष्ठ पुरुष हरितपिंगललोहिताक्षि देहि देहि ददापयिता मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥ ६५ ॥**

---

१ पार्श्वमस्त्रीतयोरध इति कोशात् ।

२ पृष्ठं तु चरमं तनोरिति कोशात् ।

**टीका**—हे **हरित** हरणशील **पिंगल** पिंगलवर्णोपेत **लोहिताक्षिं** रक्ताक्षिन् यद्वा हरितपिंगललोहिताक्षिं इत्येकंपदं **पुरुष उत्तिष्ठ** उद्बोध अनुग्रहोन्मुखोभव । **देहि देहि** मह्यं ज्ञानमुपदिश । **ददापयिता** गुर्वादिभिर्ज्ञानं पुनः पुनः दापयिताभव । तेन ज्ञानेन **मे** अवयवाः **शुध्यंतां** । **अहं विपाप्मा विरजाः ज्योतिः** प्रकाशरूपः **भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ६५ ॥

**अर्थ**—हे हरण करणाऱ्या, पिंगटवर्णाच्या, रक्तनेत्राच्या, परमात्म्या, तूं माझ्यावर कृपा करण्याविषयीं तत्पर हो. मला ज्ञान दे ( अथवा गुरूकडून मला ज्ञानाचा उपदेश करीव ). त्या ज्ञानानें माझे अंतःकरणादि सर्व शुद्ध होवोत. त्यानंतर मी पापरहित, रज व तमोगुणांनीं रहित, झालों म्हणजे माझें मला मूळचें जीवाचें स्वरूप सत्‌चित्‌आनंद असें प्राप्त होईल. मी केलेला होम उत्तम रीतीनें सुख देणारा होवो ॥ ६५ ॥

**पृथिव्यापस्तेजोवायुराकाशा मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयास४ स्वाहा ॥**

**टीका**—**मे पृथिवी आपः तेजः वायुः आकाशाः** एते पंचमहाभूताः तदभिमानिनश्च देवाः **मे** मम शरीराणि **शुध्यंतां** पवित्राः भवंतु । तेन **अहं विपाप्मा** पापरहितः **विरजाः** रजोगुणादिरहितः **ज्योतिः** प्रकाशरूपः **भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ।

**अर्थ**—माझीं पृथिवी, उदक, तेज, वायु, व आकाश हीं पांच महाभूतें व त्यांच्या अभिमानी देवता शुद्ध होवोत. त्यायोगानें मी पाप-

---

१ नलोपश्छांदसः ।

२ उत्पूर्वात् स्थाधातोर्लोट् मध्यमपुरुषैकवचनं ।

३ दाधातो र्लोट्मिमध्यमपुरुषैकवचनं ।

४ भूधातोराशीर्लिङि उत्तमपुरुषैकवचनं ।

रहित आणि रज व तम ह्या गुणांनीं रहित असा होऊन सत्‌चित् व आनंद असें जीवाचें मूळरूप मला प्राप्त होईल. हा होम परमात्म्याला प्रसन्न करणारा होवो ॥

**शब्दस्पर्शरूपरसगंधा मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥**

**टीका—मे शब्दस्पर्शरूपरसगंधाः** शब्दः स्पर्शः रूपं रसः गंधः इमे विषयाः तदभिमानिनश्च देवाः **शुध्यंतां** । तेन **अहं विपाप्मा विरजा ज्योतिः** प्रकाशरूपः **भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—माझे शब्द, स्पर्श, रूप, रस, व गंध हे इंद्रियांचे विषय, व त्यांचे अभिमानी देव, हे शुद्ध होवोत; त्यायोगानें मी पापरहित आणि रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित होऊन प्रकाशरूप होईन. मीं केलेला हा होम देवांना प्रसन्न करणारा होवो ॥

**मनोवाक्कायकर्माणि मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥**

**टीका—मे मनोवाक्कायकर्माणि** मनः इदमित्थंकरिष्यामि इति संकल्परूपं वाक् वचनं कायः देहः कर्म यथोक्तं तथाकरणं एतानि **शुध्यंतां** शुद्धानि भवंतु । तेन **विपाप्मा** पापरहितः विरजाः रजोगुणतमोगुणरहितः **ज्योतिः** प्रकाशरूपः **भूयासं स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—मन म्हणजे हें असें मी करीन असा संकल्प, बोलणें, देह, कर्म म्हणजे जसें सांगितलें तसें करणें, हीं माझीं सर्व पवित्र होवोत. त्यापासून मी पापरहित व रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित असा होऊन मी प्रकाशरूपी होईन. मीं केलेला हा होम देवादिकांना प्रसन्न करणारा होवो.

**अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयास॑ स्वाहा ।**

**टीका**—मे **अव्यक्तभावैः** अस्फुटाभिप्रायैः **अहंकारैः** अहंममतादिभिः अहंममतादयैः **शुध्यंतां** अनेनाज्यहोमेन शुद्धा भवंतु । तेन **अहं विपाप्मा** ज्ञानप्रतिबंधकीभूतपातकरहितः **विरजाः** रजोगुणोपलक्षितपापकारणरजस्तमोगुणरहितः **ज्योतिः** प्रकाशस्वरूपः **भूयासं स्वाहा** ।

**अर्थ**—ज्याचे अभिप्राय स्पष्ट कळत नाहींत असे माझे अहंकार म्हणजे मीपणा व ममता म्हणजे माझेपणा इत्यादि हे ह्या तुपाच्या होमानें शुद्ध होवोत. त्या योगानें मी ज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या पापानें रहित व पापाला कारण असलेल्या रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित असा होऊन प्रकाशरूप होईन. मीं दिलेली आहुति उत्तम असो ।

**आत्मा मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयास॑ स्वाहा ॥**

**टीका**—मे **आत्मा** आत्मनः स्थूल देहः **शुध्यंतां**[3] । तेन **अहं विपाप्मा विरजाः ज्योतिः भूयासं स्वाहा** ।

**अर्थ**—माझा स्थूल देह शुद्ध होवो. त्या योगानें मी पापरहित आणि रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित असा होऊन प्रकाशरूप होईन. मीं केलेला होम उत्तम असो.

**अंतरात्मा मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयास॑ स्वाहा ।**

---

१ तृतीयाप्रथमार्थे ।

२ आत्मादेहे धृतौजीवस्वभावे परमात्मनीतिकोशात् ।

३ बहुवचनं छांदसं ।

**टीका**—**मे अंतरात्मा** अंतस्थाः सूक्ष्मदेहवृत्यादयः **शुध्यंतां । अहं विपाप्मा विरजाः ज्योतिः भूयासं स्वाहा ।**

**अर्थ**—स्थूल देहाच्या आंत असणारा माझा लिंगदेह व धैर्य इत्यादि हे शुद्ध होवोत. त्या योगानें मी पापरहित आणि रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित असा होऊन प्रकाशरूप होईन. मीं केलेला होम उत्तम असो.

**परमात्मा मे शुध्यंतांज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ।**

**टीका**—**मे परमात्मा** देहाद्यपेक्षयाउत्तमाः अंतःकरणजीवादयः **शुध्यंतां । अहं विपाप्मा विरजाः ज्योतिः भूयासं स्वाहा ।**

**अर्थ**—देहादिकांपेक्षां उत्तम असे माझे अंतःकरण जीव इत्यादि हे शुद्ध होवोत. त्या योगानें मी पापरहित आणि रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित असा होऊन प्रकाशरूप होईन. मीं केलेला होम उत्तम होवो.

**क्षुधे स्वाहा । क्षुत्पिपासाय स्वाहा । विविटचै स्वाहा । ऋग्विधानाय स्वाहा । कषोत्काय स्वाहा । क्षुत्पिपासामलं ज्येष्ठामलक्ष्मीर्नाशयाम्यहम् । अभूतिमसमृद्धिं च सर्वान्निर्णुद मे पाप्मानꣳ स्वाहा । अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयमानंदमयमात्मा मे शुध्यंतां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥ ६६ ॥**

**टीका**—अथ क्षुदादिदोषपरिहाराय मंत्रानाह ॥ क्षुध इति ॥ **क्षुधे** क्षुदभिमानिदेवतायै तन्नियामकपरमात्मने च **स्वाहा । क्षुत्पिपासाय** क्षुत्सहितपिपासाय तत्स्छतन्नियामकभगवते **स्वाहा । विविटचै** व्या-

१ विपूर्वविषॢव्याप्तावितिधातोरौणादिके डिप्रत्यये षकारस्य छांदसः टकारः ।

माय विष्णवे **स्वाहा । ऋग्विधानाय** ऋगादिवेदैः मुख्योपास्याय **स्वाहा । कपोत्कायं** असुरादिकषणोत्[२]सुकाय **स्वाहा ।** एताभ्यः सर्वाभ्योदेवताभ्यः सुहुतमस्तु । **क्षुत्पिपासामलं** क्षुत् बुभुक्षा पिपासा पातुमिच्छा ते एव मले असारभूते यस्यास्तां **ज्येष्ठां** समुद्रमथनेप्रथममुत्पन्नां **अभूतिं** अनैश्वर्यं **असमृद्धिं च अलक्ष्मीः** अलक्ष्मीं कलिपत्नीं **अहं** क्षुदादिहोमेन **नाशयामि** । हे परमात्मन् **सर्वान् मे पाप्मानं** पातकं **निर्णुद** परिहर **स्वाहा** इदं हविरादिकं सुहुतमस्तु । मे **अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयं आनंदमयं आत्मा** अन्नमयादिपंचकोशा उपनिषदुक्तास्तन्नियामकाः ब्रह्मरूपातिरिक्ताः तन्नियम्याः शरीरोपादानाः च **शुध्यंतां** शुद्धाभवंतु । **अहं विपाप्मा विरजाः ज्योतिः भूयासं स्वाहा** । एते विरजाहोममंत्राः उपाकर्मसन्यासादौ क्रियमाणहोमार्थाः शुद्धिहेतवः ॥ ६६ ॥

**अर्थ**---[ ह्यापुढें भूक इत्यादि ह्यांचा दोष नाहींसा होण्याकरितां मंत्र सांगतो. ] भुकेच्या अभिमानी देवतेला व त्या देवतेच्या अंतर्यामीं राहाणाऱ्या परमात्म्याला माझा होम सुखकारक होवो. भुकेसहित ताहानेच्या अभिमानी देवतेला व त्यांतील परमात्म्याला हा माझा होम सुखकारक होवो. व्यापक परमात्म्याला, ऋग्वेदांनीं उपासना करण्यास योग्य, असुरादिकांची कंडू शमन करणाऱ्या, अशा ह्या सर्व देवतांना व त्यांच्या अंतर्यामीं असलेल्या परमात्म्याला हा होम सुखकारक होवो. भूक व ताहान हे दोन मल जिच्या जवळ आहेत अशी, समुद्रमथनाचे वेळीं प्रथमतः उत्पन्न झालेली, अनैश्वर्याची अभिमानिनी, असमृद्धिरूप, अशा कलीच्या बायकोला भूक ताहान इत्यादिकांच्या होमानें मी नाश करितों. हे परमात्म्या, तूं आमचे पातकांचा नाश कर. हा केलेला होम सुखकारक होवो. ब्रह्मरूपाहून वेगळे असून त्याच्या आज्ञेंत राहणारे व ज्यांचें उपादान कारण शरीर आहे असे उपनिषदांत सांगितलेले अन्नमय,

---

१ घोषोत्कायेतिपाठे घोषः नामरूपात्मकः प्रपंचः तस्य उत्कः उत्सुकः तस्मै ।
२ कषकर्षण इति धातोः ल्युटप्रत्ययः ।

प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, व आनंदमय हे माझे पांच कोश, त्यांचे अभिमानी देव व त्यांनीं बनलेला हा स्थूल देह हे शुद्ध होवोत. त्या योगानें मी पापरहित आणि रजोगुण व तमोगुण ह्यांनीं रहित होऊन प्रकाशरूप होईन. मीं दिलेली आहुति उत्तम असो. हे विरजा होमाचे मंत्र, श्रावणी सन्यास इत्यादि कर्मांच्या ठिकाणीं होणाऱ्या होमांच्या उपयोगी पडणारे व शुद्धि करणारे असे आहेत ॥ ६६ ॥

**अग्नयेस्वाहा। विश्वेभ्योदेवेभ्यः स्वाहा। ध्रुवाय भूमाय स्वाहा। ध्रुवक्षितये स्वाहा। अच्युतक्षितये स्वाहा। अग्नयेस्विष्टकृते स्वाहा। धर्माय स्वाहा। अधर्माय स्वाहा। अद्भ्यः स्वाहा। ओषधिवनस्पतिभ्यः स्वाहा।**

**टीका—अग्नये** अग्निशब्दवाच्यायाग्न्यंतर्गताय परमात्मने **स्वाहा** सुहुतमस्तु। **विश्वेभ्यः देवेभ्यः** विश्वदेवांतर्यामिभगवद्रूपेभ्यः **स्वाहा। ध्रुवाय भूमाय** अचंचलत्वपूर्णत्वादिना ध्रुवभूमपदाभिधेयाय ध्रुवभूमाख्यदेवतांतर्यामिणे परमात्मने **स्वाहा। ध्रुवक्षितये** ध्रुवा नित्या क्षितिर्भूमिः यस्य तस्मै ध्रुवक्षित्याख्यदेवस्थाय भगवते **स्वाहा। अच्युतक्षितये** अच्युतक्षितिशब्दितदेवनियामकाय भगवते **स्वाहा। स्विष्टकृते** सुसम्यक् इष्टं अभीप्सितं करोतीति तस्मै अग्नये **स्वाहा। धर्माय** धारकत्वात् धर्मशब्दवाच्याय **स्वाहा। अधर्माय** अधर्माभिमानि निर्ऋत्याख्यकोणपगत्वेन अधर्मशब्दितपरमात्मने **स्वाहा। अद्भ्यः** अबभिमानिवरुणबुधांतर्गताय व्याप्ततयाऽप्शब्दिताय वा परमात्मने **स्वाहा। ओषधिवनस्पतिभ्यः** ओषधिवनस्पत्यंतर्गतभगवद्रूपेभ्यः **स्वाहा** सुहुतमस्तु।

**अर्थ**—अग्निशब्दानें प्रतिपादन केलेल्या व अग्नीच्या अंतर्यामीं असलेल्या परमात्म्याला आम्हीं दिलेली आहुति सुखकारक असो. सर्व

१ उष्टाः संसारदवाग्निदग्धाः धीयंते निधीयंतेऽस्मिन्निति ओषधिः।

२ वनषणसंभक्ताविति धातोरस्माद्विभक्तानां भिन्नानां स्वामीति वनस्पतिः।

देवांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या भगवंताच्या रूपांना ही आहुति असो. कधीं चंचल न झाल्यामुळें ध्रुव नांवाच्या व पूर्ण असल्यामुळें भूम नांवाच्या आणि ध्रुवभूमनामक देवतांच्या अंतर्यामीं असणाऱ्या परमात्म्याला ही आहुति असो. ज्याची स्थिति स्थिर आहे अशा व ध्रुवक्षितिनामक देवांच्या असणाऱ्या भगवंताला ही आहुति असो. अच्युत व क्षिति नांवांच्या देवांचें नियमन करणाऱ्या भगवंताला ही आहुति असो. भक्तांचे मनांतील मनोरथ पूर्ण करणाऱ्या अशा अग्निशब्दानें प्रतिपादित परमात्म्याला मीं केलेला होम प्रसन्न करणारा होवो. धारण करितो म्हणून धर्म नांवाचा व धर्माच्या अंतर्यामीं राहणारा अशा भगवंताला ही आहुति असो. अधर्म करणाऱ्या दैत्यांचा नाश करणाऱ्या अधर्म नांवाच्या भगवंताला ही आहुति असो. उदकाभिमानी वरूण व बुध ह्यांचा नियमन करणारा व व्याप्त अशा भगवंताला ही आहुति असो. ओषधि व वनस्पति नांवाचा व त्यांच्या अंतर्यामीं राहणारा अशा परमात्म्याला मीं केलेला होम संतोष करणारा होवो.

**रक्षोदेवजनेभ्यः स्वाहा । गृह्याभ्यः स्वाहा । अवसानेभ्यः स्वाहा । अवसानपतिभ्यः स्वाहा । सर्वभूतेभ्यः स्वाहा । कामाय स्वाहा । अंतरिक्षाय स्वाहा । यदेजति जगति यच्च चेष्टति नाम्नो भागो यन्नाम्ने स्वाहा । पृथिव्यै स्वाहा । अंतरिक्षाय स्वाहा ॥**

**टीका—रक्षोदेवजनेभ्यः** रक्षांसि च देवाश्च जनाश्च रक्षोदेवजनाः तेभ्यः तन्नियामकभगवन्मूर्तिभ्यः **स्वाहा** सुहुतमस्तु । **गृह्याभ्यः** गृहीतुं योग्याभ्यः भगवन्मूर्तिभ्यः **स्वाहा** । **अवसानेभ्यः**[1] क्रियांतनियामकेभ्यः **स्वाहा** । **अवसानपतिभ्यः** अवसानस्वामिभ्यः भगवद्रूपेभ्यः **स्वाहा** । **सर्वभूतेभ्यः** सर्वप्राणिनियामकेभ्यः भगवद्रूपेभ्यः **स्वाहा** । **कामाय** काम-

१ क्रियांता अवसाना इत्युच्यंते ।

गताय भगवते **स्वाहा । अंतरिक्षाय** अंतरीक्षणीयत्वेन तच्छब्दप्रतिपादिताय अंतरिक्षस्थितभगवते **स्वाहा । यत्** यतः भगवतः **एजति** कंपते **यत्** यतः **चेष्टति** भगवत्प्रेरणया स्वस्वव्यापारंकरोति **नाम्नः** तादृशनामाविष्टस्य भगवतः एतत् जगत् **यत्** यो **भागः** अंशः तन्नाम्ने भगवते **स्वाहा । पृथिव्यै** तन्नियामकपरमात्मने **स्वाहा । अंतरिक्षाय** तत्स्थनियामकाय **स्वाहा ॥**

**अर्थ**—राक्षस, देव व लोक ह्यांचें नियमन करणाऱ्या भगवंताच्या मूर्तींना ही आहुति असो. भक्तांनीं आपल्या हृदयकमलामध्यें धारण केलेल्या भगवंताच्या मूर्तींना ही आहुति असो. क्रिया संपविणाऱ्या भगवंताच्या मूर्तींना ही आहुति असो. समाप्तीचें नियमन करणाऱ्या भगवन्मूर्तींना ही आहुति असो. सर्व प्राणिमात्राचें नियमन करणाऱ्या भगवन्मूर्तींना ही आहुति असो. मदनाच्या ( अथवा इच्छेच्या ) अंतर्गत राहणाऱ्या भगवन्मूर्तींना ही आहुति असो. हृदयांत सूक्ष्म रीतीनें जाणण्यास योग्य अशा ( अथवा अंतरिक्षामध्यें राहणाऱ्या ) सर्व भगवंताच्या मूर्तींना मीं दिलेला होम सुख देणारा होवो. ज्या भगवंताच्या आज्ञेनें हें सर्व जग थरथर कापून ज्याच्या आज्ञेनें आपापलें काम करीत आहे अशा नानाप्रकारच्या नांवांनीं युक्त असलेल्या परमात्म्याचा एक अंशमात्र हें जें सर्व जग आहे त्या परमात्म्याला ही आहुति असो. पृथ्वीला नियमन करणाऱ्या परमात्म्याला ही आहुति असो. आकाशांत असून त्याचें नियमन करणाऱ्या परमात्म्याला मीं दिलेला होम सुखकारक होवो.

**दिवे स्वाहा । सूर्याय स्वाहा । चंद्रमसे स्वाहा । नक्षत्रेभ्यः स्वाहा । इंद्राय स्वाहा । बृहस्पतये स्वाहा । प्रजापतये स्वाहा । ब्रम्हणे स्वाहा । स्वधापितृभ्यः स्वाहा । नमो रुद्राय पशुपतये स्वाहा ॥**

**टीका—दिवे** स्वर्गस्थितपरमात्मने **स्वाहा । सूर्याय** विद्वत्प्राप्यत्वात्सूर्यशब्दप्रतिपाद्याय सूर्यांतर्गताय वा **स्वाहा । चंद्रमसे** आनंददातृत्वात्

तच्छद्वप्रतिपादिताय चंद्रांतर्गताय वा **स्वाहा** । **नक्षत्रेभ्यः** नक्षत्रनियामकेभ्यः **स्वाहा** । **इंद्राय** परमैश्वर्यशालिइंद्रशब्दप्रतिपादिताय **स्वाहा** । **बृहस्पतये** बृहतां ब्रम्हादीनां पतये नियामकाय **स्वाहा** । **प्रजापतये** प्रजानां पालनात्तच्छब्दप्रतिपादिताय प्रजापत्यंतर्गताय वा **स्वाहा** । **ब्रम्हणे** गुणपूर्णाय **स्वाहा** । **स्वधापितृभ्यः** पितृदेवतांतर्यामिभ्यः **स्वाहा** । **रुद्राय** रुक्द्रावणात् तच्छद्वप्रतिपादिताय रुद्रांतर्गताय वा **पशुपतये** पशुपतिशब्दिताय पशुपतिनियामकाय वा **नमः स्वाहा** सुहुतमस्तु ॥

**अर्थ**—स्वर्गामध्यें राहाणाऱ्या परमात्म्याला ही आहुति असो. विद्वानांनीं प्राप्त करून घेण्यास योग्य म्हणून सूर्यनामक परमात्म्याला ( अथवा सूर्यांतर्यामीं परमात्म्याला ) ही आहुति असो. आनंद देणारा ह्मणून चंद्र नांवाच्या ( अथवा चंद्राच्या अंतर्यामीं असलेल्या ) परमात्म्याला ही आहुति असो. नक्षत्रांच्या नियामकपरमात्म्याला ही आहुति असो. परम ऐश्वर्य आहे ह्मणून इंद्र नांवाच्या परमात्म्याला ही आहुति असो. ब्रह्मादिकांचा पति आहे म्हणून बृहस्पति नांवाच्या परमात्म्याला ही आहुति असो. प्रजेचें पालन करणारा ह्मणून प्रजापति नांवाच्या परमात्म्याला ही आहुति असो. सर्व गुणांनीं पूर्ण अशा परमात्म्यालाही आहुति असो. पितर देवतांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या परमात्म्याला ही आहुति असो. रुजा ह्मणजे पीडा नाहींशा करणाऱ्या रुद्र नांवाच्या ( अथवा रुद्राच्या अंतर्यामीं असणाऱ्या ) परमात्म्याला ही आहुति असो. पशु म्ह० प्राणिमात्रांचें पालन करणारा म्हणून पशुपति नांवाच्या ( अथवा पशुपतीच्या अंतर्यामीं राहणाऱ्या ) परमात्म्याला मीं दिलेला होम आनंद करणारा होवो ॥

**देवेभ्यः स्वाहा । पितृभ्यः स्वधास्तु । भूतेभ्योनमः । मनुष्येभ्योहंता । प्रजापतये स्वाहा । परमेष्ठिने स्वाहा । यथा कूपः शतधारः सहस्त्रधारो अक्षितः । एवामे अस्तु धान्यꣳ सहस्त्रधारमाक्षितं । धनधान्यै स्वाहा । ये भूताः**

**प्रचरंति दिवानक्तं बलिमिच्छंतो वितुदस्य प्रेष्याः । ते-भ्योबलिं पुष्टिकामोहरामि मयि पुष्टिं पुष्टिपतिर्दधातु स्वाहा ॥ ६७ ॥**

**टीका—देवेभ्यः** ब्रह्मादिदेवेभ्यः तदंतर्यामिभगवद्रूपेभ्यः **स्वाहा । पितृभ्यः** तदंतर्यामिभ्यः **स्वधा अस्तु । भूतेभ्यः** समस्तप्राणिभ्यः प्रमथ-गणेभ्यो वा **नमः** अस्तु । **मनुष्येभ्यः हंता । प्रजापतये** दक्षप्रजापतये **स्वाहा । परमेष्टिने** उत्तमयागइच्छावतेचतुर्मुखांतर्गतपरब्रम्हणे **स्वाहा । यथा कूपः** अंधुः **अक्षितः** अक्षीणः **शतधारः सहस्त्रधारः** भवति **एवं अक्षितं** अक्षीणं सहस्त्रधारंसहस्त्रमुखादायाति यत् धान्यं व्रीह्यादिकं एवं **मे अस्तु । धनधान्यै** धनधान्यदात्र्यै देवतायै **स्वाहा** सुहुतमस्तु । **वितुदस्य** विशेषेणतुदतिव्यथयतीतिवितुदः भूतपतिः तस्य **प्रेष्याः** भृत्याः **दिवानक्तं बलिं इच्छंतः** बलिकामाः **ये भूताः** सर्वत्र **प्रचरंति तेभ्यः** भूतेभ्यः प्रमथगणेभ्यश्च **पुष्टिकामः** वृध्यपेक्षी अहं **बलिं हरामि** बलिहरणं करोमि । तेन बलिदानेन **मयि पुष्टिं** वृद्धिं **पुष्टिपतिः** वृध्यादिप्रदोभगवान् मह्यं **दधातु** प्रयच्छतु **स्वाहा** सुहुतमस्तु ॥ ६७ ॥

**अर्थ**—ब्रह्मादिक देवांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या भगवंताच्या मूर्तींना मीं दिलेला होम सुखप्रद होवो. पितरांना दिलेला होम सुखकारक असो. सर्वप्राणिमात्रांना ( अथवा प्रमथ नांवाचे गणांना ) दिलेला होम सुखप्रद होवो. मनुष्यांकरितां दिलेला होम सुखप्रद होवो. दक्षप्रजापतीला दिलेला होम सुखप्रद होवो. उत्तम रीतीनें यज्ञ करण्याची इच्छा करणाऱ्या ब्रम्हदेवाला ( अथवा ब्रह्मदेवाच्या अंतर्यामीं असलेल्या भगवंताच्या रूपांना ) मीं दिलेला होम सुखप्रद होवो. ज्याप्रमाणें एकादा आड फारच मोठा असला म्हणजे त्याला शेंकडों अथवा हजारों बाजूंकडून झरे चालू असल्यामुळें तो कधीं आटत नाहीं त्याप्रमाणें आम्हाला हजारों बाजूंकडून तांदूळ इत्यादि धान्य मिळो व तें कधीं कमी न होवो. धान्यादिक देणाऱ्या

देवतेला आमचा होम सुखकारक होवो. अत्यंत पीडा देणाऱ्या भूतपतीचे चाकर आपणांस खावयास मिळावें म्हणून रात्रंदिवस इकडे तिकडे संचार करीत असतात; म्हणून त्या चाकरांकरितां ( अथवा प्रमथ नांवाचे गणांकरितां ) मीं दिलेलें बलिहरण सुखप्रद असो, कारण त्यापासून मला पुष्टि व्हावी अशी इच्छा आहे. त्या बलिहरणापासून पुष्टि देणारा भगवान मला पुष्टि देवो. मीं दिलेली आहुति सुखकारक होवो ॥ ६७ ॥

**ॐतद्ब्रम्ह । ॐतद्वायुः । ॐतदात्मा । ॐतत्सत्यं । ॐतत्सर्वं । ॐतत्पुरोर्नमः । अंतश्चरतिभूतेषु गुहायां विश्वमूर्तिषु । त्वं यज्ञस्त्वंवषट्कारस्त्वमिंद्रस्त्वꣳरुद्रस्त्वं विष्णुस्त्वं ब्रह्मत्वं प्रजापतिस्त्वंतदाप आपोज्योतीरसोऽमृतं ब्रम्हभूर्भुवः सुवरोम् ॥ ६८ ॥**

**टीका**—पुनः परमात्मनो नारायणस्य वाय्वादिसर्वांतर्यामित्वसर्वगतत्व महिमानमाह ॥ ॐमिति ॥ ॐ गुणपूर्णं **तत् ब्रम्ह**[1] बृहंतोगुणायस्मिन् । ॐ सर्ववेदप्रतिपाद्यं **तत् वायुः** वाय्वंतर्गतं वायुशब्दवाच्यं वा । ॐ सर्वव्याप्तं **तत् आत्मा** आदानादिकर्ता आत्मशब्दितजीवांतर्गतं वा । ॐ ओंकारप्रतिपाद्यं ब्रह्म **तत् सत्यं** यथार्थवचनादिसद्भावप्रापकं । ॐ गुणपूर्णं **तत् सर्वं** सर्वजगदंतर्यामि सर्वजगत्सर्जकं वा । ॐ **तत् पुरः** स्थूलसूक्ष्मशरीरस्य **नमः** । ननु अत्र परमात्मनः जीवजडाद्यभेदः प्रतीयते सत्तावनुपपन्नः प्रत्यक्षादिबहुप्रमाणविरोधात् अतआह ॥ अंतरिति ॥ **विश्वमूर्तिषु** देवमनुष्यादिनानाशरीरयुक्तेषु **भूतेषु** प्राणिषु **गुहायां अंतः** मध्ये परमात्मा **चरति । त्वं यज्ञः** ज्योतिष्टोमादियज्ञगतः तद्बोक्तृत्वाच्च यज्ञनामा **त्वं वषट्कारः** वषट् इति क्रियमाणत्वात् । **त्वं इंद्रः**[2] परमैश्वर्यात् । **त्वं रुद्रः** रोदयतिसर्वमंतकालइतिरुद्रनामारुद्रांतर्गतः संकर्षणः । **त्वं विष्णुः**

---

१ अथ कस्मादुच्यते ब्रम्हेतिबृहंतोह्यस्मिन्गुणा इति श्रुतेः ।

२ इंद्रः सपरमैश्वर्यादिति ऋग्भाष्योक्तेः ।

व्याप्तः । **त्वं ब्रम्हा** सर्वजनकतयाप्रसिद्धचतुर्मुखगतः ब्रह्मनामा । **त्वं प्रजापतिः** प्रजानां पालकः दक्षादिप्रजापतिगतश्च । **त्वं तत् आपः** आप्नोति सर्वमिति **ज्योतिः** ज्योतीरूपः **रसः** सारोवरश्चेति **अमृतं** मृतिरहितं **ब्रह्म** सर्वप्रकारेणवृद्धं **भुर्भुवः सुवः** तत्तल्लोकव्यापिसर्वमवतिरक्षतीति ॐ आपइत्यादीनिपदानिपरब्रह्मप्रतिपादकानि ॥ ६८ ॥

**अर्थ**—[ आणखी परमात्मा नारायण हा वायु इत्यादि सर्वांच्या आंत असून सर्व व्यापक आहे हा त्याचा महिमा सांगतो. ] ब्रह्म गुणपूर्ण आहे ( अथवा ज्यांत मोठमोठे गुण आहेत असा आहे ) म्हणून त्याला ब्रह्म हें नांव आहे. जें सर्व वेदांनीं प्रतिपाद्य आहे तें वायू देवाच्या अंतर्यामीं नियमन करणारें आहे. जें सर्वव्यापक आहे तें, घेणारें इत्यादि आहे म्हणून आत्मा नांवाचें आहे ( अथवा जिवाच्या अंतर्यामीं नियमन करणारें आहे ). जें खरें बोलवून त्याप्रमाणें आचरण करविणारें आहे तें सत्य नांवाचें आहे. जें सर्व जगाच्या अंतर्यामीं ( अथवा सर्व जगत उत्पन्न करणारें ) आहे तें सर्वनामक आहे. जें स्थूल व सूक्ष्म शरीरांत आहे त्याला नमस्कार असो. [ जर कोणी अशी शंका घेईल कीं, ह्या ऋचांवरून जड व जीव हे आणि परमात्मा हे एक आहेत असें दिसून येतें, परंतु तो अर्थ प्रत्यक्ष श्रुति इत्यादिक प्रमाणांना विरुद्ध आहे, ह्याकरितां समाधान सांगतो. ] परमात्मा प्रत्येक प्राणिमात्रांच्या हृदयरूपीं गुहेमध्यें संचार करितो. तूं ज्योतिष्टोमादि यज्ञांतर्गत असून त्याचा भोक्ता असल्यामुळें यज्ञ नांवाचा आहेस. यज्ञामध्यें याज्ञिकांनीं वषट् शब्द उच्चारून होम देण्यास योग्य असल्यामुळें तूं वषट् नांवाचा आहेस. तूं परमैश्वर्य संपन्न आहेस म्हणून इंद्रांत राहणारा इंद्र नांवाचा आहेस. तूं अंतकालीं सर्वांना रडवितोस म्हणून रुद्र नांवाचा व रुद्रांत असणारा संकर्षण आहेस. तूं व्यापक आहेस म्हणून विष्णु नांवाचा आहेस. सर्व जगत उत्पन्न

---

१ ब्रम्हणि ब्रम्हरूपो साविति वचनात् ।

करणारा असल्यामुळें ब्रह्मदेवाच्या अंतर्यामीं राहाणारा व ब्रह्म नांवाचा आहेस. तूं प्रजांचें पालन करणारा आहेस म्हणून दक्ष इत्यादि प्रजापतींच्या अंतर्यामीं असणारा व प्रजापति नांवाचा आहेस. तूं आप नांवाचा आहेस. सर्वव्यापि, तेजोरूप, श्रेष्ठ, मरणरहित, सर्व प्रकारें वृद्ध असें जें ब्रह्म तें भू इत्यादिक लोकांना व्यापून सर्वांचें रक्षण करितें ॥६८॥

**श्रद्धायां प्राणे निविष्टोमृतं जुहोमि । श्रद्धायामपाने निविष्टोमृतं जुहोमि । श्रद्धायां व्याने निविष्टोऽमृतं जुहोमि । श्रद्धायामुदाने निविष्टोमृतं जुहोमि । श्रद्धायाᳪसमाने निविष्टोऽमृतं जुहोमि । ब्रम्हणिम आत्मामृतत्वाय । अमृतोपस्तरणमसि । श्रद्धायां प्राणे निविष्टोऽमृतं जुहोमि । शिवो मा विशाप्रदाहाय । प्राणाय स्वाहा । श्रद्धायामपाने निविष्टोमृतं जुहोमि । शिवो मा विशाप्रदाहाय । अपानाय स्वाहा । श्रद्धायां व्याने निविष्टोमृतं जुहोमि । शिवो मा विशाप्रदाहाय । व्यानाय स्वाहा । श्रद्धायामुदाने निविष्टोमृतं जुहोमि । शिवो मा विशाप्रदाहाय । उदानाय स्वाहा । श्रद्धायाᳪसमाने निविष्टोमृतं जुहोमि । शिवो मा विशाप्रदाहाय । समानाय स्वाहा । ब्रह्मणि म आत्मामृतत्वाय । अमृता पिधानमसि ॥ ६९ ॥**

**टीका**—भोजनादौतदंते च अपांप्राशनं प्राणस्य वस्त्रबुध्या कार्यं तस्मात्तन्मंत्रानाह ॥ श्रद्धायामिति ॥ हे **अमृत** हे पानीयोदक **त्वं उपस्तरणं** उपरिवस्त्रं **असि** । तस्मात् **श्रद्धायां** श्रद्धाभिमानिन्यां वायुपत्न्यां **प्राणे**

---

१ वाजसनेयके प्राणविद्यायां ।

मुख्यप्राणे च **निविष्टः** अभिनिवेशितांतःकरणोऽहं **अमृतं**[1] अनुयागं वैश्वदेवाख्य होमशेषं भगवद्भुक्तशेषं स्वादुभूतं वा **जुहोमि** आस्ये[2] प्राणाग्नौ[3] वा प्रक्षिपामि । **प्राणाय स्वाहा** प्राणाय सुहुतमस्तु । **श्रद्धायां** आस्तिक्यबुद्धौ **अपाने** अपानवायौ च **निविष्टः** अभिनिवेशितांतःकरणोहं **अमृतं** भगवन्निवेदितं **जुहोमि** आस्ये अपाने वा प्रक्षिपामि । **अपानाय स्वाहा** अपानाय सुहुतमस्तु । **श्रद्धायां** आस्तिक्यबुद्धौ **व्याने** व्यानाख्यवायौ च **निविष्टः** अभिनिवेशितांतःकरणोऽहं **अमृतं** भगवदुच्छिष्टं **जुहोमि** आस्ये व्याने वा क्षिपामि । **व्यानाय स्वाहा** व्यानाय सुहुतमस्तु । **श्रद्धायां** आस्तिक्यबुद्धौ **उदाने** उदानाख्यवायौ च **निविष्टः** अभिनिवेशितांतःकरणोऽहं **अमृतं** भगवन्निवेदितं **जुहोमि** आस्ये उदाने वा क्षिपामि । **उदानाय स्वाहा** । **श्रद्धायां** आस्तिक्यबुद्धौ **समाने** समानाख्यवायौ **निविष्टः** निवेशितांतःकरणोऽहं **अमृतं** भगवन्निवेदितं **जुहोमि** आस्ये समाने वा क्षिपामि । **समानाय स्वाहा** समानाय सुहुतमस्तु । एताभिः प्राणादिपंचाहुतिभिः **मे आत्मा** जीवः **अमृतत्वाय** मोक्षाय **ब्रम्हणि** ब्रह्मनिष्ठः भवति । **श्रद्धायां प्राणे निविष्टः अमृतं जुहोमि । प्राणाय स्वाहा । शिवः** मंगलप्रदः भूत्वा **अप्रदाहाय** क्षुत्पिपासादिदाहपरिहाराय **मा मां आविश** प्रवेशंकुरु । **मे आत्मा** जीवः **ब्रह्मणि** ब्रम्हनिष्ठः **अमृतत्वाय**[4] मोक्षाय भवति । हे **अमृतं** हे प्राश्यमानोदक **त्वं पिधानं**[5] आच्छादनवस्त्ररूपः **असि** ॥ ६९ ॥

**अर्थ**—[ जेवणाच्या पूर्वीं व जेवणानंतर जें पाणी प्यावयाचें तें प्राणाचें वस्त्र आहे असें समजावयाचें. त्याचे मंत्र सांगतो. ] हे पिण्यास

---

१ अमृतं विघसोयज्ञशेषभोजनशेषयोरिति कोशात् ।

२ आस्याहवनीय श्रुत्या आस्यस्य प्राणाहुत्यादिहोमाधारत्वात् ।

३ प्राणाग्नयएवैतस्मिन्पुरेजाग्रत इति अग्नित्वाद्यभिधानात् ।

४ स एनान् ब्रम्हगमयतीति वचनात् ।

५ अपिधानतिरोधानपिधानाच्छादनानिचेति कोशात् ।

योग्य अशा उदका, तूं वरील वस्त्र आहेस. आस्तिक्यबुद्धिरूपी जी मुख्यप्राणाची पत्नी आहे तिच्या ठिकाणीं व मुख्यप्राणाच्या ठिकाणीं मन लावून मी भगवंताचें उष्टें अन्न मुखामध्यें ( अथवा प्राणरूप अग्नीमध्यें टाकतों, ती आहुति प्राणाच्या सुखाकरितां होवो. आस्तिक्यबुद्धीच्या ठिकाणीं व अपान वायूच्या ठिकाणीं मन लावून मी भगवंताला नैवेद्य दाखविलेलें अन्न तोंडांत ( अथवा अपानवायूंत ) टाकतों. ही आहुति अपान वायूच्या सुखाकरितां असो. आस्तिक्यबुद्धीकडे व व्यान वायूकडे मन लावून मी भगवंताला निवेदन केलेलें अन्न तोंडांत घालतों. ही आहुति व्यान वायूच्या सुखाकरितां होवो. आस्तिक्यबुद्धीकडे व उदान वायूकडे मन लावून मी भगवंताचा नैवेद्य आपल्या तोंडांत ( अथवा उदानवायूंत ) टाकतों. ही आहुति उदान वायूच्या सुखाकरितां होवो. आस्तिक्यबुद्धीकडे व समान वायूकडे मन लावून भगवंताचें उष्टें मी आपले तोंडांत ( अथवा समान वायूंत ) टाकतों. ही आहुति समानवायूला सुख देणारी होवो. ह्या पांच आहुतींनीं माझा जीव ब्रह्मज्ञानी होऊन मोक्षास योग्य होवो. हे पिण्यास योग्य असलेल्या उदका, तूं पांघरण्याचें वस्त्र आहेस ॥ ६९ ॥

**श्रद्धायां प्राणे निविश्यामृतꣳ हुतं । प्राणमन्नेनाप्यायस्व । श्रद्धायामपाने निविश्यामृतꣳ हुतं । अपानमन्नेनाप्यायस्व । श्रद्धायां व्याने निविश्यामृतꣳ हुतं । व्यानमन्नेनाप्यायस्व । श्रद्धायामुदाने निविश्यामृतꣳ हुतं । उदानमन्नेनाप्यायस्व । श्रद्धायाꣳसमाने निविश्यामृतꣳ हुतं । समानमन्नेनाप्यायस्व ॥ ७० ॥**

**टीका**—भोजनानंतरं भुक्तान्नानुमंत्रणमंत्रमाह ॥ श्रद्धायामिति ॥ **श्रद्धायां** वेदशास्त्रोक्तं सर्वं सत्यं तदनुष्ठानेन मम प्रयोजनमस्तीति बुद्धिः

श्रद्धा तदभिमानिन्यां मुख्यप्राणपत्न्यां **प्राणे** च **निविश्य** आदरातिशयं कृत्वा **अमृतं** यज्ञादिशेषमन्नं **हुतं**। हे प्राणदेव तेन **अन्नेन प्राण** इंद्रियजातं **आप्यायस्व** तृप्तं कुरु । **श्रद्धायां अपाने** च **निविश्य अमृतं हुतं** । तेन **अन्नेन अपानं आप्यायस्व । श्रद्धायां व्याने** च **निविश्य अमृतं हुतं ।** तेन **अन्नेन व्यानं आप्यायस्व । श्रद्धायां उदाने** च **निविश्य अमृतं हुतं ।** तेन **अन्नेन उदानं आप्यायस्व । श्रद्धायां समाने** च **निविश्य अमृतं हुतं ।** तेन **अन्नेन समानं आप्यायस्व ॥ ७० ॥**

**अर्थ**—[ जेवण झाल्यावर खाल्लेल्या अन्नाचें अभिमंत्रण करण्याचे मंत्र सांगतो. ] वेद व शास्त्र ह्यामध्यें जें सांगितलें आहे तें खरें आहे आणि त्याप्रमाणें वागलें असतां मला फळ मिळणार आहे अशी जी बुद्धि तिला श्रद्धा म्हणतात. तिची जी अभिमानी देवता मुख्यप्राणाची पत्नी आहे, तिचे ठिकाणीं व प्राणाच्या ठिकाणीं अतिशय आदरानें मीं यज्ञांतील बाकी राहिलेल्या अन्नाचें हवन केलें. हे प्राणदेवा, त्या अन्नानें माझ्या इंद्रियगणाला तूं तृप्त कर. मुख्यप्राणाच्या पत्नीच्या ठिकाणीं व अपानवायूच्या ठिकाणीं अतिशय आदरानें मीं यज्ञांतील बाकी राहिलेल्या अन्नाचें हवन केलें. हे अपानदेवा, त्या अन्नानें माझ्या सर्व इंद्रियांना तृप्त कर. मुख्यप्राणाच्या पत्नीच्या ठिकाणीं व व्यानवायूच्या ठिकाणीं अतिशय आदरानें मीं यज्ञांतील बाकी राहिलेल्या अन्नाचें हवन केलें. हे व्यानदेवा, त्या अन्नानें माझ्या सर्व इंद्रियांना तृप्त कर. मुख्यप्राणाच्या पत्नीच्या ठिकाणीं व उदानवायूच्या ठिकाणीं अतिशय आदरानें मीं यज्ञांतील बाकी राहिलेल्या अन्नाचें हवन केलें. हे उदानदेवा, त्या अन्नानें माझ्या सर्व इंद्रियांना तृप्त कर. मुख्यप्राणाच्या पत्नीच्या ठिकाणीं व समानवायूच्या ठिकाणीं अतिशय आदरानें मीं यज्ञांतील बाकी राहिलेल्या अन्नाचें हवन केलें. हे समानदेवा, त्या **अन्नानें माझ्या सर्व इंद्रियांना तृप्त कर ॥ ७० ॥**

**अंगुष्ठमात्रः पुरुषोऽगुष्ठं च समाश्रितः । ईशः सर्वस्य जगतः प्रभुः प्रीणाति विश्वभुक् ॥ ७१ ॥**

**टीका**—पुनर्भुक्तानुमंत्रणमंत्रानाह ॥ अंगुष्ठमात्रइति ॥ **अंगुष्ठमात्रः**[1] अंगुष्ठपरिमितः **पुरुषः** परमात्मा **अंगुष्ठं** तच्छब्देन तत्परिमितहृदयाकाशं च **समाश्रितः** हृत्पद्मगत इत्यर्थः । **सर्वस्य** समस्तस्य **जगतः** प्रपंचस्य **ईशः** स्वामी **विश्वभुक्** सर्वभोक्ता **प्रभुः**[2] समर्थः एतादृशः पुरुषान् **प्रीणाति** तर्पयति ॥ ७१ ॥

**अर्थ**—[ पुनः खाल्लेल्या अन्नाचें अनुमंत्रण करण्याचे मंत्र सांगतो.] अंगठ्या एवढा परमात्मा अंगठ्याएवढ्या हृदयाकाशामध्यें राहिला आहे. हा परमात्मा सर्व प्रपंच्याचा स्वामी, सर्वांचा उपभोग घेणारा, व समर्थ असा आहे. असा परमात्मा सर्वांना तृप्त करितो ॥ ७१ ॥

**वाङ्म आसन् । नसोः प्राणः । अक्ष्योश्चक्षुः । कर्णयोः श्रोत्रं । बाहुवोर्बलं । ऊरुवोरोजः । अरिष्टा विश्वान्यंगानि तनूः । तनु वा मे सह नमस्ते अस्तु मा मा हिꣳसीः ॥ ७२ ॥**

**टीका**—**मे वाक्** वागादयः **आसन्** वचनादिशक्ताः भवंतु । **नसोः प्राणः** प्राणनशक्तिप्रदः । **अक्ष्योः** अक्ष्णोः **चक्षुः** दर्शनशक्तिप्रदः । **कर्णयोः** श्रोत्रयोः **श्रोत्रं** श्रवणशक्तिप्रदः । **बाहुवोः** भुजयोः **बलं** बलप्रदः । **ऊरुवोः** ऊर्वोः **ओजः** गमनशक्तिप्रदः । एतादृशः त्वं **मे तनूः विश्वानि अंगानि** समस्तावयवादीनि **तनुवा सह अरिष्टानि** शुभानि क्षेमयुक्तानीति यावत् कुरु । **ते नमः अस्तु । मा** सांप्रति **मा हिंसीः** ॥ ७२ ॥

---

१ अंगुष्ठमात्रः पुरुषो मध्यआत्मनि तिष्ठति । ईशानो भूतभव्यस्य ततो नविजिगुप्सत इति श्रुत्यंतरसमाख्यानात् ।

२ प्रभुरिति हेतुगर्भविशेषणं ।

**अर्थ**—माझी वाणी इत्यादिही बोलणें इत्यादिविषयीं समर्थ होवोत. नाकपुड्यांना श्वासोश्वास करण्याची शक्ति देणारा, डोळ्यांना पाहाण्याची शक्ति देणारा, कानांना ऐकण्याची शक्ति देणारा, दंडांना बळ देणारा, मांड्यांना चालण्याची शक्ति देणारा, असा तूं माझ्या शरीरासहित सर्व अवयवांना सुखरूप कर. तुला नमस्कार असो. मला मारूं नकोस ॥७२॥

**वयः सुपर्णा उपसेदुरिंद्रं प्रियमेधा ऋषयो नाधमानाः। अपध्वांतमूर्णुहि पूर्धि चक्षुर्मुमुग्ध्यस्मान्निधयेव बध्दान्॥७३॥**

**टीका**—ज्ञानार्थं अज्ञानादिबंधादिनिवृत्यर्थं च ऋषिभिः कृतवेदव्यासप्रार्थनारूपमंत्रमाह ॥ वय इति ॥ **सुपर्णाः** शोभनपक्षोपेताः **वयः** पक्षिरूपाः **प्रियमेधाः** प्रिया मेधा येषां ते **ध्वांतं** अज्ञानाख्यतिमिरं **अपऊर्णुहि** परिहर **चक्षुः** चक्षुशब्दवाच्यं ज्ञानं **पूर्धि** पूरय **निधय इव** पाशेन बद्धान् **अस्मान् मुमुग्धि** मोचय **इति नाधमानाः ऋषयः** कालत्रयदर्शिनः **इंद्रं** इंद्रशब्दवाच्यं व्यासं **उपसेदुः** उपसत्तिं कृतवंतः ॥ ७३ ॥

**अर्थ**—[ अज्ञानादि बंधाची निवृत्ति होऊन ज्ञान प्राप्त होण्याकरितां ऋषींनीं वेदव्यासाची जी प्रार्थना केली तिचा मंत्र सांगतो. ] उत्तम पंखांनीं युक्त, पक्षिरूपी, उत्तम बुद्धिमंत, असे त्रिकालज्ञानी ऋषी, आमचा अज्ञानरूपी अंधःकार दूर करा, उत्तम ज्ञान द्या, मायेच्या पाशानें बांधलेल्या आम्हाला सोडा, अशी प्रार्थना करीत इंद्रनामक वेदव्यासाजवळ गेले ॥ ७३ ॥

**प्राणानां ग्रंथिरसि रुद्रोमाविशांतकः। तेनान्नेनाप्यायस्व ॥ ७४ ॥ नमो रुद्राय विष्णवे मृत्युर्मे पाहि ॥ ७५ ॥**

---

१ सुपर्णाऋषयोव्यासं नाथमानाययुः सदा ध्वांतं निवारयास्माकं मुमुग्धीति च वादिन इति एकादशतात्पर्यवचनात् ।

**टीका**—हृदयस्थपरमात्मप्रार्थनामंत्रमाह ॥ प्राणानामिति ॥ हे हृदयाकाशस्थपरमात्मन् त्वं **प्राणानां** प्राणापानादिमुख्यप्राणरूपाणां नागकृकलादिदासरूपाणां चक्षुरादींद्रियाणां च **ग्रंथिः** आश्रयः **असि** । चत्वं **रुद्रः** रुद्रशब्दवाच्यः असि । त्वं **अंतकः** दुःखाज्ञानादिनाशकः असि । **मा** मा विश मच्छरीरे प्रविष्टोभव । **तेन** प्राणाहुत्यादिपूर्वकं भुक्तेन **अन्नेन आप्यायस्व** वर्धय ॥ ७४ ॥ **रुद्राय** रुद्रशब्दवाच्याय **विष्णवे** परमात्मने **नमः** । त्वं **मे मृत्युः** मृत्युं परिहृत्य मां **पाहि** ॥ ७५ ॥

**अर्थ**—[ हृदयांत असलेल्या परमात्म्याची प्रार्थना करण्याचा मंत्र सांगतो. ] हे हृदयाकाशांत राहाणाऱ्या परमेश्वरा, तूं प्राण अपान इत्यादि मुख्यप्राणरूप नागकृकल इत्यादि दास रूपांचा व चक्षु इत्यादि इंद्रियांचा आश्रय आहेस. तूं रुद्र नांवाचा आहेस. तूं दुःख अज्ञान इत्यादिकांचा नाश करणारा आहेस. तूं माझ्या शरीरांत प्रवेश कर. मी प्राणापानादिकांना आहुति देऊन खाल्लेल्या अन्नानें माझ्या शरीराला पुष्ट कर ॥ ७४ ॥ रुद्र नांवाच्या परमात्म्याला नमस्कार असो. तूं माझ्या मृत्यूचा परिहार करून माझें रक्षण कर ॥ ७५ ॥

**त्वमग्नेद्युभिस्त्वमाशुशुक्षणि स्त्वमद्भ्यस्त्वमश्मनस्परि । त्वं वनेभ्यस्त्वमोषधीभ्यस्त्वंनृणां नृपते जायसे शुचिः ॥ ७६ ॥**

टीका—अथ पुनरन्नयंतर्गतपरमात्मानं स्तौति ॥ त्वमिति ॥ हे **अग्ने त्वं आशुशुक्षणिः** आसम्यक् शुशुक्षणिः शोषणेच्छावान् । **त्वं अद्भ्यः** उदकेभ्यः । **त्वं अश्मनः** अश्मभ्यः पाषाणेभ्यः । **त्वं वनेभ्यः** एकदेशस्थनानावृक्षसमुदायेभ्यः । **त्वं ओषधीभ्यः** । **त्वं द्युभिः** कांतिभिः आधिकः । **नृपते** हे मनुष्योपलक्षितसर्वस्वामिन् **त्वं** नृणां **शुचिः** शुद्धिप्रदः **जायसे** अतः ममापि शुद्धिं देहि ॥ ७६ ॥

**अर्थ**—[ आतां पुनः अग्नीच्या अंतर्यामीं राहाणाऱ्या परमात्म्याचें स्तवन करितो. ] हे अग्निस्थपरमात्म्या, तूं फारच उत्तम ( अथवा लवकर ) शुष्क करणारा आहेस. तूं पाण्यापेक्षां, दगडापेक्षां, नानाप्रकारच्या वृक्षांपेक्षां, ओषधींपेक्षां, कांतीनें अधिक आहेस. हे मनुष्य इत्यादिकांचा स्वामी असणाऱ्या परमेश्वरा, तूं मनुष्यांना शुद्ध करणारा आहेस, म्हणून मला शुद्ध कर ॥ ७६ ॥

**शिवेन मे संतिष्ठस्व स्योनेन मे संतिष्ठस्व सुभूतेन मे संतिष्ठस्व ब्रम्हवर्चसेन मे संतिष्ठस्व यज्ञस्यर्ध्दिमनुसंतिष्ठस्वोपतेयज्ञनमउपते नमउपते नमः ॥ ७७ ॥**

**टीका**—अथ यज्ञनामानं विष्णुं नमस्कृत्य स्वाभीष्टमर्थयते ॥ शिवेनेति ॥ हे **यज्ञ** यज्ञनामकपरमेश्वर **शिवेन** कल्याणेन सह **मे** मयि **संतिष्ठस्व** सम्यक् स्थितः भव । **स्योनेन** सुखेन **मे** मयि **संतिष्ठस्व** । **सुभूतेन** शोभनेन विप्रादिजन्मना **मे संतिष्ठस्व** । **ब्रम्हवर्चसेन**[2] ब्रम्हवर्चसं **मे** मयि **संतिष्ठस्व** स्थापय । **यज्ञस्य ऋध्दिं** देवपूजाभिवृध्दिं **संतिष्ठस्व** मयिस्थिरांकुरु । **उपते**[3] उः शंभुः तत्पते तत्स्वामिन् **यज्ञ** यज्ञनामक **उपते** उपशब्दाधिकहरे **उप** समीपे विद्यमानाय **ते नमः नमः**[4] ॥ ७७ ॥

**अर्थ**—[ आतां यज्ञनामक विष्णूला नमस्कार करून आपल्याला जें पाहिजे तें मागतो. ] हे यज्ञनामक परमेश्वरा, माझें कल्याण करण्याकरितां माझेजवळ राहा. माझ्या सुखाकरितां माझे ठिकाणीं राहा. ब्राम्हणादि उत्तम जन्म देऊन माझ्या ठिकाणीं राहा. माझे ठिकाणीं ब्रम्हज्ञान स्थापन कर.

---

१ तथाच श्रुतिः यज्ञोवैविष्णुरिति ।

२ विभक्तिव्यत्ययश्छांदसः ।

३ उकारः शंकरः प्रोक्तइति शब्दानुशासनात् ।

४ नमइति बहुवारोक्तिरादरार्था ।

देवपूजेची वृद्धि माझे ठिकाणीं स्थिर कर. शंकराचेंही पालन करणाऱ्या यज्ञनामक परमेश्वरा, शंकराहून अधिक असणाऱ्या व जवळ असणाऱ्या परमेश्वरा, तुला माझा नमस्कार असो ॥ ७७ ॥

**सत्यं परं पर॑ सत्य॑ सत्येन न सुवर्गाल्लोकाच्च्यवंते कदाचन सता॑ हि सत्यं तस्मात्सत्ये रमंते ।**

**टीका**—योग्यानां मुमुक्षूणां ज्ञानादिसाधनमत्रमंत्रउक्त्वा उक्तधर्मापेक्षया कृत्युत्तमत्वं संन्यासधर्मस्य वक्तुं सत्याद्युत्तमत्वमाह ॥ सत्यं परमिति ॥ **सत्यं** प्रमाणदृष्टार्थस्य यथावद्वचनं **परं** ज्ञानसाधनेषूत्कृष्टं **परं** परं ब्रम्ह **सत्यं**[1] सद्भावप्रापकत्वात् **सत्येन** यथार्थवचनेन परब्रह्मण अधमप्रसादेन **सुवर्गात् लोकात्** स्वर्गलोकात् **कदाचन** कदाचिदपि **न च्यवंते** नभ्रश्यंति । **हि** यस्मात् कारणात् **सतां** सज्जनानां एव **सत्यं** सत्यवचनं ब्रम्हप्रसादश्च **तस्मात् सत्यं** एव ज्ञानद्वारा मोक्षसाधनं । तत्र **सत्ये** केचन **रमंते** तद्युक्ताः भवंति ॥

**अर्थ**—[ मुक्तीची इच्छा करणाऱ्या योग्य मनुष्यांना ज्ञानादि साधनें या मंत्रामध्यें सांगून सांगितलेल्या धर्मापेक्षां संन्यासधर्मच श्रेष्ठ आहे असें सांगण्याकरितां सत्य इत्यादिकांचा उत्तमपणा सांगतो. ] प्रमाणानें सिद्ध केलेल्या वचनाप्रमाणें बोलणें हें सत्य वचन आहे. हें सत्यच परब्रम्हाची प्राप्ति करून देणाऱ्या साधनांमध्यें उत्कृष्ट आहे. परमात्म्याच्या अधमप्रसादापासूनच स्वर्गलोकीं जातात व तेथून कधीं परत येत नाहींत. कारण सज्जनांचें जें बोलणें तेंच सत्यवचन व तोच परमात्म्याचा

---

१ आदरातिशयजननाय परं सत्यमिति द्विर्वचनं ।

२ प्रसादात्त्वधमाद्विष्णोः स्वर्गलोकः प्रकीर्तित इति स्मृतेः ।

३ रमुक्रीडायामित्यस्माद्धातोर्लङात्मनेपदं ।

प्रसाद. म्हणून सत्य हें ज्ञानद्वारां मोक्षाचें साधन आहे. म्हणून किती एक अधिकारी सत्याचे ठिकाणीं रमतात. म्हणजे नेहमीं सत्ययुक्त आचरण करितात.

**तपइति तपो नानशनात्परं यद्धि परं तपस्तद्दुर्धर्षं तद्दुराधर्षं तस्मात्तपसि रमंते**

**टीका**—एकं मंत्रमुक्त्वा द्वितीयं मंत्रमाह ॥ तपइति ॥ **तपः** तीर्थयात्रादिरूपाणि बहूनि संति तथापि **अनशनात्** कृच्छ्रचांद्रायणादिरूपात् एकादश्युपवासादिकात् **परं तपः नास्ति । यत् हि** एकादश्युपवासादिअनशनं **तपः तत् दुर्धर्षं** दुःखेनापिसोढुमशक्यं **तत्** एव **दुराधर्षं** दुःखेनापि आसम्यक् सोढुमशक्यं । **तस्मात्** हेतोः केचन **तपसि** अनशनरूपेतपसि **रमंते** आनंदंति ॥

**अर्थ**—[ एक मंत्र सांगून दुसरा मंत्र सांगतो. ] तीर्थयात्रा करणें इत्यादि पुष्कळ तपें आहेत. परंतु कृच्छ्रचांद्रायण इत्यादि व एकादशीस उपवास करणें इत्यादि तपांपेक्षां उत्तम तप नाहीं. कारण एकादशीचा उपवास व कृच्छ्रचांद्रायणें हीं तपें करणें फारच दुःखाचें आहे. म्हणून किती एक योग्य अधिकारी असें तप ज्ञानसाधन समजून त्यामध्यें रमतात.

**दम इति नियतं ब्रम्हचारिणस्तस्माद्दमे रमंते शम इत्यरण्ये मुनयस्तस्माच्छमे रमंते दानमिति सर्वाणि भूतानि प्रशꣳसंति दानान्नातिदुश्चरं तस्माद्दाने रमंते**

**टीका**—तृतीयं मंत्रमाह ॥ दमइति ॥ **दमः**[1] वागादींद्रियाणां विषयेभ्योनिग्रहः स एवोत्तमोज्ञानद्वारा मोक्षसाधनेष्विति मन्यमानाः **ब्रम्हचारिणः** नैष्ठिकब्रम्हचारिणः **इति नियतं** सर्वदा कुर्वंति । **तस्मात्** केचनाधिकारि-

---

१ दमइंद्रियनिग्रहइति वचनात ।

णः **दमे रमंते** । चतुर्थं मंत्रमाह ॥ शमइति ॥ **शमः** अंतःकरणस्य क्रोधादिदोषराहित्यं बुद्धेर्भगवन्निष्ठता च स एवज्ञानद्वारामोक्षसाधनेषूत्तमः **इति अरण्ये** वानप्रस्थाश्रमिणः **मुनयः** मन्यंते । **तस्मात्** ते **शमे रमंते** । पंचमं मंत्रमाह ॥ दानमिति ॥ **दानं** गोभूहिरण्यादीनां स्वयिानांस्वस्वत्वत्यागपूर्वकंपरस्वत्वोत्पादनं तदेव ज्ञानद्वारा मुक्तौ प्रधानसाधनमिति **सर्वाणि भूतानि** सर्वे प्राणिनः **प्रशंसंति** स्तुवंति । **दानात्** दानापेक्षया **अतिदुःश्चरं** अतिशयेन दुष्करं अन्यत् तपः **न** अस्ति । धनार्थं प्राणानपि दुस्त्यजान् त्यजंति[2] । **तस्मात्** केचन **दाने रमंते**

**अर्थ**—[ तिसरा मंत्र सांगतो. ] वाणी नाक इत्यादिक इंद्रियांना आपआपल्या विषयापासून आवरून धरणें ह्यास दम म्हणतात. हाच दम ज्ञानाच्या द्वारानें मोक्ष मिळविण्याचें उत्तम असें समजणारे ब्रम्हचारी निरंतर दमरूप तप करितात. म्हणून किती एक अधिकारी इंद्रियनिग्रहच मुख्य तप समजून त्यामध्येंच रमतात. [ चवथा मंत्र सांगतो. ] अंतःकरणामध्यें क्रोधादिकांचा उद्भव न होऊं देतां एकसारखी शांति राखणें व भगवंताचे ठिकाणीं एकनिष्ठ बुद्धि ठेवणें ह्यास शम म्हणतात. हाच शम ज्ञानद्वारा मोक्षाचें उत्तम साधन आहे. म्हणून अरण्यांत राहाणारे वानप्रस्थाश्रमी मुनी शमरूप तपामध्येंच रमतात. [ पांचवा मंत्र सांगतो. ] गाय, जमीन, सोनें इत्यादि आपले पदार्थ ह्यांवरील आपली मालकी सोडून त्यावर दुसऱ्याची मालकी उत्पन्न करणें ह्यास दान म्हणतात. हेंच दानरूप तप ज्ञानद्वारा मोक्षाचें उत्तम साधन आहे. म्हणून दान करणें फारच कठिण आहे अशी त्याची स्तुति करतात. कारण असा नियम आहे कीं, मनुष्य द्रव्याकरितां आपले प्राणसुद्धां खर्च करितात. म्हणून किती एक अधिकारी दानामध्येंच रमतात.

---

१ शमोमन्निष्ठताबुद्धेरिति वचनात् ।

२ यंक्रीणात्यसुभिः प्रेष्ठैस्तस्करः सेवकोवणिगित्युक्तेः ।

**धर्म इति धर्मेण सर्वमिदं परिगृहीतं धर्मान्नातिदुष्करं तस्मात्धर्मे रमंते प्रजन इति भूयाꣳसस्तस्माद्भूयिष्ठाः प्रजायंते तस्माद्भूयिष्ठाः प्रजनने रमंतेऽग्नय इत्याह तस्मादग्नय आधातव्या अग्निहोत्रमित्याह तस्मादग्निहोत्रे रमंते**

**टीका**—षष्ठं मंत्रमाह ॥ धर्मइति ॥ **धर्मः** श्रुतिस्मृतिपुराणादिविहितः स्नानसंध्याजपपूर्तारामनिर्माणादिरूपः ज्ञानद्वारा मोक्षसाधनं **इति** धनिनः **मन्यंते । धर्मेण इदं सर्वं** जगत् **परिगृहीतं भवति ।** तादृशः **धर्मात्** अन्यत् **अतिदुष्करं न** नास्ति । **तस्मात्** धार्मिकाः **धर्मे रमंते ।** सप्तमं मंत्रमाह ॥ प्रजनइति ॥ **प्रजनं**[1] धर्मपत्न्यामपत्योत्पादनं धर्मज्ञानद्वारापवर्गादिसाधनं **इति भूयांसः** बहवः पंडिताः मन्यंते । **तस्मात्** एकैकस्य **भूयिष्ठाः** बहवः **प्रजायंते**[2] प्रजां इच्छंति । **तस्मात् भूयिष्ठाः** जनाः **प्रजनने** अपत्योत्पादने **रमंते ।** अष्टमं मंत्रमाह ॥ अग्नय इति ॥ **अग्नयः** गार्हपत्यादयः ज्ञानद्वारा मोक्षसाधनं **इति** कश्चित्कर्मनिष्ठआह । **तस्मात्** गृहस्थैः **अग्नयः आधातव्याः** आधानेनसंस्कर्तव्याः । तस्मात् केचन अग्निषु रमंते । नवमं मंत्रमाह ॥ अग्निहोत्रमिति ॥ **अग्निहोत्रं**[3] ज्ञानद्वारामोक्षसाधनं **इति** जनः **आह । तस्मात् अग्निहोत्रे** सायंप्रातश्चानुष्ठेयहोमे तदुत्तमं ज्ञानद्वारा मोक्षसाधनं **इति** हेतोः केचित् याज्ञिकाः **रमंते**

**अर्थ**—[ सहावा मंत्र सांगतो. ] वेद, स्मृति व पुराण इत्यादिकांमध्यें सांगितलेला, स्नान, संध्या, जप, तप, विहिरी, तलाव, बाग, इत्यादि

---

१ नापुत्रस्य लोकोस्तीति श्रुतेः । सर्वैरप्यतिशयेन पुत्रार्थं प्रयत्यते च ।

२ यष्टव्या बहवः पुत्रायद्येकोपि गयां व्रजेदिति स्मृतेः ।

३ अग्निहोत्रं नाम आहितेष्वग्निषु सायंप्रातश्चानुष्ठेयो होमः ।

करणें, हा धर्म ज्ञान देऊन मोक्ष देणारा आहे असें पैकेवालें लोक मानितात. ह्या धर्मानेंच सर्व जगत चाललें आहे. ह्या धर्माहून दुसरें कोणतेंच तप कठिण नाहीं. धार्मिक लोक ह्या धर्मामध्येंच रमतात. [ सातवा मंत्र सांगतो. ] धर्मपत्नीचे ठिकाणीं संतति उत्पन्न करणें हेंच ज्ञान देऊन मोक्ष देणारें आहे असें पुष्कळ पंडित मानतात. म्हणून पुष्कळ विद्वान् लोक पुत्र व्हावा अशी इच्छा करतात. ह्यास्तव पुष्कळ लोक पुत्र करण्यामध्यें रमतात. [ आठवा मंत्र सांगतो. ] गार्हपत्यादिक अग्नीची सेवा केली तर त्यापासून ज्ञान होऊन मोक्ष होतो असें कोणी म्हणतात. म्हणून गृहस्थलोक अग्नींची सेवा करतात व त्यामध्येंच रमतात. [ नववा मंत्र सांगतो. ] अग्निहोत्र हें ज्ञान देऊन मोक्ष देणारें आहे असें कोणी कर्मनिष्ठ म्हणतो. म्हणून कित्येक याज्ञिकी लोक अग्निहोत्रामध्यें रमतात.

**यज्ञ इति यज्ञो हि देवास्तस्माद्यज्ञे रमंते मानसमिति विद्वाꣳसस्तस्माद्विद्वाꣳस एव मानसे रमंते न्यास इति ब्रम्हा बम्हाहिपरः परोहिब्रम्हातानि वा एतान्यवराणिपराꣳसिन्यासएवात्यरेचयद्य एवं वेदेत्युपनिषत् ॥ ७८ ॥**

**टीका**—दशमं मंत्रमाह ॥ यज्ञइति ॥ **यज्ञः** दर्शपूर्णमासज्योतिष्टोमादिकोयज्ञः उत्तमो हेतुः **इति** अपरे मन्यंते । **हि** यस्मात् **यज्ञः** देवानां प्रियोऽस्ति तस्मादिदानींतनाअपि **देवाः** पूर्वानुष्ठितेन यज्ञेन **दिवंगताः** स्वर्गलोकं प्राप्ताः । तस्मात्केचन वैदिकाः **यज्ञे रमंते** । एकादशं मंत्रमाह ॥ मानसमिति ॥ **मानसं** मनसैव निष्पाद्यं ध्यानादि तदेवोत्तमं साधनं **इति** मन्यंते । तस्मात् केचन **विद्वांसः एव** योगिन एव **मानसे**[1] उपासनादावेव **रमंते** । यद्वा मानसं मनः प्रणिधानं भगवति मनसः प्रणिधानमिति यावत् । विद्वांसः ज्ञानिनः विनयादिकं उत्तमं साधनं **इति** मन्यंते । द्वादशं

---

१ ध्यानं मानसीक्रियेति वचनात् ।

मंत्रमाह ॥ न्यासइति ॥ **न्यासः** सन्यासः कर्मकांडोक्ताशेषकर्मणां संगफलत्यागपूर्वकभगवदर्पणबुध्याऽनुष्ठानं निवृत्तकर्मानुष्ठानमिति यावत् सएवोत्तमः ज्ञानद्वारा मोक्षहेतुः **इति ब्रम्हा** चतुर्मुखोमन्यते। स च **ब्रम्हा परः** परब्रम्हणोन्यः **हि। ब्रम्हा परः हि**[2] यानि पूर्वोक्तसत्यादीनि मानसांतानि एकादशसाधनानि **तानि परांसि** पराणि उक्तानि तानि सन्यासापेक्षया **अवराणि** निकृष्टानि **वै** निश्चयेन। **न्यासः** संन्यासः **एव तानि** साधनानि **अत्यरेचयत्** अतिक्रांतवान् साधनतारतम्यविश्रांत्याधिष्ठानमित्यर्थः। **यः एवं** संन्यासस्यभगवदर्पणबुद्ध्यानिवृत्तकर्मानुष्ठानस्योत्तमत्वं **वेद** जानाति **इति उपनिषत्** तदत्यंतरहस्यं ॥ ७८ ॥

**अर्थ**—[ दाहावा मंत्र सांगतो. ] दुसरे लोक असें मानितात कीं, पौर्णिमा व अमावास्या ह्या दिवशीं यज्ञ करणें व ज्योतिष्टोम इत्यादि यज्ञ करणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे. कारण यज्ञ हा देवांना आवडतो. म्हणून आतांचे देवही पूर्वी केलेल्या यज्ञानें स्वर्गलोकाला गेले. म्हणून कित्येक वेद जाणणारे यज्ञाचे ठिकाणीं रमतात. [ अकरावा मंत्र सांगतो. ] कांहीं योगी ध्यान इत्यादि हें मोक्षाचें उत्तम साधन आहे असें मानितात. म्हणून ते ध्यान इत्यादिकांच्या ठिकाणीं रमतात. ( अथवा भगवंताच्या ठिकाणीं मन लावितात ). [ बारावा मंत्र सांगतो. ] कर्मकांडांत सांगितलेल्या सर्व कर्मांच्या कर्त्तेपणाचा अभिमान व फळ हीं टाकून तीं कर्मे भगवंताला अर्पण करण्याच्या बुद्धीनें करणें ह्यास संन्यास म्हणतात. हा संन्यास ज्ञानद्वारा मोक्षाचें उत्तम साधन आहे असें ब्रह्मदेव मानितो. तो ब्रम्हदेव परमात्म्याहून निराळा आहे. सत्यापासून ध्यानापर्यंत जीं अकरा साधनें पूर्वीं सांगितलीं तीं उत्कृष्ट आहेत. तथापि

---

१ काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासः कवयोविदुरिति गीतासु (अ० १८ श्लो० २)।

२ पुनरुक्तिःशब्दार्थे।

तीं सन्यासापेक्षां कनिष्ठ आहेत. त्या सर्वांहून संन्यास हाच उत्तम साधन आहे. असें जो जाणतो ( तो मोक्षास जातो ). हें उपनिषदाचें मुख्य तात्पर्य आहे ॥ ७८ ॥

**प्राजापत्योहारुणिः सुपर्णेयः प्रजापतिं पितरमुपससा-र किं भगवंतः परमं वदंति तस्मै प्रोवाच सत्येन वा-युरावाति सत्येनादित्यो रोचते दिवि सत्यं वाचः प्रतिष्ठा सत्ये सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्सत्यं परमं वदंति**

**टीका**—पूर्वोक्तं साधनजातं प्रपंचेनोपपादयितुं आख्यायिकामाह ॥ प्राजापत्यइति ॥ **प्राजापत्यः** प्रजापतेरपत्यं **आरुणिः** नामतः **सुपर्णेयः** सुपर्णायास्त्रियअपत्यं एतादृशः ऋषिः **पितरं** स्वजनकं **प्रजापतिं उप-ससार** उत्तमज्ञानबुभुत्सया उपसन्नः । **भगवंतः** स्वोचितज्ञानादि-संपन्नाः महाऋषयः **परमं** ज्ञानसाधनेषु उत्तमं साधनं **किं वदंति** इति तत्वं ब्रूहि **ह** प्रसिद्धं । **तस्मै** पृष्टवते **वायुः** भूताभिमानी **सत्येन** सद्भाव-प्रापकेण परमात्मना तदनुग्रहापादितसत्यवचनयथार्थविज्ञानादिना दे-वत्वं प्राप्य लोकानुग्रहाय भगवद्भीत्या[1] **आवाति** । तथा **आदित्यः** पूर्वोक्तसत्येन **दिवि** आकाशे **रोचते** प्रकाशते । **सत्यं** परब्रम्हसत्य-वचनं च **वाचः** वागुपलक्षितसर्वेंद्रियाणां **प्रतिष्ठा** स्थिरत्वापादकं अनृत-स्य दूष्यमाणत्वात् **सत्ये** तन्नियामकभगवति च **सर्वं प्रतिष्ठितं** । **तस्मात् सत्यं परमं** उत्तमसाधनं इति सत्यरताः हरिश्चंद्रादयः **वदंति** इति प्रजापतिः **प्रोवाच**

**अर्थ**—[ पूर्वीं सांगितलेलीं साधनें विस्तारानें सांगण्याकरितां एक गोष्ट सांगतो. ] सुपर्णा नांवाची आई व प्रजापति नांवाचा बाप त्यापासून झालेला आरुणि नांवाचा ऋषि आपला बाप प्रजापति ह्याकडे तत्वज्ञान

---

१ तथा च श्रुतिः भीषास्माद्वातः पवते भीषोदेति सूर्यइति ब्रह्मवल्ल्यां ।

मिळण्याच्या इच्छेनें जाऊन त्यानें विचारिलें कीं, पूर्वींचे जे मोठमोठे ज्ञानी आपापल्या योग्यतेनुरूप ज्ञान मिळवून मुक्त होऊन गेले त्यांनीं ज्ञानद्वारा मोक्ष मिळण्याकरितां उत्तम साधन कोणतें सांगितलें आहे तें तुम्ही मला सांगा. मग त्या प्रश्न करणाऱ्या पुत्राला बापानें असें सांगितलें कीं, भूतांचा अभिमानी वायू, मोक्षाला नेणाऱ्या सत्यनामक परमात्म्याच्या कृपेनें यथार्थ ज्ञान इत्यादिकांच्या योगानें व सत्य बोलण्यानें देवपणा पावून लोकांवर कृपा करण्याकरितां भगवंताच्या भयानें वाहात आहे; त्याप्रमाणें सूर्यही आकाशामध्यें परमेश्वराच्या कृपेनें यथार्थ ज्ञानादिकांच्या योगानें व सत्य बोलण्यानें प्रकाशत आहे; सत्यनामक परमात्मा हाच वाणी इत्यादि सर्व इंद्रियांना स्थिरपणा देणारा आहे, कारण खोटें बोलणें हें फार दोषयुक्त आहे. सत्यनामक परमात्म्यावर सर्व जगत अवलंबून आहे, म्हणून सत्य हेंच मुख्य साधन आहे. सत्यपणानें वागणारे हरिश्चंद्र इत्यादिक राजे असें मानून त्याप्रमाणें आचरण करतात.

**तपसादेवादेवतामग्र आयन्तपसऋषयः सुवरन्वविंदन्तपसासपत्नान्प्रणुदामारातीस्तपसि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्तपः परमं वदंति**

**टीका**—अथ द्वितीयसाधनं प्रपंचयति ॥ तपसेति ॥ **देवाः** इंद्रादयः **अग्रे** सृष्टिकाले **तपसा** कृच्छ्रचांद्रायणादिना विद्यया च **देवतां** देवत्वं **आयन्** प्राप्ताः तथा **ऋषयः** महर्षयः **तपसा** स्वानुष्ठितेन तपसा आलोचनरूपजिज्ञासया **सुवः** स्वर्गं **अन्वविंदन्** क्रमेण लब्धवंतः । तथा इदानीमपि शत्रुपराजयार्थं **तपसा** जपादिना **सपत्नान् अरातीः** शत्रून् लाभविरोधिनः **प्रणुदाम** नाशयाम । **तपसि** भगवद्विषयकृच्छ्रचांद्रायणै-

---

१ तथाच सूत्रं तदुपर्यपि बादरायणः संभवादिति,

कादश्युपवासरूपानशनरूपे तपसि **सर्वं** अपेक्षितं फलं **प्रतिष्ठितं**। **तस्मात्** हेतोः **तपः परमं** मुक्तेः साधनं **इति** तापसाः **वदंति**।

**अर्थ**—[ दुसरें साधन विस्तारानें सांगतो. ] सृष्टीच्या पूर्वीं इंद्रादिक देवांनीं कृच्छ व चांद्रायण इत्यादिक तपश्चर्या करून व ज्ञान मिळवून त्यांना देवपणा मिळाला. त्याप्रमाणें मोठ्या मोठ्या ऋषींनीं उत्तम प्रकारचें तप व आत्मज्ञान ह्यांच्या योगानें आपापले अधिकार मिळवून ते स्वर्गलोकीं गेले. तसेंच आतांसुद्धां जप, अनुष्ठान इत्यादि तपेंकरून आम्ही आपल्या शत्रूंचा व लाभाला आड येणाऱ्यांचा नाश करितों. भगवंताच्या उद्देशानें केलेलें कृच्छ्रचांद्रायण, एकादशीचा उपवास व निराहार करणें इत्यादि तपामध्यें सर्व पाहिजे असलेलें फळ मिळतें. म्हणून तपच मुक्तीचें फार मोठें साधन आहे असें तपश्चर्या करणारे लोक म्हणतात.

**दमेन दांताः किल्बिषमवधून्वंति दमेन ब्रम्हचारिणः सुवरगच्छन्दमोभूतानां दुराधर्षं दमेसर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दमः परमं वदंति**

**टीका**—तत्रापरितुष्टस्यारुणेस्तृतीयं साधनं प्रपंचयति ।।दमेनेति।। **दांताः** निगृहीतेंद्रियाः ब्रम्हचारिणः **दमेन** इंद्रियनिग्रहादिना **किल्बिषं** पापं **अवधून्वंति** विनाशयंति । तथा **ब्रम्हचारिणः दमेन सुवः** स्वर्गं **अगच्छन्** सः **दमः भूतानां** पामराणां **दुराधर्षं** दुःखेन सोढुमशक्यं तादृशे **दमे सर्वं** अपेक्षितं फलं **प्रतिष्ठितं** । **तस्मात्** कारणात् **दमः परमं** ज्ञानद्वारा मुक्तिसाधनेषु परमं श्रेष्ठं **इति वदंति**।

**अर्थ**—[ तप हें मुक्तीचें मुख्य साधन आहे असें सांगितल्यावरही आरुणीला संतोष वाटला नाहीं ह्याकरितां तिसरें साधन विस्तार करून सांगतो. ] इंद्रियांचा निग्रह करणारे मोठमोठे शुकाचार्यासारखे ब्रम्हचारी ह्यांनीं दमानें म्हणजे इंद्रियनिग्रहानें आपल्या सर्व पातकांचा नाश केला.

ते दमानें स्वर्गलोकीं गेले. दम म्हणजे इंद्रियनिग्रह करणें हें काम कांहीं साधारण मनुष्याचे हातून होण्यासारखें नाहीं. इतका श्रमसाध्य दम आहे म्हणून त्या दमापासून पाहिजे तो पदार्थ मिळतो. म्हणून इंद्रिय-निग्रह हाच ज्ञानद्वारा मुक्तीचें मुख्य साधन आहे असें विद्वान् लोक म्हणतात.

**शमेन शांताः शिवमाचरंति शमेन नाकं मुनयोऽन्वविंदन्छमोभूतानां दुराधर्षं छमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माच्छमः परमं वदंति**

**टीका**—तत्राप्यपरितोषात्तुरीयं साधनं सप्रपंचमाह ॥ शमेनेति ॥ **शांताः** अक्रोधनाः **शमेन** भगवन्निष्ठबुध्या पुंसां **शिवं** मंगलं **आचरंति ।** तथा **मुनयः** मननशीलाः **शमेन नाकं** स्वर्गं **अन्वविंदन्** प्राप्ताः । **शमः भूतानां दुराधर्षं** दुःखेनसोढुमशक्यं । **शमे सर्वं** अपेक्षितं **प्रतिष्ठितं । तस्मात्** हेतोः **शमः परमं** मुक्तेः मुख्यसाधनं इति **वदंति**

**अर्थ**—[ इंद्रियांचा निग्रह हा मुख्य साधन आहे असें सांगितलें तरी सुद्धां आरुणींचा संतोष झाला नाहीं, ह्याकरितां चवथें साधन विस्तारानें सांगतों. ] क्रोधाच्या सपाट्यांत न सांपडणारे म्हणजे शांत ऋषि हे भगवंताच्या ठिकाणीं बुद्धि ठेवून आपलें कल्याण होईल असें वागतात. मुनि शांतीनें म्हणजे भगवंताच्या ठिकाणीं एकानिष्ठा ठेविल्यानें स्वर्गलोकीं गेले. शांति बाळगणें हें प्राणिमात्रांना फारच कठिण आहे. शांति ही पाहिजेत ते पदार्थ देणारी आहे. म्हणून शांति ही मोक्षाचें उत्तम साधन आहे असें म्हणतात.

**दानं यज्ञानां वरूथं दक्षिणा लोके दातारᳵ सर्वभूतान्युपजीवंति दानेनारातीरपानुदंत दानेन द्विषंतोमित्रा भवंति दाने सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दानं परमं वदंति**

**टीका**—पंचमं साधनं प्रपंचयाति ॥ दानमिति ॥ **दानं**[1] गोभूहिरण्यादिसात्विकं दानं **यज्ञानां** यज्ञादिनां **वरूथं** श्रेष्ठं **दक्षिणा** दक्षिणादिरूपं अस्ति । अतः **लोके सर्वभूतानि** वेदशास्त्रविदोविमूढाश्च सर्वेपि **दातारं उपजीवंति** उपसृत्य जीवंति । तथा राजानः शूराणां भटानां **दानेन** अभीप्सितवित्तादिदानेन **अरातीः** अरातीन् शत्रून् **अपानुदंत** निराकृतवंतः । ये **द्विषंतः** प्रबलाः तेऽपि **दानेन** तुष्टाः **मित्राः भवंति । दाने** कष्टार्जितद्रव्यदाने **सर्वं** अभीप्सितं फलादिकं **प्रतिष्ठितं । तस्मात्** हेतोः **दानं** सात्विकदानं **परमं** उत्तमसाधनमिति वदान्याः **वदंति** ब्रुवते ।

**अर्थ**—[ पांचवें साधन विस्तारानें सांगतो. ] यज्ञादिकामध्यें दक्षिणा देणें हें दान श्रेष्ठ आहे. ह्यास्तव लोकांमध्यें विद्वान व मूर्ख असे सर्व दान देणारावर उपजीवन करतात. तसेंच, राजे शूर योध्यांना द्रव्य इत्यादि देऊन आपल्या शत्रूंचा नाश करितात. जे द्वेष करणारे बळवान असतात ते द्रव्य इत्यादि दिल्यानें मित्र होतात. आपल्या कष्टानें द्रव्यसंपादन करून त्याचें दान केल्यानें आपल्याला जें आवडतें तें फळ मिळतें. म्हणून दान म्हणजे कोणी मागितल्याशिवाय सत्पात्र पाहून द्रव्य देणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे असें दाते म्हणतात.

**धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पंति धर्मेण पापमपनुदति धर्मेसर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदंति**

**टीका**—षष्ठं साधनं प्रपंचेनाह ॥ धर्म इति ॥ **धर्मः** स्नानसंध्याजपदेवपूजावापीकूपतडागादिनिर्माणरूपः **विश्वस्य जगतः** सर्वप्राणिजातस्य **प्रतिष्ठा** सर्वजनानां वापीकूपतडागादिना स्नानपानादीनां

---

[1] तथाच गीतायां दातव्यमितियद्दानंदीयतेऽनुपकारिणे देशेकालेच पात्रेच तद्दानं सात्विकं स्मृतं ।

सिद्धेः। तथा च **लोके धर्मिष्ठं** अतिशयेन धर्मकर्तारं विचारवंतं वा पुरुषं **प्रजाः** स्वाभीष्टार्थं धर्माधर्मनिर्णयार्थं वा **उपसर्पंति** उपगच्छंति। किं च **धर्मेण** प्रायश्चित्तादिरूपेण **पापं अपनुदति** नाशयति। अतः **सर्वं** अपेक्षितं फलं **धर्मे प्रतिष्ठितं। तस्मात्** हेतोः **धर्मं परमं** मोक्षसाधनं इति **वदंति**

**अर्थ**—[ साहावें साधन विस्तारानें सांगतो. ] स्नान, संध्या, जप, देवपूजा, विहिरी, आड व तळीं बांधणें इत्यादि धर्म हा सर्व जगाच्या स्थितीस कारण आहे. कारण सर्व लोकांना स्नान करण्याला व पाणी पिण्याला आड, विहीर, तळें इत्यादिकांची आवश्यकता आहे. तसेंच, लोकांत जो उत्तम धर्मानें वागतो ( अथवा उत्तम विचारानें वागतो ) त्याजवळ लोक आपल्याला जें पाहिजे असेल तें मिळण्याकरितां ( अथवा धर्म कोणता व अधर्म कोणता हें ठरविण्याकरितां ) जातात. आणखीं प्रायश्चित्त इत्यादि धर्मानें मनुष्य पातक नाहींसें करितो. म्हणून जें पाहिजे असेल तें फळ धर्मामध्यें आहे. ह्याकरितां धर्म हा मोक्षाचें उत्तम साधन आहे असें धार्मिक लोक म्हणतात.

**प्रजननं वै प्रतिष्ठा लोके साधु प्रजायास्तंतुं तन्वानः पितृणामनृणो भवति तदेव तस्या अनृणं तस्मात्प्रजननं परमं वदंति**

**टीका**—सप्तमसाधनं प्रपंचयति॥ प्रजननमिति॥ **प्रजननं**[१] धर्मपत्न्यां प्रकृष्टपुत्रोत्पादनं **वै खलु प्रतिष्ठा** स्ववंशस्थितिहेतुः। **लोके** भुवि साधुप्रजायाः समीचीनपुत्रदुहित्रादिरूपायाः **तंतुं** संततिं परंपरामिति यावत् **तन्वानः** शास्त्रविहितवर्त्मना विस्तारयन् **पितृणां** पितृपितामहादीनां **अनृणः** ऋणपरिहारि **भवति। तत् एव** साधुप्रजा त्वमेव **तस्याः** साधु

१ सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेण जय्योनान्येन कर्मणेति श्रुतेः। नाकुमारः प्रमोदति इति वचनाच्च।

२ एषवा अनृणोयः पुत्रीतिसंहितोक्तेः।

प्रजायाः **अनृणं** आनृण्यसंपादकं । **तस्मात्** पंडितपामरसाधारण्येन **प्रजननं** अपत्योत्पादनं **परमं** उत्तमं साधनं इति **वदंति**

**अर्थ**—[ सातवें साधन विस्तारानें सांगतो. ] आपल्या धर्मपत्नीच्या ठिकाणी चांगला पुत्र उत्पन्न करणें हेंच आपला वंश राहण्यास कारण आहे. लोकांमध्यें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें चांगला मुलगा व मुलगी उत्पन्न करणारा मनुष्य बाप, आजा इत्यादिकांच्या ऋणांतून मोकळा होतो. म्हणून उत्तम पुत्र कन्या इत्यादि होणें हेंच ऋणमुक्त करणारें आहे. म्हणून विद्वानापासून तों मूर्खापर्यंत मनुष्यें असें म्हणतात कीं, चांगली संतति उत्पन्न करणें हें मोक्षाचें उत्तम साधन आहे.

**अग्नयो वै त्रयीविद्या देवयानः पंथा गार्हपत्य ऋक्पृथिवी रथंतरमन्वाहार्यपचनं यजुरंतरिक्षं वामदेव्यमाहवनीयः साम सुवर्गो लोको बृहत्तस्मादग्नीन्परमं वदंति**

**टीका**—अथाष्टमं साधन विस्तृत्याह ॥ अग्नय इति ॥ **अग्नयः** गार्हपत्यदक्षिणाग्न्याहवनीयाइतिअग्नयः त्रयः **वै** एव **त्रयी विद्या** वेदत्रयोक्तकर्मसाधनतया वेदविहितत्वात् उच्यंते । अग्निः **देवयानः** देवलोकं यापयतीति **पंथाः** । तेषामग्नीनां मध्ये **गार्हपत्यः** अग्निः **ऋक्** ऋग्विहितकर्माधारः अर्च्यत्वात् ऋक् शब्दवाच्यानिरुद्धस्वामिकः । **पृथिवी** प्रथनात् हविरादिविस्तृतेः पृथिव्याख्यः **रथंतरं** स्थिरत्वसंयुक्तश्चेति रथंतरनामकसामभागेन प्रशस्यंते । **अन्वाहार्यपचनं** दक्षिणाग्निः **यजुः** यजुर्वेदसिद्धः याज्यस्वरूपप्रद्युम्नाख्यभगवद्दैवत्यः । **अंतरिक्षं** अंतः गार्हपत्याहवनीययोर्मध्येईक्षणीयः अंतरिक्षसंचारिव्याप्यभिमन्यमानः **वा**-

---

१ अग्नि र्ज्योतिरहः शुक्लइति गीतायां देवयानमार्गे प्रथमत्वादग्निर्देवयानः पंथेत्युक्तेः ।

२ ऋगर्च्यत्वाज्जनार्दनइति शिक्षाभाष्यात् ।

**मदेव्यं** वामदेवसामयुक्तः अंतः प्रशस्तः। **आहवनीयः साम** सर्वहोमाश्रयत्वसाम्यात् समस्तसामवेदाभिमानिप्राणदैवत्यः सर्वसमसंकर्षणदेवताकश्च । **सुवर्गः लोकः** स्वर्गसाधनीभूतहविराद्याश्रयः **बृहत्** बृहत्सामकः। **तस्मात्** एतादृशत्वात् **अग्नीन्** पूर्वोक्तान् अग्नीन् **परमं** साधनं इति त्रैविद्याः **वदंति**

**अर्थ**—[ आतां आठवें साधन विस्तार करून सांगतो. ] गार्हपत्य, दक्षिणाग्नि, आहवनीय, असे तीन प्रकारचे अग्नी कर्मांचें साधन म्हणून तीन वेदांमध्यें मुख्यत्वें करून सांगितले आहेत. म्हणून ते तीन वेद आहेत असें म्हणतात. अग्नि हा परमेश्वराकडे जाण्याचा मार्ग आहे. ह्या तीन अग्नीमध्यें गार्हपत्य नांवाचा अग्नि हा ऋग्वेद आहे, कारण ऋग्वेदांतील सर्व कर्मांचा तो आश्रय आहे व अर्च्य म्हणजे पूजा करण्यास योग्य म्हणून ऋक् नांवाचा अनिरुध्द त्या वेदाचा नियामक आहे. होमाचे सर्व पदार्थ पृथिवीवर पसरले आहेत म्हणून तो अनिरुध्द पृथिवी नांवाचा आहे. तो सामवेदांतील रथंतर नांवाच्या एका भागानें प्रतिपादन केलेला आहे. अन्वाहार्यपचन म्हणजे दक्षिणाग्नि हा यजुर्वेद आहे. आणि यज्ञ करण्यास योग्य असलेला प्रद्युम्न हा त्याची अभिमानी देवता आहे. तो गार्हपत्य व आहवनीय ह्या दोहोंमध्यें ध्यान करण्यास योग्य आहे. तो आकाशामध्यें संचार करणाऱ्या वायूदेवाचा अभिमानी आहे. तो वामदेवानें गायन केलेल्या सामवेदानें युक्त आहे. तो फारच प्रशस्त आहे. आहवनीय नांवाचा अग्नि सर्व होमाला सारखा असल्या कारणानें सामवेद आहे. सामवेदाचा अभिमानी प्राणदेव व संकर्षण देव आहेत. तो स्वर्गलोक मिळवून देणाऱ्या होमद्रव्यांचा आधार आहे. तो सामांपैकीं बृहत्सामानें वर्णिलेला आहे. म्हणून हे तीन अग्नी मोक्षाचें मुख्य साधन आहेत असे तीन वेद जाणणारे विद्वान् म्हणतात.

---

१ प्राणः सामेति कीर्तित इति छांदोग्यभाष्ये ।

२ कार्यकारणयोरभेदव्यपदेश औपचारिकः ।

**अग्निहोत्रꣳसायंप्रातर्गृहाणांनिष्कृतिः स्विष्टꣳसुहुतंयज्ञक्रतूनांप्रायणꣳसुवर्गस्यलोकस्य ज्योतिस्तस्मादग्निहोत्रंपरमं वदंति**

**टीका**—अथ नवमं साधनं प्रपंचयति ॥ अग्निहोत्रमिति ॥ **सायंप्रातः** अनुष्ठितं **अग्निहोत्रं गृहाणां निष्कृतिः** प्रायश्चित्तरूपं निरंतरं कर्तव्यं । किंच अग्निहोत्रं **स्विष्टः** शोभनयागरूपं **सुहुतं** त्यक्तस्य द्रव्यस्य सुष्टु अग्नौप्रक्षेपरूपं च । तत् **यज्ञक्रतूनां** यज्ञानां अग्न्याधानाग्निहोत्रदर्शपूर्णमासाग्रहायणचातुर्मास्यादीनां निरूढप्रतिबंधसौत्रायणीनांच अग्निष्टोमात्यग्निष्टोमोक्थषोडशीवाजपेयातिरात्राप्तोर्यामसोमानां **प्रायणं** प्रकर्षेण अयनं आश्रयः । अग्निहोत्रमतामेव यज्ञाधिकारात् तस्यसर्वप्रकतित्वाच्च **अग्निहोत्रं सुवर्गस्य लोकस्य ज्योतिः** प्रकाशकं । **तस्मात् अग्निहोत्रं परमं** मोक्षस्यश्रेष्ठंसाधनं इति याज्ञिकाः **वदंति**

**अर्थ**—[ आतां नववें साधन विस्तारानें सांगतो. ] गृहस्थाश्रमी लोकांनीं सकाळीं व रात्रीं अग्निहोत्र हें प्रायश्चित्त म्हणून निरंतर करावें. अग्निहोत्र हें उत्तम यज्ञस्वरूप आहे. अग्निहोत्र हें अग्नींत टाकलेल्या द्रव्यांचें उत्तम हवन आहे. अग्निहोत्र हें अग्न्यधानें, दर्श पूर्णमास, अग्रहायणें, चातुर्मास्य, निरूढ, प्रतिबंध, सौत्रायणी इत्यादि यज्ञ आणि अग्निष्टोम, अत्याग्निष्टोम, उक्थ, षोडशी, वाजपेय, अतिरात्र, आप्तोर्याम, सोम इत्यादि क्रतु ह्यांचें उत्तम स्थान आहे. अग्निहोत्र्यांनांच यज्ञ करण्याचा अधिकार आहे. अग्निहोत्रापासून स्वर्ग प्राप्त होतो. म्हणून अग्निहोत्रच मोक्षाचें उत्तम साधन आहे असें याज्ञिक लोक म्हणतात.

---

१ तथाच सूत्रं अग्निहोत्राद्यपितत्कार्यायैवतद्दर्शनादिति ।

२ तथाच गीतायां त्रैविद्यामांसोमपाःपूतभावायज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिंप्रार्थयंते तेतं भुक्त्वस्वर्गलोकं विशालंक्षीणेपुण्ये मर्त्यलोकंविशंति ।

३ अग्न्याधान म्हणजे विच्छिन्न झालेला अग्नि पुनः स्थापन करणें.

४ वर्षारंभीं करावयाचा यज्ञ.

**यज्ञ इति यज्ञेनहि देवादिवंगता यज्ञेनासुरान पानुदं-त यज्ञेनद्विषंतो मित्राभवंति यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्यज्ञं परमं वदंति**

**टीका**—दशमं साधनं प्रपंचयति ॥ यज्ञ इति ॥ **यज्ञः** पूर्वोक्तः **इति** मोक्षस्य साधनं । **हि** यस्मात् **देवाः** आपि **यज्ञेन** प्राग्भवानुष्ठितेन भगवज्ज्ञानेनच **दिवं** स्वर्गं **गताः** । किंच **यज्ञेन** रक्षोघ्नहोमेन स्वाविष्टभगवताच **असुरान् अपानुदंत** अपानोदनं निवारणं कृतवंतः । **यज्ञेन** सर्वेभ्यो कामेभ्यो ज्योतिष्टोम इति तत्कामनयानुष्ठितेन **द्विषंतः** शात्रवः **मित्राः भवंति** । **यज्ञे सर्वं** ईप्सितफलं **प्रतिष्ठितं** । **तस्मात्** हेतोः **यज्ञं** प्रति **परमं** उत्तमसाधनं इति विद्वांसः **वदंति** ।

**अर्थ**—[ आतां दहावें साधन विस्तारानें सांगतो. ] पूर्वीं सांगितलेला यज्ञ मोक्षाचें मुख्य साधन आहे. कारण पूर्वींच्या जन्मीं केलेल्या यज्ञानें भगवंताच्या ज्ञानानें देव स्वर्गलोकीं गेले. आणखी शत्रूंचा नाश होण्याकरितां कांहीं सूक्तें वेदामध्यें आहेत त्यांचा पाठ केल्यानें व आपल्या ठिकाणीं असलेल्या भगवंताच्या योगानें देव दैत्यांचा पराजय करतात. सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या यज्ञांमध्यें ज्योतिष्टोमयज्ञ मुख्य असल्या कारणानें आपल्या सर्व इच्छा पूर्ण होण्याच्या हेतूनें केलेल्या यज्ञानें आपले शत्रू मित्र होतात. ज्योतिष्टोमयज्ञानें सर्व फळ प्राप्त होतें. म्हणून यज्ञ हाच मोक्षाचें उत्तम साधन आहे असें विद्वान् लोक म्हणतात.

**मानसं वैप्राजापत्यं पवित्रं मानसेनमनसासाधु पश्यति मानसाऋषयः प्रजा असृजंत मानसे सर्वं प्रतिष्ठितं तस्मान्मानसं परमं वदंति**

**टीका**—एकादशसाधनं प्रकटयाति ॥ मानसमिति ॥ **मानसं वै**

---

१ विद्याकर्मभ्यां देवपदप्राप्तेरिति श्रुतत्वात् ।

मनसैव निष्पाद्यं मननोपासनादि **प्राजापत्यं** प्रजापतिदेवताकं तदनुष्ठितं च अतएव **पवित्रं**[१] विशुद्धिकरं **मानसेन** एकाग्रचित्तेन **मनसा** मननादिना **साधु** सम्यक्‌निश्चयरूपं **पश्यति** जानाति। किंच **मानसाः** ब्रह्मणः मानसपुत्राः मरीच्यादयः **ऋषयः** मनसा संकल्पमात्रेण **प्रजां असृजंत** उत्पादितवंतः। **मानसे सर्वं प्रतिष्ठितं। तस्मात् मानसं परमं** मोक्षस्योत्तमं साधनं इति बुधाः **वदंति** ब्रुवते।

**अर्थ**—[ अकरावें साधन स्पष्ट करून सांगतो. ] मनानें विचार करून मिळालेल्या ज्ञानानें प्रजापति देवाला उद्देशून केलेलें अनुष्ठान पवित्र करणारें आहे. एकाग्रचित्तानें विचार करून उत्तम ज्ञान मिळवितो. ब्रम्हदेवानें आपल्या मनानें जे मरीचि इत्यादि पुत्र उत्पन्न केले त्यांनीं सर्व प्रजा केवळ आपल्या संकल्पानें निर्माण केली. एकाग्र चित्ताचे ठिकाणीं सर्व इच्छित फळ मिळतें. म्हणून मनन हें मोक्षाचें मुख्य साधन आहे असें विद्वान् म्हणतात.

**न्यासइत्याहुर्मनीषिणो ब्रम्हाणं ब्रम्हाविश्वः कतमः स्वयंभु प्रजापतिः संवत्सर इति**

**टीका**—द्वादशं प्रधानसाधनं विविच्याह ॥ न्यासइति ॥ **न्यासः** काम्यकर्मपरित्यागरूपः तं संन्यासं[२] **मनीषिणः** प्रज्ञाः **ब्राम्हणं** परब्रम्हसदृशं तत्प्रतिबिंबं तदत्यंतप्रियंच इति **आहुः**। अतः न्यासः प्रशस्तः। तत्प्रतिबिंबस्यातिमहामाहिमत्वादिति भावेन तन्महिमांतराण्याह ॥ ब्रम्हा विश्व इति ॥ **ब्रम्हा** परमात्मा **विश्वः** पूर्णः **कतमः** अतिशायितसुखरूपः **स्वयंभूः** मातापित्रादीन्विना स्वयमेवाभिव्यज्यमानत्वात् **प्रजापतिः** प्रजापा-

---

१ नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यत इति गीतोक्तेः।

२ तथा च गीतायां काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुरिति।

लनात् **संवत्सरः** संवत्सराख्यतन्नियंतृत्वात्तच्छब्दवाच्यः **इति**[2] । इत्यादि महामहिमोपेतं ब्रम्ह । अतः तत्प्रतिबिंबोऽपि तथा विध इति भावः ।

**अर्थ**—[ बारावें मुख्य साधन स्पष्ट करून सांगतो. ] कर्मं करितांना फलाची इच्छा सोडणें ह्यास न्यास म्हणतात. तो परमात्म्यासारखा आहे, तो परमात्म्याचें प्रतिबिंब आहे, आणि तो त्याला अतिशय प्रियकर आहे, असें ज्ञानी म्हणतात. म्हणून फळाची इच्छा न धरितां कर्म करणें हें चांगलें आहे. [ परमात्म्याच्या प्रतिबिंबाचा महिमा मोठा असल्यामुळें त्याचे दुसरे महिमे सांगतो. ] परमात्मा पूर्ण, अत्यंत सुखरूपी, आईबापाशिवाय स्वतः प्रकट होणारा, प्रजेचें पालन करणारा म्हणून प्रजापति शब्दानें वाच्य, संवत्सर म्हणजे वर्ष इत्यादि कालाचा नियामक आहे म्हणून तो संवत्सर शब्दानें वाच्य, असा आहे. परमात्मा इतक्या महिम्यांनीं युक्त आहे, म्हणून त्याचें प्रतिबिंबही त्याच्यासारखें आहे असा अभिप्राय समजावा.

**संवत्सरोसावादित्यो य एष आदित्ये पुरुषः स परमेष्ठी ब्रम्हात्मा याभिरादित्यस्तपति रश्मिभिस्ताभिः पर्जन्यो वर्षति पर्जन्येनौषधिवनस्पतयः प्रजायंत ओषधिवनस्पतिभिरन्नं भवत्यन्नेन प्राणाः प्राणैर्बलं बलेन तपस्तपसा श्रद्धा श्रद्धया मेधा मेधया मनीषा मनीषया मनो मनसा शांतिः शांत्या चित्तं चित्तेन स्मृति ५ स्मृत्या स्मार५ स्मारेण विज्ञानं विज्ञानेनात्मानं वेदयति**

**टीका**—पुनः संवत्सराख्यभगवन्महिमांतरमाह ॥ संवत्सरइति ॥ **असौ** प्रसिद्धः **संवत्सरः** संवत्सरनामा **आदित्यः** आदानादिकर्त्ता नाराय-

---

१ संवत्सरोवै प्रजापतिरिति प्रश्नोपनिषदि ।

२ इति शब्दः प्रकारार्थः ।

णः । **यः एषः आदित्ये** सूर्ये **पुरुषः सः परमेष्ठी** उत्तमस्थानस्थितः **ब्रम्हा आत्मा** नारायण एव । एवं संवत्सरशाब्दितस्यादित्यमंडलस्थत्वमुक्त्वा तस्य अन्नादिसर्वजगत्सर्जकत्वमप्याह ॥ याभिरिति ॥ **आदित्यः** सूर्यस्तद्गतहरिश्च **याभिः रश्मिभिः तपति ताभिः** भूमिस्थजलं गृहीत्वा **पर्जन्यः** तदभिमन्यमानः स्वयं पर्जन्यो भूत्वा **वर्षति** वर्षणं करोति । **पर्जन्येन** वर्षकेन **ओषधिवनस्पतयः** ओषधयः फलपाकांताः व्रीह्यादयः वनस्पतयः पुष्पं विना फलशालिनः अश्वत्थपनसादयश्च **प्रजायंते** प्रकर्षेण उत्पद्यंते । **ओषधिवनस्पतिभिः अन्नं** प्राणिनां भोज्यं **भवति** संपद्यते । तेन **अन्नेन प्राणाः** प्राणाद्याः पंचवायवः एकादशेंद्रियाणि च पुष्टानि भवंति । तैः पुष्टैः **प्राणैः** देहे **बलं** संपद्यते । तेन **बलेन तपः** कृच्छ्रैकादश्युपवासादिरूपं संपद्यते । तेन **तपसा श्रद्धा** शास्त्रेषु आस्तिक्यबुद्धिः संपद्यते । तया **श्रद्धया मेधा** शास्त्रार्थधारणावती बुद्धिः जायते श्रवणमननजन्यं ज्ञानमुत्पद्यत इति यावत् । तया **मेधया मनीषा** तत्वनिश्चयेच्छारूपा मनीषा भवति । तया **मनीषया मनः** मननं उत्पद्यते । **तेन मनसा** मननेन तत्वनिश्चयद्वारा **शांतिः** संशयविपर्ययपरिहारो भवति। **तया शांत्या चित्तं** चित्तस्वास्थ्यं एकाग्रता जायते । तेन **चित्तेन** चित्तस्वास्थ्येन **स्मृतिं** स्मृतिः धारणारूपाखंडस्मृतिः जायते । तया **स्मृत्या स्मारं** अखंडध्यानं भवति । तेन **स्मारेण** अखंडध्यानेन **विज्ञानं** भगवदपरोक्षज्ञानं उत्पद्यते । तेन **विज्ञानेन आत्मानं** परमात्मानं **वेदयति** समर्पयति स्वस्वरूपज्ञानवांश्च भवति ।

**अर्थ**—[ आणखी संवत्सर नांवाच्या परमात्म्याचा दुसरा महिमा सांगतो. ] हा प्रसिद्ध जो संवत्सर नांवाचा आहे तो सर्व ग्रहण करतो म्हणून आदित्य नांवाचा नारायण आहे. सूर्यमध्यें जो राहाणारा परमात्मा तो

---

१ तथा च स्मृतिः ध्येयः सदा सवितृमंडल मध्यवर्ती नारायणः सरसिजासनसंनिविष्टः । केयूरवान् मकरकुंडलवान् किरिटी हारी हिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः ।

उत्तम स्थानीं राहाणारा गुणपूर्ण नारायण आहे. [ संवत्सर शब्दानें जो वाच्य परमात्मा आहे तोच सूर्यमंडळामध्यें आहे असें सांगून तोच अन्न इत्यादि उत्पन्न करतो हेंही सांगतो. ] सूर्य व सूर्यमधील परमात्मा ज्या किरणांनीं तापतो त्या किरणांनीं पृथिवीवरील पाणी घेऊन पर्जन्यदेवतेला प्रेरणा करून पर्जन्य होऊन पडतो. पर्जन्यापासून पुष्पें येऊन फळें येणाऱ्या साळी इत्यादि ओषधि व पुष्पाशिवाय फळें येणाऱ्या पिंपळ, फणस इत्यादि वनस्पति उत्पन्न होतात. ओषधि व वनस्पति ह्यांपासून प्राण्यांना खाण्याजोगें अन्न उत्पन्न होतें. त्या अन्नापासून पांच प्राण, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, व मन हीं पुष्ट होतात. प्राणादिकांपासून देहामध्यें बल येतें. त्या बलापासून कृच्छ्र, चांद्रायण, एकादशी उपवास इत्यादि तप करतां येतें. त्या तपापासून शास्त्रावर श्रद्धा उत्पन्न होते. त्या श्रद्धेपासून शास्त्रार्थ धारणा करणारी बुद्धि उत्पन्न होते म्हणजे श्रवण व मनन ह्यापासून होणारें ज्ञान बुद्धीपासून उत्पन्न होतें. त्या बुद्धीपासून तत्वाचा निश्चय दृढ होतो. तत्वनिश्चय दृढ झाला म्हणजे त्यापासून मनन होतें. मननापासून तत्वाचा निश्चय पूर्ण होऊन शांति येते म्हणजे संशय, उलट भावना इत्यादिक नाहींशा होतात. शांतीपासून चित्ताला स्वस्थपणा येतो. त्या चित्ताच्या स्वस्थपणापासून अखंड स्मृति होते. खंडशः स्मृतीकरितां एकसारखी धारणा येते. एकसारख्या धारणेपासून भगवंताचा साक्षात्कार होतो. साक्षात्काराच्या योगानें आपले मुळचे स्वरूपाचें ज्ञान होतें.

**तस्मादन्नं ददन्त्सर्वाण्येतानि ददात्यन्नात्प्राणा भवंति भूतानां प्राणैर्मनोमनसश्चविज्ञानं विज्ञानादानंदो ब्रम्हयोनिः**

**टीका**—अन्नदानकर्तुः प्रशंसामुदाहरति ॥ तस्मादिति ॥ **तस्मा-**

त् अन्नस्य प्राणबलाद्यात्मापरोक्ष्यहेतुत्वात् **अन्नं**[1] **ददन्** अन्नदः अन्नदाता अन्ननामकपरमात्मज्ञानोपदेष्टा च पुरुषः **सर्वाणि एतानि** प्राणाद्यात्मानुभवांतानि **ददाति** । अथ तारतम्यं सूचयन् संक्षेपेणान्नादिपंचकोशनियामकतया वारुण्याद्युक्तमन्नमयादिपंचरूपं भगवंतं स्मारयति ॥ अन्नादिति ॥ **अन्नात्** प्रसिद्धान्नात् यद्वा पांचभौतिकान्नमयकोशात् अन्नमयनाम्नोऽनिरुद्धात् **भूतानां** प्राणिनां **प्राणाः** शरीरांतःप्राणमयकोशाः तन्नियामकाः प्राणमयनामकाः प्रद्युम्नरूपविशेषाः **भवंति** अंतर्विद्यंत इत्यर्थः। **प्राणैः** प्रागुक्तैः **मनः** मनःस्वास्थ्यं । **मनसः** मनोमयादितः **विज्ञानं** निदिध्यासनद्वाराऽपरोक्षज्ञानं भवति । विज्ञानमयकोशतन्नियामकविज्ञानमयाख्यः वासुदेवश्चांतः प्रविष्टोऽस्ति । **विज्ञानात्** प्रागुक्तार्थत्रितयरूपात् **ब्रम्हयोनिः** ब्रम्हप्रसादकारणकः **आनंदः** स्वस्वरूपानंदाविर्भावलक्षणः मोक्षः भवति । आनंदमयकोशतन्नियामकानंदमयनामा नारायणश्च ज्ञातो भवति । अन्नमयादिब्रम्होपदेशेन तद्रूपं ज्ञानं भवतीत्यर्थः ।

**अर्थ**—[ अन्नाचे दान करणाऱ्याची स्तुति करितो. ] प्राणापासून तों आत्म्याचा साक्षात्कार होईपर्यंत परंपरेनें अन्नच कारण आहे, म्हणून अन्न म्हणजे प्रसिद्ध अन्न देणारा ( अथवा अन्ननामक परमात्म्याचे ज्ञानाचा उपदेश करणारा ) पुरुष प्राणापासून तों आत्मानुभवापर्यंत सर्व पदार्थांचें दान करणारा होतो. [ ह्या नंतर कमीज्यास्त योग्यता सुचवून भगवान हा अन्न इत्यादि पांच कोशांचा नियमन करणारा आहे अशा प्रकारें भृगुवल्लींत अन्नमय इत्यादि जीं भगवंताचीं पांच रूपें सांगितलीं आहेत तशा रूपांच्या भगवंताविषयीं सांगतो. ] लोक प्रसिद्ध अन्नापासून ( अथवा पंचभूतात्मक अन्नमय कोश असल्यामुळें अन्नमयनामक अनिरुद्ध परमात्म्यापासून ) प्राण्यांचे प्राण ( अथवा शरीराच्या आंत असलेले प्राणमय कोश व त्यांचें नियमन करणारीं प्राणमय नांवाचीं प्रद्युम्न नामक भगवंताचीं रूपें ) उत्पन्न होतात. प्राण पुष्ट झाले

---

१ अन्नंब्रम्हेतिश्रुतेः । अन्नदेसर्वतीर्थानीतिस्मृतेश्च ।

असतां त्यापासून मनाला स्वस्थता येते. मनाच्या स्वस्थतेपासून ध्यान करितां करितां परमात्म्याचा साक्षात्कार होतो. ( अथवा विज्ञानमय कोश व त्याचें नियमन करणारा विज्ञानमय नांवाचा वासुदेव आंत प्रत्यक्ष दिसतो. ) पूर्वी सांगितलेल्या भगवंताच्या तीन रूपांपासून परमात्म्याचा प्रसाद होतो. त्या प्रसादापासून आपल्या स्वरूपाचा आनंद प्रकट होतो म्हणजे मोक्ष मिळतो. ( अथवा आनंदमय कोश व त्याचा नियमन करणारा असा जो नारायण त्याचें ज्ञान होतें. ) सारांश, अन्नमय इत्यादि भगवंताच्या रूपांच्या उपदेशानें भगवंताच्या रूपाचें ज्ञान होतें.

**सवाएषपुरुषः पंचधापंचात्मायेनसर्वमिदं प्रोतं पृथिवीचांतरिक्षंच द्यौश्चदिशश्चावांतरदिशाश्चसवैसर्वमिदंजगत्ससभूतꣳ सभव्यंजिज्ञासक्लृप्तमृतजाꣳयिष्ठाः श्रद्धासत्यो महस्वान्तपसोवरिष्ठाज्ज्ञात्वा तमेवंमनसाहृदाच भूयोनमृत्युमुपयाहिविद्वान्**

**टीका**—आदित्यस्थस्यपंचरूपं वदन् पृथिव्यादिपंचात्मत्वादिमहिमांतराण्याह ।।स वा एषइति।। **एषः** आदित्यमंडलस्थतयोक्तः **पुरुषः** परमात्मा **सः** पुरुषसूक्तोक्तः **वै** एव । एषः पुरुषः अन्नमयानिरुद्धरूपेण **पंचधा पंचात्मा** पंचान्नमयनियामकः । **येन** अनिरुद्धादिरूपेण **सर्वं इदं** वक्ष्यमाणपृथिव्यादिपंचकं **प्रोतं** अंतः प्रविष्टं । किंतत्पंचकमित्यत आह ।। पृथिवीति ।। **पृथिवी** तदभिमानी धरा शनिः **च** चशब्दात्तदभिमानिदेवताग्राह्या **अंतरिक्षं** तदभिमानी गणेशः **च** **द्यौः** द्युलोकाभिमानिनः **च** **दिशः** प्राच्याद्याः चत्वारस्तदधीशास्तदभिमानिनः इंद्रयमवरुणसोमाः **च** **अवांतरदिशाः** अग्नेयादिविदिशः तदभिमानिनो अग्न्यादिदेवाश्च इति सर्वं प्रोतं । न केवलं पृथिव्यादिपंचकमेवानिरुद्धादिरूपेण प्रोतं किंतु **सः वै इदं सर्वं** वर्तमानं **सभूतं सभव्यं** भूतभविष्यत्सहितं **जगत्** स्थावरजंग-

मात्मकं अस्ति । सपरमात्माकेनसाधनेन व्यज्यतइत्यत आह ॥ जिज्ञासि-ति ॥ सः परमात्मा **जिज्ञासक्ऌप्तः** जिज्ञासया श्रवणमनननिदिध्यासनादि-भिरुपायैः क्ऌप्तः ज्ञेयः **ऋतजा** ऋतेन यथार्थज्ञानेन प्रादुर्भूतः **रयिष्ठाः** वित्ताभिमानिन्यां रयिशब्दितायां लक्ष्म्यां अंतर्यामितया वर्तमानः **श्रद्धा** आस्तिक्याभिमानिसरस्वतीस्थः श्रद्धानियामकः **सत्यः** सद्भावप्रापकः **मह-स्वान्** महस्वी **तपसः** तेजसः **वरिष्ठाः** वरिष्ठाः अस्ति इति **मनसा** श्रद्धा-युपेतया **हृदा** हृदयस्थपरमात्मप्रसादेन **तं** परमात्मानं **एवं ज्ञात्वा विद्वान्** हेविद्वन् आरुणे प्रजापते त्वं **भूयः** पुनरपि **मृत्युं** संसारं **न उपयाहि** न प्राप्नुहि ।

**अर्थ**—[ सूर्याच्या अंतर्यामी असलेल्या परमात्म्याची पांच रूपें सांगून तीं पांच रूपें पृथिव्यादिकांमध्यें आहेत इत्यादि दुसरे महिमे सांगतो. ] सूर्यमंडळामध्यें जो परमात्मा पूर्वी सांगितला तोच पुरुषसूक्तानें प्रतिपादन केलेला आहे. हा परमात्मा अन्नमयादि पांच रूपामध्यें अनिरुद्धादि नांवानें राहणारा व त्या पांचाचाही नियमन करणारा आहे. त्या अनिरुद्ध नांवाच्या परमात्म्यानें हें पृथिव्यादि पांच व्यापिले आहेत. [ ती पांच कोणती हें सांगतो. ] पृथिवी व तिची अभिमानीदेवता धरादेवी व शनिदेव; अंतरिक्ष व त्याची अभिमानीदेवता गणपति; स्वर्गलोक व त्याच्या अभिमानीदेवता; पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या चार दिशा व त्यांचे स्वामी अनुक्रमानें इंद्र, यम, वरुण, व चंद्र; अवांतर दिशा म्हणजे अग्नेयी, नैऋत्य, वायव्य व ईशान्य ह्या चार दिशा व त्यांच्या अभिमानीदेवता अग्नि इत्यादि; हे सर्व अनिरुद्ध नामक परमात्म्यानें व्याप्त आहेत. केवळ पृथिवी इत्यादि पांचामध्येंच अनिरुद्ध नांवाचा परमात्मा व्याप्त आहे येवढेंच नाहीं, तर आतां असलेलें, पूर्वी झालेलें, व पुढें होणारें जगत हे तो अनिरुद्ध नांवाचा परमात्मा आहे. [ तो परमात्मा कोणत्या साधनानें मिळतो हें सांगतो. ] तो परमात्मा श्रवण, मनन, निदिध्यासन इत्यादि साधनांनीं जाणण्यास

योग्य आहे, यथार्थ ज्ञानानें प्रकट होणारा आहे, तो द्रव्याची अभिमानी देवता जी लक्ष्मी तिचे अंतर्यामी राहणारा आहे, श्रद्धेची अभिमानीदेवता जी सरस्वती तिचे ठिकाणीं राहणारा व तिचे नियमन करणारा आहे, जीवांनां मूळचे स्वरूपाचें ज्ञान करून देणारा आहे, व महातेजस्वी श्रेष्ठ आहे. ह्याप्रमाणें श्रद्धायुक्त मनानें व हृदयांत असलेल्या परमात्म्याच्या प्रसादानें परमात्म्याला ह्या प्रकारें जाणिलें असतां, हे आवणे प्रजापति, तूं पुनः ह्या जन्ममरणरूप संसारांत पडणार नाहींस.

**तस्मान्न्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुः**

**टीका**---अथ बहुप्रकारेण प्रशस्तं संन्यासमुपसंहरति ॥ तस्मादिति ॥ **तस्मात्** ज्ञानद्वारा पुमर्थांतरंगसाधनत्वात् **एषां** सत्यादिन्यासांतानांमध्ये **न्यासं** सन्यासं **अतिरिक्तं** उत्कृष्टं साधनमिति ज्ञानिनः **आहुः** प्राहुः । अपरोक्षिणां गृहस्थादीनां मुक्तिर्नस्यात् । नचचरम जन्मनि सर्वेषां न्यासेनैव मुक्तिरितिवाच्यं तथा प्रमाणाभावात् । प्रत्युत वसिष्ठवामदेवप्रियव्रतादीनां स्वस्ववर्णाश्रमविहितधर्मज्ञानद्वारा मोक्षोक्तिव्याघाताच्च । किंच न ज्ञानंविना सन्यासमात्रेण मोक्षः । तमेवं विद्वानमृतइह भवति नान्यः पंथा अयनाय विद्यते तमेवं विदित्वा अतिमृत्युमेतीत्यादि श्रुतिव्याकोपात् । नच सन्यासिनामेव ज्ञानं । असन्यासिनां नारदादीनां महाज्ञातृत्वस्मरणात् । तस्माद्योगिनां काम्यकर्मपरित्यागिनां भगवदेकशरणानां तत्वज्ञानिनां सन्यासिनामुत्तमत्वमितिभावः । इदं संन्यासस्तुत्यर्थमुक्तं अन्यथा संन्यासरहितानां मुक्त्युक्त्ययोगः।

**अर्थ**---[ सन्यास हा पुष्कळ प्रकारांनीं उत्तम आहे असें सांगितलें. आतां तो विषय संपवितो. ] सन्यास हा ज्ञानद्वारा मोक्षाचें अंतरंग साधन असल्यामुळें, सत्यापासून सन्यासापर्यंत जीं वर साधनें सांगितलीं त्यामध्यें सन्यास हाच उत्कृष्ट साधन आहे असें ज्ञानी म्हणतात. असें आहे म्हणून ज्यास परमेश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान झालें आहे

अशा गृहस्थाश्रमी असलेल्यांस मुक्ति होणार नाहीं, व शेवटल्या जन्मीं सर्वांना संन्यासानेंच मुक्ति होते, असें म्हणणें बरोबर नाहीं, कारण अशा-विषयीं प्रमाण नाहीं. तसें असेल तर वसिष्ठ, वामदेव, प्रियव्रत इत्या-दिकांना आपापल्या जातीप्रमाणें व आश्रमाप्रमाणें धर्माचें आचरण क-रून मुक्ति मिळाली असें म्हणण्यास बाध येईल. आणखी ज्ञानाशिवाय नुसत्या संन्यासानें मुक्ति मिळत नाहीं. जर मिळते असें म्हटलें तर "तमे-वं इ० " ( म्हणजे परमेश्वराला ह्या प्रकारें जाणणारा ह्या लोकीं मुक्त होतो, मोक्ष मिळण्याला दुसरा मार्ग नाहीं ) " तमेवं विदित्वा इ० " ( म्हणजे परमेश्वराला ह्या प्रकारें जाणून मृत्यूपासून सुटतो ), इत्यादि श्रुति व्यर्थ होतात. आणखी संन्याशानांच ज्ञान असतें असें नाहीं, कारण नारदादिक हे संन्यासी नसून त्यांना पुष्कळ ज्ञान होतें अशावि-षयीं स्मृति आहे. म्हणून योगी, फलाच्या इच्छेनें कर्म न करणारा, भगवंताला अनन्य शरण असलेला व तत्वज्ञानी असा जो संन्यासी असे-ल तो मोक्षाविषयीं उत्तम अधिकारी आहे असें तात्पर्य जाणावें. हें संन्यासाची स्तुति करण्याकरितां सांगितलें आहे. असें न म्हटलें तर जो संन्यासी नसेल त्यास मुक्ति मिळते असें म्हणतां येणार नाहीं.

**वसुरण्वो विभुरसि प्राणे त्वमसिसंधाता ब्रम्हन्त्वम सि विश्वधृत्तेजोदास्त्वमस्यग्निरसिवर्चोदास्त्वमसिसूर्यस्य द्युम्नोदास्त्वमसिचंद्रमसउपयामगृहीतोसि ब्रम्हणे त्वाम-हस ओमित्यात्मानं युंजीतैतद्वैमहोपनिषदं देवानां गुह्यं-यएवंवेदब्रम्हणो महिमानमाप्नोति तस्माद्ब्रम्हणोमहिमा-नमित्युपनिषत् ॥ ७९ ॥**

**टीका**—संन्यासिनां भगवत्यात्मार्पणप्रकारमाह ॥ वसुरिति ॥ हे पर-मात्मन् त्वं **वसुः** सर्वत्र निवासात् वसुनामकः **अण्वः** अणुपरिमाणवान्

१ वसनिवास इतिधातोः

**विभुः** व्याप्तः परमसमर्थश्च **असि। प्राणे संधाता** प्राणेस्थित्वा तद्धारकः **त्वं असि** । हे **ब्रम्हन् त्वं विश्वधृत्** समस्तप्रपंचधारकः **असि**। अग्नेः **तेजोदाः** तेजसः दाता **अग्निः असि। सूर्यः सूर्यस्य वर्चोदाः** तेजसः दाता **असि। चंद्रमसः** चंद्रस्य **द्युम्नोदाः** कांतिरूपद्रविणप्रदः **त्वं असि। उपयाम-गृहीतः** नियमेनज्ञातः **असि** । अतः हे आत्मन् **त्वा** त्वां **महसे** उत्सव ते-जोरूपाय **ब्रम्हणे आत्मानं** बुध्या **अर्पयामि इति** स्वात्मानं **युंजीत** समर्पयेत् ॐ इति अनुमतं । उपासनं प्रशंसयति ॥ एतदिति ॥ **एतत्** आत्मनि मनोयोगलक्षणं उपासनं **महोपनिषदं** महद्भिः उपनिषद्भिः प्रति-पाद्यं **वै। देवानां** ब्रह्मादीनामपि **गुह्यं** गोप्यं । **यः** अधिकारी **एवं** गुणपूर्ण-त्वप्रकारेण **वेद** सः भगवदुत्कर्षज्ञानी **ब्रम्हणः महिमानं** अभिव्यक्तज्ञा-नानंदात्मकत्वरूपं महिमानं स्वयं मुक्तौ **आप्नोति । तस्मात् ब्रम्हणः महिमानं** आप्नोति । **इति उपनिषत्** उपनिषद्रहस्यं ॥ ७९ ॥

**अर्थ**—[ संन्यासी हे भगवंताच्या ठिकाणीं आत्म्याचें अर्पण कसें करितात तें सांगतो. ] हे परमेश्वरा, तूं सर्व ठिकाणीं राहाणारा असल्या-मुळें वसु नांवाचा, अणु येवढा, सर्वव्यापी व सर्व शक्तिमान, असा आहेस; तूं मुख्य प्राणाच्या ठिकाणीं राहून त्याला धारण करणारा आहेस; तूं सर्व प्रपंचाला धारण करणारा आहेस; तूं अग्नीला तेज देणारा अग्नि आहेस; तूं सूर्याला प्रकाश देणारा आहेस; तूं चंद्राला शोभारूप संपत्ति देणारा आहेस; तूं नियमानें जाणलेला आहेस. म्हणून, हे परमेश्वरा, तूं आनंद व तेजरूप ब्रम्ह आहेस, अशा तुला मी आपला आत्मा बुद्धिपुरःसर अर्पण करितो. हें मला मान्य आहे. [ आत्मार्पणरूप उपासनेची स्तुति करितो. ] परमात्म्याला आपला आत्मा अर्पण करणें हें मोठमोठ्या उपनिषदांमध्यें सांगितलें आहे. हें ब्रम्हादिक देवांनाही माहित नाहीं. जो कोणी असें जाणतो त्याला परमात्म्याचें ज्ञानानंदरूप प्रगट होऊन तो मुक्त होतो. हें उपनिषदाचें मुख्य रहस्य आहे ॥ ७९ ॥

तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धापत्नी शरीरमिध्ममुरोवेदिर्लोमानिबर्हिर्वेदः शिखाहृदयंयूपः काम आज्यं मन्युः पशुस्तपोग्निर्दमः शमयिता दक्षिणावाग्घोता प्राणउद्गाता चक्षुरध्वर्युर्मनो ब्रम्हा श्रोत्रमग्नी द्यावारिध्रियते सादीक्षा यदश्नाति तद्धविः

**टीका**—ब्रम्हापरोक्षज्ञानिनः आत्मार्पणरूपं यज्ञमभिधाय तत्साधनान्याह ॥ तस्यैवेति ॥ **एवं** प्रागुक्तप्रकारेण **तस्य विदुषः** अपरोक्षज्ञानिनः **यज्ञस्य** आत्मार्पणस्वरूपस्य **आत्मा** स्वयंजीवएव यजमानः आत्मार्पणे तस्य स्वातंत्र्याद्यभिमानात् । यज्ञे दंपत्योः सहाधिकारात् कात्र यज्ञपत्नीत्यत आह ॥ श्रद्धेति ॥ **श्रद्धा** आस्तिक्यबुद्धिः **पत्नी** । आस्तिक्यबुद्ध्यभावेऽर्पणायोगात् सा पत्नीत्वेनोपचर्यते । **शरीरं इध्मं** इध्मप्रक्षेपवत् शरीरार्पणप्राथम्याच्छरीरस्य इध्मत्वव्यपदेशः । **उरः वेदिः** वक्ष्यमाणब्रम्हसदनस्थानत्वादुरसः वेदित्वं । **लोमानि** तनूरुहाणि **बर्हिः** दर्भाः उरोवेद्यामास्तीर्णत्वात् । **शिखा वेदः** दर्भमुष्टिविशेषः । **हृदयं** मनः **यूपः** यज्ञस्तंभः वक्ष्यमाणमन्युलक्षणपशुनियोजनस्थानत्वात् यूपत्वं हृदयस्य । मनसाहि मन्युनिग्रहः कार्यः । **कामः** दुर्विषयतृष्णादयः **आज्यं** आज्यस्थानीयं । यद्वा **कामः** भगवदर्पणकामनारूपः **आज्यं** वपारूपाग्न्यभिवर्धकत्वात् । **मन्युः** क्रोधएव **पशुः** विशासितव्यत्वसाळक्षण्यात् । **तपः** कृच्छ्रचांद्रायणादिपापदाहकतया **अग्निः** अग्नित्वेनोक्तं । **दमः** सर्वेंद्रियनिग्रहरूपः **शमयिता** पशुहिंसकः **दक्षिणा** यज्ञेदक्षिणारूपग्रहकृत्यानुपपत्तिदुःखशांतिकरत्वात् दक्षिणायाः **वाक्** वागिंद्रियंजिव्हाच **होता** हविरादातृत्वसाम्यात् । **प्राणः** प्राणवायुः तत्संचारदेशोघ्राणश्च **उद्गाता** उद्गातृनामाऋत्विक् । **चक्षुः** मनआदिज्ञानेंद्रियसाहचर्यात् चक्षुः **अध्वर्युः** सर्वकार्यद्रष्टृत्वसाम्यात् चक्षुषः अध्वर्युत्वं । **मनः ब्रम्हा** ब्रम्हाख्यऋत्विक् । **श्रोत्रं** श्रवणेंद्रियं **अग्नीत्**

**अग्निः** इति । अथास्याऽनुवाकस्य द्वितीयभागेन ज्ञानिव्यापारस्य यज्ञक्रियात्वमाह ॥ यावदिति ॥ **यावत्** यावत्कालं ज्ञानिनोपवासेन **ध्रियते** स्थीयते **सा दीक्षा । यत् अश्नाति** भुंक्ते **तत्** भोज्यं भोजनक्रिया वा **हविः** ।

**अर्थ**—[ ज्याला परमेश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान झालें आहे त्याला आत्मार्पणरूप यज्ञ करण्याचें सांगून त्या यज्ञाचीं साधनें सांगतो. ] पूर्वीं सांगितलेल्या प्रकारानें ज्याला परमेश्वराचें प्रत्यक्ष ज्ञान झालें आहे त्यानें केलेल्या आत्मार्पणरूप यज्ञाचा यजमान आत्मा आहे, कारण त्याला आत्मार्पण करण्याविषयीं स्वतंत्रपणा इत्यादिकांचा अभिमान आहे. [ यज्ञ करण्याविषयीं नवराबायको ह्या दोघांना मिळून अधिकार आहे, म्हणून येथें यज्ञपत्नी कोण आहे हें सांगतो. ] श्रद्धा ही बायको आहे. श्रद्धा नसल्यास आत्मार्पण होत नाहीं, म्हणून तिला बायको असें मानिलें आहे. शरीर हें समिधा आहे, कारण जशा समिधा यज्ञांत पहिल्यानें टाकितात तसें आत्मार्पणरूप यज्ञांत पहिल्यानें शरीर अर्पण करावें लागतें, म्हणून शरीरास समिधा मानिली आहे. छाती ही वेदि म्हणजे यज्ञासाठीं तयार केलेली जागा आहे, कारण पुढें जें ब्रम्ह सांगायाचें आहे त्याचे बसण्याची जागा असल्यामुळें छातीला वेदि मानिली आहे. केस हे दर्भ आहेत, कारण ते छातीरूप वेदीवर पसरलेले असतात. शेंडी ही दर्भाची मूठ आहे. मन हें यज्ञांतील खांब आहे, कारण पुढें सांगावयाचा जो क्रोधरूप पशु त्याला बांधावयाचें ठिकाण असल्यामुळें मनाला खांब असें मानिलें आहे. मनानें क्रोध आवरून धरावा लागतो. वाईट विषयाविषयींची इच्छा ही तुपाचे जागीं आहे. ( अथवा भगवंताला अर्पण करण्याची इच्छा ही तुपाच्या जागीं आहे, कारण तूप हें वपारूप अग्नीला वाढवितें. ) क्रोध हा आत्मार्पण यज्ञांतील पशु आहे, कारण यज्ञांत मारावयाचा पशु व क्रोध हे दोन्ही सारखे आहेत. कृच्छ्र, चांद्रायण, इत्यादि तपें पापाला जाळून टाकीत अ-

सत्यामुळें तप हें अग्नि आहे असें सांगितलें आहे. दम म्हणजे सर्व इंद्रियांचा निग्रह करणें हा क्रोधरूप पशूला मारणारा आहे. घरांतील संकटाचें दुःख नाहींसें करीत असल्या कारणानें दाक्षिणा व जिव्हा ह्या दोन्ही होता म्हणजे हवन करणाऱ्या ऋग्वेदी ब्राम्हणाच्या ठिकाणीं आहेत, कारण दोहोंनींही होमद्रव्य घेतां येतें. प्राणवायु व तो ज्यांतून फिरतो तें नाक हीं उद्गाता म्हणजे यज्ञामध्यें सामवेदांतील मंत्र म्हणणारांच्या ठिकाणीं आहेत. मन इत्यादि ज्ञानेंद्रियांचें सहाय असल्यामुळें डोळा हा यजुर्वेद म्हणणाऱ्या अध्वर्यूच्या जागीं आहे, कारण सर्व कार्यं पाहाण्याचें काम डोळा करितो म्हणून त्यास अध्वर्यु मानिलें आहे. मन हें ब्रम्हा नांवाचा अथर्वणवेद म्हणणारा ऋत्विज आहे. कर्णेंद्रिय हें अग्नीध्र म्हणजे अग्नि पेटविणारा आहे. [ ह्यापुढें ह्या अनुवाकाच्या दुसऱ्या भागानें ज्ञान्याचे व्यापार हे यज्ञांतील कर्में आहेत असें सांगतो. ] जोंपर्यंत ज्ञानी उपाशी असतो तोंपर्यंत ती त्यांची दीक्षा आहे. तो जें खातो तें अन्न अथवा खाण्याचा व्यापार हा होमद्रव्य आहे.

**यत्पिबति तदस्य सोमपानं यद्रमते तदुपसदोयत्सं चरत्युपविशत्युत्तिष्ठतेच सप्रवर्ग्यो यन्मुखं तदाहवनीयोया व्याहृति राहुतिर्यदस्य विज्ञानं तज्जुहोति यत्सायंप्रातरत्तितत्सामिधं यत्प्रातर्मध्यंदिन ँ सायंच तानिसवनानि ये अहोरात्रे ते दर्शपूर्णमासौ येर्धमासाश्च मासाश्चते चातुर्मास्यानियऋतवस्ते पशुबंधा येसंवत्सराश्च परिवत्सराश्च तेहर्गणाः सर्ववेद संवा एतत्सत्रं यन्म-**

**रणं तदवभृथ एतद्वै जरामर्यमग्निहोत्र५ सत्रं य एवंविद्वानुदगयने प्रमीयते देवानामेव महिमानं गत्वादित्यस्य सायुज्यं गच्छति**

**टीका—यत् पिबति** जलादिपानं करोति **तत् अस्य सोमपानं** सोमपानरूपं। **यत् रमते तत् उपसदः** उपसदाख्यंकर्म । **यत् संचरति उपविशति च उत्तिष्ठते** ज्ञानिनः उपवेशनोत्थानादिः संचारः **सः प्रवर्ग्यः** प्रवर्ग्याख्यंकर्म। **यत् मुखं**[1] आस्यं वर्तते **तत् आहवनीयः** तन्नामाऽग्निः। **या व्याहृतिः** व्याहरणं सा **आहुतिः** आहूयमानंवस्तु। **यत् अस्य विज्ञानं तत् जुहोति** होमक्रिया। **यत् सायंप्रातः** कालद्वये **अत्ति** भुंक्ते **तत् समिधं** समित्। **यत् प्रातः मध्यंदिनं च सायं** इतिकालत्रये यान्यनुष्ठितानि कर्माणि **तानि सवनानि** प्रातःसवनमाध्यंदिनसवनसायंसवनाख्यानीत्यर्थः। अथास्याऽनुवाकस्य तृतीयभागेन जीवन्मुक्तस्य समाधिकालविशेषाणां नानाविधयागरूपत्वमाह ॥ ये अहोरात्रइति ॥ **ये अहोरात्रे** अहश्चरात्रिश्च **ते दर्शपूर्णमासौ** तत्रान्हः पूर्णमासत्वं रात्रेर्दर्शत्वंध्येयं। **ये अर्धमासाः** पक्षाः **च मासाः** प्रसिद्धाः **च ते चातुर्मास्यानि**। ज्ञानिना अहोरात्रपक्षमासेषु अनुष्ठीयमानकर्मणां दर्शपूर्णमासचातुर्मास्यत्वमनुसंधेयं। **ये ऋतवः** वसंताद्याः **ते पशुबंधाः**। ज्ञानिनः ऋतुषु अनुष्ठीयमानानि कर्माणि पशुबंधसमानीत्यर्थः। **ये संवत्सराः च**[2] **परिवत्सराः**[3] **च ते अहर्गणाः। एतत्** आत्मार्पणाख्यं **सत्रं सर्ववेदसं** आत्मात्मीयदेहेंद्रियादिसर्वस्वदक्षिणाकमित्यर्थः **वै**। **यत् मरणं**

---

१ आस्यस्थ आहवनीय इति श्रुत्यंतरसमाख्यानात्।

२ च कारा भ्यां इडावत्सरानुवत्सर वत्सराश्च समुच्चीयंते।

३ प्रभवादिषु षष्टि संवत्सरेषु एकैकं पंचकंयुगाख्यं तस्मिन्युगे पंचापि संवत्सरपरिवत्सरे डावत्सरानुवत्सर वत्सरक्रमेण व्यवन्हियंते।

चरमदेहत्यागरूपं **तत् अवभृथः** । यत् **एतत्** आत्मार्पणरूपं **वै जरा-मर्यं** जन्ममरणात्मकं **अग्निहोत्रं** अग्निहोत्राख्यं **सत्रं** सतां त्राणं । **एवं विद्वान्** एतदुपनिषदर्थज्ञानी **यः** यदि **उदगयने** उत्तरायणे **प्रमीयते** मृतोभवति तदा सः **देवानां** अग्न्यादिलोकाभिमानिनां **एव महिमानं गत्वा** तदनंतरं **आदित्यस्य** तदंतर्गतस्य ब्रम्हणः **सायुज्यं** सायुज्यमित्युपल-क्षणं सायुज्यसामीप्यसारूप्यसालोक्यं यथायोग्यं **गच्छति** ।

**अर्थ**—तो पाणी इत्यादि जें पितो तें त्याचें सोमपान म्हणजे यज्ञांतील सोमवल्लीचा रस पिण्याचे ठिकाणीं आहे. तो जी कर्मशूक करितो ती उपसद नांवाचें यज्ञकर्म आहे. तो जें फिरतो, बसतो व उठतो तें प्रवर्ग्यनामक कर्म आहे. ज्ञान्याचें जें तोंड तें आहवनीय नामक अग्नि आहे. ज्या व्याहृती म्हणजे भूः भुवः व स्वः त्या आहुति आहेत. त्याचें जें विज्ञान तें होमकर्म आहे. तो जें सकाळीं व संध्याका-ळीं खातो तें समिधाचे जागीं आहे. तो सकाळीं, दोनप्रहरीं व संध्याका-ळीं जीं कर्में करितो ती त्या तिन्हीं काळचीं यज्ञरूप आहेत. [ ह्या पुढें ह्या अनुवाकाच्या तिसऱ्या भागानें जो जीवंत असून मुक्त झालेला आहे त्याच्या समाधीचे काल नानाप्रकारच्या यज्ञाचीं रूपें आहेत असें सांगतो. ] जो दिवस तो पूर्णमास नामकयज्ञ आहे, व जी रात्र ती दर्शनामक यज्ञ आहे. जो पंधरवडा व महिना हे चातुर्मास्यनामकयज्ञ आहेत. ह्यावरून असें लक्ष्यांत ठेवावें कीं, दिवस, रात्र, पंधरवडा व महिना ह्यांमध्यें ज्ञान्यानें केलेलीं कर्में, पूर्णमास, दर्श, व चातुर्मास्य नामक आहेत. जे वसंत इत्या-दि ऋतु आहेत त्यांमध्यें ज्ञान्यांनीं केलेलीं कर्में पशुबंधनामकयज्ञासारखीं आहेत. जे संवत्सर व परिवत्सर ते त्याचे अहर्गण आहेत. हा आत्मार्पण नांवाचायज्ञ असा आहे कीं, त्यांत देह इंद्रिय इत्यादि सर्व दक्षिणारूप आहेत. ज्ञान्याचें जें शेवटला देह टाकणें तें अवभृथ म्हणजे यज्ञ पूर्ण

---

१ आ सम्यक् दीप्यमानस्य ।

झाल्यावर यज्ञ करणारानें नदीवर जाऊन जें स्नान करावयाचें तें आहे. हें जन्ममरणरूप जें आत्मार्पण नामक अग्निहोत्र आहे तें साधूंना तारणारें आहे. असा उपनिषदाचा अर्थ जाणणारा ज्ञानी जर उत्तरायणांत मेला तर त्याला अग्नि इत्यादि लोकांच्या अभिमानी देवतांचा मोठेपणा मिळून त्यानंतर त्याला आपल्या योग्यतेप्रमाणें सूर्यांत असलेल्या परमेश्वराचें सायुज्य, सामीप्य, सारूप्य व सालोक्य अशी मुक्ति मिळते.

**अथ योदक्षिणे प्रमीयते पितृणामेव महिमानं गत्वा चंद्रमसः सायुज्यꣳसलोकतामाप्नोत्येतौ वै सूर्याचंद्रमसोर्महिमानौ ब्राम्हणो विद्वानभिजयति तस्माद्ब्रम्हणो महिमानमाप्नोति तस्माद्ब्रम्हणो महिमानं ॥ ८० ॥**

**टीका—अथ यः दक्षिणे** दक्षिणायने **प्रमीयते** मृतोभवति सः **पितृणां** पितृमार्गगतानां धूमादिमार्गं गतानां धूमादिदेवानां **एव महिमानं** धूमादिप्रवेशतद्गतौ गतिरित्यादिरूपं महत्वं **गत्वा** प्राप्य **चंद्रमसः सायुज्यं** तत्प्रवेशलक्षणं **सलोकतां** तत्सलोकतां **आप्नोति। एतौ** उत्तरायणदक्षिणायनदेवयानपितृयानमार्गौ **विद्वान्** ज्ञानी **ब्राम्हणः सूर्याचंद्रमसोः महिमानौ अभिजयति** स्वयमाप्नोति। **तस्मात्** सूर्यादिमहिमावाप्त्यनंतरं **ब्रम्हणः** परमेश्वरस्य हिरण्यगर्भस्यवा **महिमानं** तत्सायुज्यसामीप्यसारूप्यसालोक्यमुक्तिलक्षणं सम्यगभिव्यक्तानंदस्वरूपत्वं **आप्नोति । तस्मात् ब्रम्हणः महिमानं** आप्नोति[1] ॥ ८० ॥

**अर्थ**—आतां जो दक्षिणायनांत मरतो त्याला, जे पितृमार्गानें गेले, जे धूमादिक मार्गानें गेले व धूमादिक देव ह्यांच्यामध्यें प्रवेश करणें, ते गेले असतां त्यांच्याबरोबर आपण जाणें इत्यादि मोठेपणा मिळून ते

---

१ अध्यायांते द्विरुक्तिः स्याद्वेदेवावैदिकेपिवा । विचारोयत्रसज्जेत पूर्वोक्तस्यावधारणे । अनुक्तानां प्रमाणानां स्वीकारश्चक्वतो भवेत् । विनिश्चयेतरान्मार्गान्संपूर्णफलता तथेति भाष्योदाहृतवचनात्सर्वमति मंगलं ।

चंद्रांत प्रवेश करितात व चंद्रलोकाला जातात. उत्तरायणांत जाण्याचा देवमार्ग व दक्षिणायनांत जाण्याचा पितृमार्ग हे दोन मार्ग जाणणाऱ्या ब्राह्मणाला सूर्यचंद्राचे महिमे प्राप्त होतात. सूर्यादिकांचा महिमा प्राप्त झाल्यावर परमेश्वराशीं मिळणें, त्याच्या जवळ जाणें, त्याच्यासारखें रूप होणें, त्याच्या लोकीं जाणें ह्याप्रमाणें मुक्ति मिळून त्याला आपलें आनंदस्वरूप प्राप्त होतें. सूर्यादिकांचा महिमा प्राप्त झाल्यावर परमेश्वराचा महिमा प्राप्त होतो ॥ ८० ॥

अंभस्यैक पंचाशच्छतं जातवेदसे चतुर्दशभूरन्नं भूरग्नये भूरग्नये-चैकमेकं पाहिपाहिचत्वारि चत्वारियश्छंदसांद्वेनमो ब्रम्हणऋतं तपो-यथावृक्षस्यैकमेक मणोरणीया ४ श्चतुस्त्रि ४ शत्सहस्रशीर्ष ४ षड्वि ४ शति रादित्योवा एषआदित्योवैतेजएकमेकं निधनपतयेत्रयोवि ४[1] शतिः सद्योजातंत्रीणिवामदेवायैक मघोरेभ्यस्तत्पुरुषाय द्वेद्वे ईशानो नमोहिरण्य बाहवएकमेकमृतं ४ सत्यंद्वेसर्वोवै चत्वारि कद्रुद्रायत्रीणि यस्यवैकं कतीकृगुष्वपाजोदितिरापोवाइदमेकमेकमापः पुनंतुचत्वा-र्यग्निश्चसूर्यश्च नवनवोमिति चत्वार्याया तु पंचौजोसि दशोत्तमेचत्वारि घृणिजोणि ब्रम्हमेतुमां यास्ते ब्रम्हहत्यां द्वादशब्रम्हमेधयावानइमं-भ्रूणहत्यां ब्रम्हमेधवा ब्रम्हादेवानामिदं वीरहत्यामेकान्नवि ४ शतिरे-कान्नवि ४ शतिर्मेधादेवी मेधां मइंद्रश्चत्वारिचत्वार्यामां मेधाद्वेमयिमे-धानेकमत्रैतुरंमृत्योवातं प्राणममुत्रभूयाद्धरि ४ हरंत ४ शलकै रग्निमा-छिद्रो मृत्योमानोमहांतंमानस्तोके प्रजापते स्वस्तिदात्र्यंबकं येतेसहस्रं द्वेद्वेमृत्यवेस्वाहैकं देवकृतस्यैकादशयद्वोदेवाः कामोकार्षीन्मन्युरका-र्षीन्द्वेद्वे तिलांजुहोमि गावश्रियंप्रजाः पंचतिलाः कृष्णाश्चोरस्यश्रीः

[1] अध्याय संपल्यामुळें हें दोनदां आलें आहे.

प्रज्ञातुजातवेदः सप्तप्राण पंचपृथिवी पंचदशाग्नय एकचत्वारिंशादों-
तद्ब्रह्मा नवश्रद्धायां प्राणेनिविष्टश्चतुर्विंशतिःश्रद्धायां प्राणेनिविश्यां
दशांगुष्ठमात्रोद्धे वाङ्म आसन्नष्टौ वयः सुपर्णाः प्राणानांग्रंथिर्द्वद्वे-
नमोरुद्रायैकंत्वमग्नेद्युभिर्द्वे शिवेनमेसत्यं परंपरं प्राजापत्योहारुणि-
स्तस्यैवमेकमेकमशीतिः ॥सहनाववतु । सहनौभुनक्तु । सहवीर्यं-
करवावहै । तेजस्विनावधीतमस्तु । माविद्विषावहै ॥ ॐ शांतिः
शांतिः शांतिः ॥ हरिः ॐ ॥